


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
राज्य मराठी विकास संस्था
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

'नवी क्षितिजे' हे मराठीतील एक महत्त्वाचे नियतकालिक (त्रैमासिक) असून ते सद्यस्थितीत कार्यरत नाही. संस्थेच्या उपरोक्त प्रकल्पातंर्गत 'नवी क्षितिजे' ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करता येणे शक्य असल्याने सदर नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून संस्थेच्या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यासाठी राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सदर नियतकालिकाचे संपादक व मालक स्मृतिशेष श्री. नाना जोशी ह्यांच्या कन्या श्रीमती शर्मिला जोशी ह्यांना विनंती करण्यात आली होती.

सदर विनंतीस श्रीमती शर्मिला जोशी ह्यांनी मान्यता दिल्यामुळे आणि सदर नियतकालिकाचे अंक उपलब्ध करून दिल्यामुळे 'नवी क्षितिजे' ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देणे शक्य होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.

२. सदर ग्रंथांचे/ नियतकालिकांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.

३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.

४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई आणि नवी क्षितिजे संपादक-मंडळ यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे, कलावंतांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्व राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे नसतील.

अनुक्रमणिका




# नवी क्षितिजे

अंक बावन्नावा १९९९


**संपादक**

श्री. नाना जोशी

**रचना**

हर्मिष देव्हारे

**अक्षरजुळणी**

अभिजित पंडित

**मुद्रण व्यवस्था**

सौ. रूपा नाशिककर,

श्रेयस डिझायनर्स अँड प्रिंटर्स,ठाणे.

**मालक, मुद्रक, प्रकाशक**

**आणि पत्रव्यवहार**

श्री. नाना जोशी

४ अ, सोमणनगर,

क्रांतीवीर भाई बालमुकुंद मार्ग,

मुंबई – ४०० ०१२.


**नवी क्षितिजे संबंधी**

* सुट्या अंकाची किंमत रुपये १५०/-
* ४९, ५०, ५१ व ५२ अशा चार अंकांची किंमत रु. २०१
* प्रत्येक अंकाची पृष्ठसंख्या सुमारे १७० ते १७५
* वर्गणी मधल्या अंकापासून स्वीकारली जाणारे नाही. थोडक्यात ५० या अंकासाठी वर्गणी पाठवल्यास ४९ व्या अंकापासूनच अंक पाठविण्यात येईल.

## अनुक्रमणिका



अनुक्रमणिका



## संपादकीय -

नवी क्षितिजेचा ५२ वा अंक

प्रख्यात मानवशास्त्रज्ञ श्री. रामचंद्र गुहा यांच्या लेखावरून 'क्रिकेट व राजकारण' हा लेख तयार करण्यात आलेला आहे. वाचकांच्या अनेक समजुतीना तो चांगलाच धक्का देईल. हा लेखक मुळात 'पास्ट ॲन्ड प्रेझेंट' या इतिहास पंडितांच्या मान्यवर त्रैमासिकात प्रसिद्ध झाला होता. श्री. रामचंद्र गुहा हे 'हिंदू' या प्रख्यात दैनिकाचे क्रिकेट या खेळाचे स्तंभलेखक आहेत. मानवशास्त्रज्ञ कै. व्हेरीयर एलव्हीन यांचे त्यानी लिहिलेले चरित्र नुकतेच प्रसिद्ध झाले असून त्याचेही सर्वत्र चांगले स्वागत होत आहे. 'सर्व भाषा समभाव' हा लेख प्रा. एरीक हॉब्सबॉम यांनी दिलेल्या एका व्याख्यानावरून तयार करण्यात आलेला आहे. हे व्याख्यान नोबेल पारितोषिक विजेते डॉ. अमर्त्या सेन यांच्या दिवंगत पत्नी इव्हा कोलोरनी EVA COLORNI यांच्या स्मरणार्थ जी व्याख्याने आजवर झाली, त्यापैकी एक. विज्ञान आणि तंत्रविज्ञान यांचा आपल्या आहारावर काय परिणाम होतो हे सौ. सुमती जोशी यांच्या लेखात वाचावयास मिळेल. 'बोलकी हाडे' या लेखमालेतील पुढचा लेख. कै. श्री.. श्री. ह. देशपांडे यांच्या लेखमालेतील आणखी एक भाग या अंकात आहे. विज्ञान ही बहुतेक पक्षी आणि सस्तन प्राणी यांची एक मुलभूत प्रवृत्ती आहे. याविषयी 'विज्ञानाचे मूळ' या लेखात चर्चा आहे. 'राष्ट्र व त्याचा भूतकाळ' या अगोदरच्या अंकात येऊन गेलेल्या लेखाचा पुढचा भाग राष्ट्र व इतिहास या लेखात वाचावयास मिळेल. ऑलीव्हर सॅक्स यांचे आवर्तसारणीशी असलेले प्रेमप्रकरण या लेखात आवर्तसारणीकडे पहाण्याच्या एका नव्या दृष्टीकोनाचा वाचकास परिचय होईल.

या अंकाबरोबर वर्गणी संपलेली आहे. याची वर्गणीदारानी कृपा करून नोंद घ्यावी. आजवरच्या सहकार्याबद्दल मन:पूर्वक आभार. त्यांनी आपल्या वर्गणीचे *नूतनीकरण* करावे अशी विनंती.

डॉ. आनंद जोशी, सौ. सुमती जोशी व डॉ. प्रतिभा कणेकर यांच्या लेखन सहाय्याबद्दल आभारी आहे. न्यू जर्सी (NEW JERSEY) येथील एलनॉर केलेमन (ELEANOR KELEMEN) यांनी अनेक ग्रंथ पाठविल्याबद्दल. श्री. अभिजीत पंडित यांनी सुबक छपाई केल्याबद्दल, चित्रकार हर्मिष देव्हारे यांचे देखण्या रचनेबद्दल, श्री. सांगलीकर, श्री. धीरजलाल शहा, श्री. ठाकूर यांनी केलेल्या अनेक प्रकारच्या सहाय्याबद्दल 'नवी क्षितिजे' ऋणी आहे. इतर अनेकांचेही सहाय्य झालेले आहे. पण नामनिर्देष केलेला त्याना आवडणार नाही. पण त्यांचे स्मरण आहेच **– नाना जोशी**

**माधव लिमये**

'नवी क्षितिजे'चे लेखक व सक्रीय सहकारी.

केवळ मधुर आठवणींची व एकही कटुता निर्माण करणारा प्रसंग व आठवण नसणारी पन्नास वर्षांची प्रसन्न मैत्री.

त्यांच्या स्मृतीस विनम्र अभिवादन

अनुक्रमणिका

# क्रिकेट आणि राजकारण

## ब्रिटिश अधिपत्याखालील हिंदुस्थानातील क्रिकेट आणि राजकारण

**– श्रीकृष्ण कामत**

**नेटिव क्रिकेट विरुद्ध गोऱ्यांचा पोलो**

१८८१ च्या ऑक्टोबरमध्ये, म्हणजे एतद्देशीयांना राजकीय हक्क मिळावेत यासाठी 'इंडियन नॅशनल काँग्रेस' स्थापन झाली त्या आधी चार वर्षे, मुंबईच्या गव्हर्नरला एक विनंतीपत्र सादर करण्यात आले होते. त्या पत्रात शहरामधील नेटिवांच्या क्रीडाविषयक हक्कांसाठी जोरदार समर्थन केले होते. वसाहतीमध्ये कैकदा विस्मरणात जाणाऱ्या, समान वागणूक आणि न्याय, या तत्त्वांच्या जपणुकीसाठी खेळाडूंची आवाहन केले होते. अर्जदारांनी प्रारंभीच स्मरण करून दिले :

'जवळ जवळ वीस वर्षांपूर्वी मुंबईकर नेटिवांमध्ये क्रिकेटसारख्या उमद्या खेळाचा परिचय करून देण्यात आला तेव्हापासून 'परेड ग्राऊंड' म्हणून ओळखल्या जाणाऱ्या एस्प्लनेड वर विना अडथळा हा खेळ खेळण्याची सवय त्यांच्या अंगवळणी पडली आहे.

सर्व 'जाती'चे आणि वयोगटाचे पाचशेहून अधिक तरुण परेड ग्राऊंडवर हा आरोग्यदायक खेळ खेळतात. इथेच त्यांना खेळण्याची परवानगी देण्यात आली आहे आणि हे क्रिकेटसाठी सुयोग्य असे एकमेव ग्राऊंड आहे.'

तथापि, गोऱ्या खेळाडूंच्या दुहेरी चढाईमुळे अलीकडे नेटिवांच्या क्रिकेटच्या भवितव्याला हादरा बसला होता. केवळ गोऱ्यासांठी असलेल्या 'बॉम्बे जिमखान्या'ने एस्प्लनेडचा एक तृतियांश भाग छुपेपणाने स्वत:च्या हद्दीत सामील करून घेतला होता. स्वत:च्या क्रिकेट खेळपट्टीचे नीट रक्षण व्हावे व तिची नीट निगा राखता यावी म्हणून ग्राऊंड आरक्षित केले. परिणामी, इतरांना त्यांच्या हद्दीत पाऊल टाकणे दुरापास्त झाले. उरलेला भाग मोकळा होता. पण दर मंगळवारी आणि शुक्रवारी जिमखान्याचे पोलोचे सभासद त्या ग्राऊंडवरून क्रिकेट खेळणाऱ्यांना हाकलून देत असत. हकालपट्टी करण्यात येणाऱ्या नेटिवांना वाटले की, पोलो खेळणाऱ्या अर्ध्या डझन जंटलमनांच्या सुखसोयींना, पाचशेहून अधिक नेटिव तरुणांना आवश्यक असणाऱ्या आरोग्यदायक खेळापेक्षा प्राधान्य देण्यात यावे हे 'थोडसे अन्याय्य' आहे ! राज्यकर्ते आणि वरिष्ठ अधिकारी यांच्याविषयीच्या आदरापोटी व गव्हर्नरसाहेबांचा



अनुक्रमणिका

बहुमोल वेळ खर्ची पाडण्यापरीस, आपले अर्जदार आठवड्यातून दोन संध्याकाळी त्यांचा खेळ आनंदाने सोडून देतील, परंतु पोलो खेळणाऱ्यांचे तट्टू हिरवळीची पुरती नासधूस करतात आणि क्रिकेटसाठी ग्राऊंड साफ कुचकामी करून टाकतात ही वस्तुस्थिती नजरेआड करता येत नाही. आपल्या अर्जदारांना गव्हर्नरसाहेबांना स्मरण करून देण्याची आवश्यकता नाही की, हिरवळीची नीट निगा राखण्यावर क्रिकेटचा खेळ किती अवलंबून असतो. आणि याचा पुरावा हवा असल्यास तोही सादर करतो. *(बॉम्बे)* जिमखाना स्वत:ची क्रिकेट खेळपट्टी तट्टूकडून नासधूस होऊ नये, इतकेच नव्हे तर जाणाऱ्यायेणाऱ्यांकडून ती तुडवली जाऊ नये म्हणून काटेकोरपणे दक्षता घेतात.

शेवटी 'बॉंबे जिमखाना' घेत असलेल्या सवलतीचीच अर्जदारांनी धीटपणे मागणी केली. वर उल्लेखिलेल्या परिस्थितीमध्ये आणि दाटीवाटी असलेल्या या नगरीतील तरुणांना आरोग्यदायी व्यायामासाठी, मन रिझवण्यासाठी क्रिकेट किती उपकारक ठरू शकतो ही बाब ध्यानी घेता, गव्हर्नरमहाशयांनी कृपया 'बॉंबे जिमखान्या'ला विनंती करावी की, पोलो अन्य कुठल्यातरी ठिकाणी खेळावा, किंवा जिमखान्यांच्या क्रिकेटपटूंसाठीच केवळ सध्या राखून ठेवण्यात आलेल्या ग्राऊंडवर त्यांच्याबरोबर आपल्या अर्जदारांना खेळण्याची अनुमती द्यावी. शिवाय, त्यांच्या जरुरीपेक्षा ते ग्राऊंड मोठे आहे.

त्यानंतर सहा महिन्यांनी आणि बऱ्याचशा पुरवणी अर्जांनंतर गव्हर्नरांनी त्यांच्या त्यातल्या त्यात अल्पतर मागण्यांना मान्यता दिली. 'लष्करी वा अन्य कामासाठी सरकारला जेव्हा आवश्यकता नसेल तेव्हा 'एस्प्लनेड परेड ग्राऊंड' नेटिव क्रिकेटपटुंना वापरण्याची अनुज्ञा द्यावी' अशी सूचना देण्यात आल्या. गोऱ्यांच्या पोलोपेक्षा नेटिवांच्या क्रिकेटला अग्रक्रम दिला जावा हे गोऱ्यांना खपावे कसे? त्यांनी प्रती चढाई केली. वर्षानंतर सरकारी हुकूम जारी झाला : आठवड्यातून दोन दिवस वादग्रस्त ग्राऊंडवर पोलो खेळण्याची गोऱ्यांना मुभा असावी. ज्यांचा अजिबात प्रभाव नव्हता, ज्यांना कुठल्याही प्रकारचे महत्त्व नव्हते अशा 'दुबळ्या आणि पिग्मी *(नेटिवे)* क्रिकेटपटुंवरील' अतिशय शक्तिशाली असलेल्या गोऱ्या जंटलमनांची, 'प्रतिष्ठेच्या आगीत धगधगणाऱ्यांची' ही जीत होती. परंतु १८९१ मध्ये लॉर्ड हॅरीस नवीन गव्हर्नर म्हणून इंग्लंडहून आले तेव्हा पिग्मींनी पुनश्च डोके वर काढले. हजाराच्यावर क्रिकेटपटुंनी यात हिंदू मुस्लीम व पारशी होते– त्यांना एक पत्र पाठवले. त्यात या वादाची पूर्वपीठिका देऊन धारदारपणे विचारले की क्रिकेटच्या मूळ गावी अशा प्रकारचे अतिक्रमण खपवून घेतले जाईल का? हॅरीस हे प्रसिद्ध क्रिकेटपटू आहेत, इंग्लंडचे ते कर्णधार होते, मेरीलेबोन क्रिकेट क्लब'चे ते एक आधारस्तंभ आहेत. याची अर्जदारांना कल्पना होती. मुंबईच्या क्रिकेटपटुंनी अर्जात नमूद केले. त्यांचा *पूर्ण* विश्वास आहे की गव्हर्नरमहाशयांना *पूर्ण* कल्पना आहे की इंग्लंडमध्ये केवळ क्रिकेटसाठीच मोठी ग्राऊंड्स

राखून ठेवण्यात येतात आणि हिरवळीची पोलो-तट्टूंनी नासधूस करावी ही कल्पनाच मुळी वरिष्ठांना *(किंवा क्रिकेटपटुंना)* सहन करणे केवळ अशक्यच !

क्रिकेटपटू आणि वरिष्ठ अधिकारी या नात्याने हॅरीस यांनी वाद चतुराईने मिटवला. समुद्रालगत नव्याने भराव करून तयार करण्यात आलेली जागा नेटिव क्रिकेटपटुंसाठी उपलब्ध करून दिली. या जागेची तीच प्लॉटमध्ये विभागणी करण्यात आली आणि हिंदू, पारशी आणि इस्लाम जिमखान्यांसाठी एकेक प्लॉट देण्यात आला. शहरातील प्रमुख धार्मिक गटांचा राग शमवून (गोऱ्यांचा) पोलो आणि (नेटिवांचा) क्रिकेट यांच्यामधील झगडा अशा तऱ्हेने मिटवला गेला. या संघर्षाच्या संदर्भात लिहिणाऱ्या इतिहासकाराने पुढील निष्कर्ष काढला : 'जगातील कुठल्याही सरकारने आणि राज्यकर्त्याने, आपणहून, तत्परतेने वा हसतमुखाने कुठलेही हक्क वा विशेषाधिकार जे खरे तर त्यांचे असतात, रयतेला कधी दिले नव्हते. इतिहास आपल्याला पटवतो की अशा गोष्टी नेहमीच सातत्याने झगडा दिल्यानंतरच मिळतात.'

या राजकीय पाठाला *(ज्याची सत्यता सार्वकालिक आहे)* (एका साध्या सैद्धांतिक पाठाची) पुरवणी जोडू शकतो. ज्यात क्रीडाविषयक रिवाजांचा अतर्भाव असतो तो व्यापक सामाजिक संदर्भ टाळून, ते रिवाज तपासणे, उचित नव्हे. सांप्रत, क्रीडा-इतिहासाकडे बघण्याचे दोन दृष्टिकोन आहेत. पहिला : बारकाईने *(वा संकुचितपणे)* पुढील गोष्टींवर लक्ष केंद्रित करतो : खेळाचा रिवाज, त्याचे आश्रयदाते व खेळाडू यांची पार्श्वभूमी, त्यांची मंडळे आणि स्पर्धा यांची होत गेलेली उत्क्रांती आणि तो लाभदायक आहे किंवा नाही. दुसरा मार्ग, जो इथे पसंत केलेला आहे. व्यापक जिज्ञासा आणि प्रस्तुतता यांच्याकडे निर्देश करण्यायोग्य एक लक्षणीय उदाहरण म्हणून खेळाकडे पाहतो. हा दृष्टिकोन खेळाकडे पाहातो एक relational idom म्हणून, समाजाची मूल्ये, पूर्वग्रह, विभागणी आणि ऐक्य साधू शकणारी प्रतिके अर्कागत आविष्कृत करणाऱ्या उपक्रमाचे एक क्षेत्र म्हणून. ब्रिटिश राज्यामधील मुंबईतील क्रिकेटच्या इतिहासावरील प्रस्तुत निबंधात पूर्णपणे विभक्त असलेल्या समाजांतील दरी आणि ताणतणाव यांचे एक लघुरूप म्हणून या खेळाचा अभ्यास केलेला आहे. क्रिकेटचा खेळ आधुनिक भारताच्या इतिहासाच्या अभ्यासासाठी एक महत्त्वपूर्ण सूक्ष्म दृष्टी पुरवू शकतो. विशेषत्वाने वंश, जात आणि धर्म यांच्या संदर्भात. भारतीय इतिहासाला विळखा घालून बसलेली ही त्रयी.

## २
## मूलारंभ आणि संस्था

अठराव्या शतकाच्या मध्यावर ब्रिटिश सोजीर व नाविक यांनी क्रिकेट हिंदुस्थानात

आणला. स्वत:च्या बंगल्यांच्या आवारात आणि कँटोन्मेंटमध्ये ते आपापसात क्रिकेट खेळत. प्रारंभीचे सामने वेगवेगळ्या सैनिकी तुकड्यांमध्ये वा वसाहतीमधील वेगवेगळ्या उपनगरांमध्ये खेळले जात. क्रिकेट खेळणारे पहिले नेटिव म्हणजे मुंबईचे पारशी. शिक्षित, भरभराटलेली आणि पाश्चात्यांचा प्रभाव असलेली ही जमात. पर्शियामधून परागंदा झाल्यानंतर हिंदुस्थानात आश्रय घेणाऱ्या जमातीची संस्कृती भोवतालच्या हिंदुवासियांहून भिन्न होती. १८३० मध्ये पारशी मुलांनी गोऱ्या सोजिरांचे अनुकरण करण्यास सुरुवात केली. क्रिकेट स्वत:च्या शक्कलेनुसार ते खेळू लागले. यष्टींच्या जागी त्यांनी हॅटचा वापर केला. छत्रीचा उपयोग बॅट म्हणून करण्यात आला. जुन्या चामड्याच्या तुकड्यात चिंध्या भरून तो शिवून बॉल तयार करण्यात आला. याच मुलांनी पुढे १८४८ मध्ये 'ओरिएन्टल क्रिकेट क्लब'ची स्थापना केली. १८५० ते १८६० या दरम्यान किमान तीस पारशी क्लब अस्तित्वात आले होते. ब्रिटिश व्हॉय्सरॉय, वरिष्ठ शासकीय अधिकारी तसेच रोमन देवता यांची नावे त्यांनी क्लबांना दिली होती. उदाहरणार्थ : ग्लॅडस्टन, रिपन, ज्युपिटर, मार्स इ. शासकाच्या बरोबरीचे संबंध दृढ करण्याचे एक साधन म्हणून सधन होऊ लागलेल्या पारशी बुर्ज्वांनी क्रिकेटला प्रोत्साहन दिले तर उष्णकटिबंधातील तळपत्या सूर्याने शतकानुशतके शोषून घेतलेल्या त्यांच्या वंशाच्या शारीरिक जोमाला या खेळाद्वारे पुन्हा जोष येईल या धारणेने बुद्धिमंतांनी या खेळाचे स्वागत केले.

हिंदूंनी क्रिकेट खेळायला सुरुवात केली ती काहीशा जातीय स्पर्धेच्या भावनेने. सामाजिक कारणामुळे आणि औद्योगिक स्पर्धेमुळे हिंदू आणि पारशी एकमेकांकडे कट्टर प्रतिस्पर्धी म्हणूनच पाहत असत. रामचंद्र विष्णु नावलेकर (१८६१ मध्ये) हा पहिला ज्ञात हिंदू क्रिकेटपटू आणि प्रभू जातीच्या तरुणांनी १८६६ मध्ये स्थापन केलेला 'बाँबे युनियन' हा हिंदूचा पहिला क्लब. जातीजातींनुसार आणि विभिन्न भागांनुसार हिंदू क्रिकेटपटू एकत्र येत. एकोणिसाव्या शतकाच्या अखेरच्या दशकामधील ही काही नावे पाहा : 'गौड सारस्वत क्रिकेट क्लब', 'क्षत्रिय क्रिकेट क्लब', 'गुजराती युनियन क्रिकेट क्लब', 'मराठा क्रिकेट क्लब', तेलगु यंग क्रिकेटर्स' इ. इ.

लक्ष्मणी आणि तय्यबजी या घराण्यांच्या पुढाकारामुळे मुस्लिम क्रिकेट अस्तित्वात आला शाळांचे संस्थापक म्हणून ही घराणी ख्याती पावली होती, तद्वतच कोर्टकचेऱ्यांमध्येही त्यांच्या नावांचा दबदबा होता. तय्यबजींनी १८८३ मध्ये 'मुस्लिम क्रिकेट क्लब' स्थापण्यास सहाय्य केले. छोट्या छोट्या जातींनीही क्रिकेट क्षेत्रात स्वत:ची वेगळी चूल मांडण्यास प्रारंभ केला. उदाहरणार्थ, मंगलोरमधून आलेल्यांचा 'मंगलोरियन कॅथॉलिक क्रिकेट क्लब', 'पोर्तुगिजांच्या अंमलाखालील गोव्यामधून आलेल्यांचा, 'इंन्स्टिट्युटो लुसो इंडियन क्रिकेट

क्लब' आणि 'बॉंबे ज्युईश क्रिकेट क्लब !

एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस क्रिकेटने मुंबईमध्ये अमाप लोकप्रियता मिळवली होती. दर शनिवार-रविवार डझनभर क्रिकेटचे सामने मैदानावर खेळले जात होते. १८८६ मध्ये मुंबईचे महापौर फिरोझशहा मेहता उद्गारले. 'या मर्दानी खेळात अटीतटीन आणि उत्सुकतेन' सहभागी झालेले उत्साही पारशी आणि हिंदू क्रिकेटपटू मैदानावर खेळत आहेत या दृश्याहून अन्य कुठल्याही दृश्यानं माझ्या डोळ्याचं पारणं फिटण्याजोगं नाही !

आपल्या प्रजेने आपला राष्ट्रीय खेळ उचलला याचे ब्रिटिशांना विशेष काही वाटले नाही. हिंदवासियांचे पोषाख आणि त्यांचे तंत्र यांची मात्र त्यांनी खिल्ली उडवली. १८७० मध्ये मुंबईमधील एका पत्रकाराने काही हिंदू खेळाडूंबद्दल लिहिले की, 'त्यांचे चट्यापट्याचे कपडे (फलंदाजीच्या वेळी) धाव घेत असताना व्यत्यय आणत होते आणि क्षेत्ररक्षण करतेसमयी बोर्डिंगमधल्या शाळकरी पोरींगत ते चेंडू फेकत होते.' या काळात शासक आणि शासित यांच्या खेळामधील तफावत नि:संशयपणे प्रचंड होती. एवढी की काही प्रारंभीच्या सामन्यांचे वर्णन पुढीलप्रमाणे केले जात असे : 'बॅट्स घेतलेले नेटिव विरुद्ध छत्र्या घेतलेले अधिकारी.' आस्ते हिंदवासियांनी क्रिकेटमध्ये प्रावीण्य मिळवले. त्यासाठी प्रथम त्यांनी अडचण ठरणारे धोतर टाकले आणि फ्लॅनेलच्या पँटी ते वापरू लागले. १८८० मध्ये रॉबर्ट हेन्डर्सन या नामवंत सरेतर्फे खेळणाऱ्या क्रिकेटपटूला पारश्यांनी 'कोच' म्हणून बोलावून घेतले. त्यांनी केलेल्या मार्गदर्शनाबद्दल ते कृतज्ञ राहिले. 'मुंबईहून प्रयाण करतेसमयी पुष्पहार घालून त्याचा गौरव करण्यात आला आणि वादळी हवामानात खवळलेला समुद्र शांत राहावा म्हणून रंगकाम केलेला नारळ त्याच्या हस्ते समुद्रात फेकण्यात आला'– आदर व्यक्त करण्याची पारश्यांची ही लक्षणीय कृती ! (एफ्. एस्. ॲशले कूपर, 'सम नोट्स ऑन क्रिकेट इन इंडिया', क्रिकेटर (वासंतिक वार्षिक १९२७) पारशी क्रिकेटने एव्हाना पुरेशी प्रगती केली होती. त्या बळावर १८८६ आणि १८८८ मध्ये या जमातीने दोन संघ इंग्लंडमध्ये पाठवण्यात पुढाकार घेतला होता.

मुंबई नगरीतील गोऱ्यांचे प्रातिनिधित्व करणाऱ्या 'बॉंबे जिमखान्या'ने १८७७ मध्ये आपल्या विरुद्ध सामना खेळायला पारश्यांना आमंत्रण दिले. आणि त्यानंतर दरवर्षी असे सामने खेळले जाऊ लागले. गोऱ्यांवर मात करायला पारश्यांना दहा वर्षे लागली. दरम्यान, १८८६ पासून हिंदूही गोऱ्यांबरोबर वर्षातून एकदा सामना खेळू लागले. पारशी, हिंदू आणि इस्लाम जिमखान्यांमुळे खेळाला प्रोत्साहन मिळत होते. त्यांच्या अखत्यारीखालील छोट्या छोट्या असंख्य क्लबांवर देखरेख करणे व त्यांना मार्गदर्शन करून त्यांच्या खेळात प्रगती घडवून आणण्याचे महत्त्वपूर्ण कार्य ते करीत.



अनुक्रमणिका

पारशी गोऱ्यांविरुद्ध सामने खेळू लागले होते. आणि १८८६ पासून हिंदूही. १९०७ मध्ये तिरंगी सामने सुरू झाले तेव्हा या वार्षिक स्पर्धेने हे तिन्ही संघ एकत्र आणले. पाच वर्षांनंतर मुस्लिम त्यात सहभागी झाले आणि सामने चौरंगी झाले. तरीही बऱ्याच जाती अद्यापि या स्पर्धेबाहेर राहिल्या होत्या. म्हणून १९३७मध्ये उरल्यासुरलेल्यांचा संघ 'रेस्ट' या नावाने या स्पर्धेत सहभागी झाला आणि स्पर्धा पंचरंगी झाली.

१९४६ पर्यंत चालू असलेल्या या स्पर्धेने हिंदुस्थानातील क्रिकेटला उर्जितावस्था यावी यासाठी विविध मिषांनी या जडणघडणीच्या काळात प्रयत्न केले. प्रत्येक जिमखाना देशभरातील खेळाडू मिळवत असे, आपापल्या संघाला प्रशिक्षण देत असे, सामुदायिकरित्या नियमावली करीत असे, अंती घसघशीत आर्थिक प्राप्तीची वाटणी करीत असे. इस्लाम जिमखाना बव्हंशी अलिगढमधील 'मुस्लीम विद्यापीठा'च्या विद्यार्थ्यांवर विसंबून होता. या विद्यापीठातील ब्रिटिश प्राध्यापक सांघिक भावना आणि जमातीतील एकोपा वाढवण्याचे एक साधन म्हणून खेळांना प्रोत्साहन देत. बडोदे, इंदूर येथील संस्थानिकही चौरंगी आणि पंचरंगी सामने मनात ठेवूनच उदयोन्मुख खेळाडूंना आपल्या पदरी नोकरीला ठेवत. पारश्यांचा क्रिकेट बव्हंशी मुंबईपुरताच मर्यादित राहिला होता. गोऱ्यांच्या बाबतीतही तशीच परिस्थिती होती. परंतु वारंवार पराभवाचे फटके बसू लागल्यावर मात्र दार्जिलिंगच्या चहाच्या मळ्यावर कामानिमित्त स्थायिक झालेले किंवा सीमेवरील रेजिमेंटवर नियुक्त झालेले 'ऑक्सब्रिज ब्ल्यूज' यांची कुमक घेऊन शासक आपला संघ बलवान करू लागले होते.

चौरंगी सामन्यांमधील चढाओढ, बघताबघता जमातीच्या बळाची आणि सामाजिक संलग्नतेची निदर्शक बनली. पारशी, मुस्लीम आणि हिंदू संघांना प्रचंड अनुयायी होते. 'हे फॅन्स' सल्ला देण्यास आणि चिकित्सक मतप्रदर्शन करण्यास तत्पर असत. एका वर्षी पारश्यांनी मुस्लिमांकडून अनपेक्षितरित्या मार खाल्ला, तेव्हा पारशी जिमखान्याच्या वार्षिक सभेत मुख्य वक्त्याने पराभवाचे खापर खाण्यापिण्याच्या निष्काळजीपणावर फोडले. (बॉंबे क्रॉनिकल : ११ मे १९१४). हिंदू चाहत्यांची मागणी होती की, झटक्यागत येणारे उद्रेक क्रिकेट प्रेमींना अस्वस्थ करतात; त्यापेक्षा कायम स्वरूपाचे स्वास्स्य हिंदूच्या क्रिकेटमध्ये घेतले गेले पाहिजे. हिंदू त्यांचे उत्कृष्ट अकरा खेळाडू नेहमीच खेळवत नाहीत असा इतर क्रिकेट केंद्रांचा आरोप होता. १९१३ च्या ऑक्टोबरमध्ये पुण्यात एक सभा भरवण्यात आली होती. त्यात मुंबईतील 'हिंदू जिमखान्या'ला कळकळीचे आवाहन करण्यात आले की, हिंदूंच्या क्रिकेटचा उत्कर्ष साधण्यासाठी आणि स्थानिक भावना आणि संकुचित पूर्वग्रह निपटून टाकण्यासाठी त्याने सहकार्य करावे. (बॉंबे क्रॉनि. २८ नोव्हेंबर १९१३, ७ जुलै १९१४) संघाचा पराभव झाल्यास निवड-समितीला बळीचा बकरा बनवले जाई. १९२० च्या दशकात मुस्लिमांना एकापाठोपाठ लाजिरवाणे पराभव पत्करावे लागले, तेव्हा एका

संतप्त चाहत्याने 'बॉंबे क्रॉनिकल' मध्ये (७ डिसेंबर १९२९) तक्रार केली होती की, 'मैदानावर जे चाचणी-सामने झाले तेव्हा निवड समितीचे सदस्य तिथे फिरकलेही नव्हते; शिवाय अलिगढ कुमक मागवण्यासाठी काहीही हालचाल त्यांनी केली नव्हती. त्याने सवाल केला होता, चौरंगी सामन्यात आपला उत्कृष्ट संघ खेळवावा हे मुस्लीम शिकणार तरी कधी? ज्यात काही 'स्टफ' नाही असा संघ पाठवण्यापरीस न खेळणे हे ब्येस' (हे पत्र Z. A. B. या आद्याक्षराने प्रसिद्ध झाले होते शक्यता आहे ही व्यक्ती म्हणजे मुंबई आकाशवाणीचे डायरेक्टर व पुढे पाकिस्तान आकाशवाणीचे डायरेक्टर जनरल Z. A. Bukhari असावेत)

चौरंगी सामने खेळले जाऊ लागले त्याच्या दुसऱ्याच वर्षी, म्हणजे १९१३ मध्ये, 'रोमन फोरम सदृश' या शब्दांत या सामन्यांचे वर्णन केले गेले होते. या प्रसंगी क्रिकेटपटूंचे आणि त्यांच्या समर्थकांचे प्रदर्शनच भरत असे (बॉंबे क्रॉनि. ५ सप्टेंबर १९१३) सामने खेळले जात त्या मैदानांवर छोटेमोठे रंगीबेरंगी तंबू उभारले जात. आपल्या संघाला प्रोत्साहन देण्यासाठी हजारो प्रेक्षक गर्दी करीत असत. खेळल्या जाणाऱ्या सामन्यांचा वृत्तांत मैदानावरून धीरे धीरे शहराच्या इतर भागांत आणि त्याहून संथ गतीने देशात इतरत्र पोहोचत असे; रेडियो आणि 'बुश टेलिग्राफ'द्वारा. स्पर्धेचे दोन सप्ताह जेव्हा मैदानावर हिंदुस्थानातील उत्कृष्ट खेळाडू प्रतिस्पर्ध्यांवर मात करण्यासाठी अटीतटीने खेळत असत. म्हणजे क्रिकेट (आणि सामाजिक) मौसमाचा उत्कर्षबिंदू होता. १९२९ मध्ये एका निरीक्षकाने नमूद केले आहे की सामन्यांचे दिवस जवळ येऊ लागले की शहर 'एखाद्या कोपिष्ट साथीने झपाटले जात असे. हिंदुस्थानची ही प्रमुख क्रीडा लढत मुंबईची सुस्ती जशी झटकत असे तशी अन्य घटना नव्हती. लंडनमध्ये पॉपी डे, न्यू इअर्स इव्ह, व्हर्सिली बोट रेस, एप्सम, टेस्ट मॅचिस असतात. परंतु मुंबईमध्ये वर्षभर तुम्ही कामाच्या रगाड्यात रगडले जात असता– फक्त हा आठवडा वगळता' (बॉंबे क्रॉनि. २८ नोव्हेंबर १९२९).

क्रिकेट– वेड किती शिगेला पोहोचत असे हे तिकिटाच्या काळ्या बाजाराच्या भरभराटीवरून ध्यानी येते. 'बॉंबे जिमखान्या'वर सामने खेळले जातात. मैदानावर प्रेक्षक दाटीवाटीने उभे राहतात. प्रत्येक पॅव्हेलियन भरगच्च भरलेला असतो. शेकडो लोक घराच्या छपरावरून बरेचसे झाडावर चढून सामना पाहतात. (बॉंबे क्रॉनि. १३ डिसेंबर १९२३). खेळ जे खेळतात वा जे पाहतात त्यांच्यापुरताच जोष जल्लोष मर्यादित नव्हता. (शिंपी) त्यांच्या गिऱ्हाईकांचे आवश्यक ते कपडे शिकवण्यात गर्क असतात. कारकून, उद्योगधंदेवाले, सटरफटर काम करणारे (क्रिकेटवर) 'बेटिंग' करून थोडाफार पैसा मिळवण्याची संधी दवडत नाहीत. गाडीवाले आणि शाळेतील मुले तालस्वरात ओरडतात; आज्या मरतात; आजारामुळे कचेऱ्या ओसाड पडतात; कॉलेजमध्ये हजेरी घेतली जात नाही, कोर्टात काम

नसलेले बॅरिस्टर वॉडबी रोडवर लगबगीने ये-जा करीत असतात. (बॉंबे क्रॉनि. २८ नोव्हेंबर १९२९).

एकोणीसशे तिसच्या प्रारंभी रेडिओचे आगमन झाले, क्रिकेटच्या बातम्या आणि जमावाच्या आरोळ्या रस्त्यारस्त्यांमधून, गल्लीबोळांतून आणि समुद्रालगतच्या बंगल्या-बंगल्यांमधून ठणाणू लागल्या. बातम्यांसाठी कासावीस झालेले कर्मचारी जिथे रिसिव्हर बसवलेले असत अशा हॉटेलात आणि अन्य सार्वजनिक ठिकाणी गर्दी करीत. (बॉंबे सेन्टिनेल, २३ नोव्हेंबर १९३७). परंतु रेडिओ यायच्या आधीही 'हॉर्नबी रोडच्या कॅरिडॉर्स'मध्ये प्रेक्षकांच्या प्रतिक्रिया तुम्ही ऐकू शकत होता, काहीतरी दणदणीत असे घडत आहे याची जाणीव तुम्हाला होऊ शकत होती, विशेषत: कारकुनांव्यतिरिक्त कचेऱ्या ओस पडत होत्या, जुन्या पुराण्या फायलींचे गठ्ठे पसरले आहेत अशा अंधाऱ्या जिन्यांमधून जिथे जावे लागते अशा मोडकळीस आलेल्या खोल्यामंध्ये दूरवरून दहा हजार प्रेक्षकांचा जल्लोष पोहोचत होता, परिणामी काम करणे मुष्किल होत असे, आणि अवघी मुंबई नगरी त्या उन्हात न्हालेल्या हिरवळीवर आकुंचित झाल्याचे दिसे, तिथे आमचे हिरो हृदयाची धडकन वाढवत होते. (बॉंबे क्रॉनि. २ डिसेंबर १९३४).

चौरंगी सामन्यांचा नेटिव 'तमाशा' असा उल्लेख करीत, नगरीचे जीवन ठप्प करणारा एक जसन. १९२६ मध्ये पुण्याला हे सामने खेळले गेले, पुणे म्हणे मुंबईचे प्रतिस्पर्धी शहर या प्रसंगी एका पत्रकाराने मिस्किलपणे लिहिले : 'शक्यता आहे हा उत्सव चालू असते. समयी बळावणारा आजार आता (मुंबईत) उद्भवणार नाही आणि आज्यांना सरणावर चढावे लागणार नाही यास्तव कचेऱ्यांनी समाधानाचा श्वास सोडला असणार' (बॉंबे क्रॉनि. १३ सप्टेंबर १९२६)

मुंबई क्रिकेट महोत्सवाने अशाच प्रकारच्या सामन्यांच्या बऱ्याच मालिका उबवल्या. १९१६ मध्ये सुरू करण्यात आलेले सिंध चौरंगी सामने (१९२३ मध्ये ते पंचरंगी झाले) दहा एक हजार प्रेक्षक खेचत होते. १९२० मध्ये मध्य प्रांतिय चौरंगी सामने सुरू झाले. हे सामने नागपूरमध्ये वर्षातून एकदा होत. १९३७ मध्ये दिल्लीला तिरंगी सामन्यांना प्रारंभ झाला. त्यात हिंदू, मुस्लीम आणि 'रेस्ट' भाग घेत. लाहोरमध्येही हिंदू, मुस्लीम आणि शीख यांच्यामध्ये तिरंगी सामने होऊ लागले. दक्षिणेत वर्षातून एकदा होणारी 'मद्रास प्रेसिडेंसी मॅच' ही एक लक्षणीय घटना ठरली होती. त्या प्रांतातील नेटिव आणि गोरे यांच्यामध्ये हा सामना होत असे.

मुंबईच्या धाटणीवर सुरू झालेल्या या प्रादेशिक खेळावर स्थानिक संख्याबळाच्या बरोबरीने सत्ता-संबंधाचाही प्रभाव होता. कराचीमध्ये पारश्यांचा संघ मजबूत होता. त्यांची ती

दुसरी नगरीच होती. परंतु त्यांना दिल्ली व लाहोर येथे संघ बनवता आला नव्हता. तिथे त्यांची संख्या नगण्य होती. आणि व्यापारउदीमातील आर्थिक वर्चस्व जुजबी होते. 'जमाती'ची व्याख्या सैल होऊ शकत होती. मुंबईमध्ये आणि दिल्लीमध्ये हिंदूंच्या संघामधून खेळण्यास शीख राजी असत. परंतु पंजाबमध्ये (विशेषत: लाहोर मध्ये, १८४० पर्यंत हे शहर शीख साम्राज्याची राजधानी होते) मात्र स्वतंत्र संघासाठी आग्रह धरून स्वत:ची वेगळी चूल त्यांनी मांडली होती. नागपूर मद्रास मध्ये गोरे युरेशियन्स आणि हिंदी ख्रिश्चन यांना आपल्या संघात स्थान देत. कारण नागपूर तसे एका बाजूला असलेले छोटे शहर होते. मद्रास ख्यातनाम सर थॉमस मन्रो (दुसऱ्या दशकातील गव्हर्नर) याच्या काळापासून पुरोगामी होते.

तथापि, मुंबईमध्ये, जातीच सीमारेषा अधिक काटेकोरपणे आखलेल्या असत. उदाहरणार्थ, १९३० मध्ये, जेव्हा उदयोन्मुख हिंदी कॅथॉलिक क्रिकेटपटूंना कुठल्याही संघात स्थान मिळणे दुरापात झाले होते, तेव्हा 'हिंदू जिमखान्या'ने गोऱ्यांना सांगितले की 'ख्रिश्चन इलेव्हन' म्हणून त्यांनी संघाची नव्याने उभारणी करावी, जेणेकरून चौरंगी सामन्याची चौकट कायम राहील. 'बॉंबे जिमखान्या'ची भूमिका ताठर होती. या आधी आपल्या संघामधून त्यांनी ऑस्ट्रेलियन खेळाडू खेळवले होते परंतु त्रिनिदादचा प्रसिद्ध क्रिकेटपटू लिअरी कॉन्स्टंटाईनला (१९३४ मध्ये तो हिंदुस्थानात आला होता) काळा म्हणून संघात घेण्याचे नाकारले होते. हिंदुस्थानात जन्मलेल्या ख्रिश्चनांचा अंतर्भाव त्यांनी आपल्या संघात करणे कधीच शक्य नव्हते. हा उघड उघड प्रतिष्ठेचा प्रश्न होता. गोऱ्यांच्या बरोबरीने गौरेतरांची भरती केल्याने आपली जात बाटेल अशी भीती, बॉंबे जिमखान्याच्या 'गोऱ्या' ब्राह्मणांना वाटत होती. (बॉंबे क्रॉनि. १३ नोव्हेंबर १९३४) परिणामी, मुंबईच्या कॅथॉलिक जिमखान्या'च्या सततच्या दबावाने, १९३७ मध्ये 'रेस्ट' हा संघ अस्तित्वात आला. आणि सामने पंचरंगी झाले. 'रेस्ट'च्या संघात वेगवेगळ्या काळी हिंदी रोमन कॅथोलिक, प्रॉटैस्टंट, सिरीयन ख्रिश्चन यांच्या बरोबरीने युरेशियन, सिंहली बौद्ध आणि ज्यू यांचा समावेश केला जात असे.

ब्रिटिश अधिपत्याखालील साऱ्या हिंदुस्थानात, त्यानंतर जातीय पातळीवर स्पर्धात्मक क्रिकेट आयोजित केला जाऊ लागला. दि. ब. देवधर या प्रसिद्ध क्रिकेटपटूने 'द मार्च ऑफ इंडियन क्रिकेट' (१९४८) या स्वलिखित पुस्तकामध्ये लिहिले आहे, 'अव्वल हिंदी क्रिकेटमध्ये, जातीयतेने प्रवेश केला याचे एकमेव कारण हिंदुस्थानातील गोरे साहेब. सुरुवातीच्या काळात हिंदी लोकांबरोबर वागताना सातत्याने व अगदी उघड उघड त्यांचा 'सुपीरियर कॉंप्लेक्स' आढळत असे. ब्रिटिश साम्राज्याची रखवाली करायला आलेल्या ब्रिटिश अधिकाऱ्यांना त्यांच्या वरिष्ठांनी कानमंत्र दिला होता की त्यांनी 'नेटिवां'शी (हिंदी

शेक्सपिअरचे नाटक वा मेकॉलेचा एखादा निबंध शिकण्यापरीस नेटिवांच्या व्यक्तिमत्त्वाला हे अधिक उपयुक्त !

हे अवतरण जी. एम. ट्रेव्हेलिअन या केंब्रिज इतिहासकाराच्या एका विधानाचे स्मरण करून देते. ते विधान असे : फ्रेंच उमरावांना त्यांच्या शेतकऱ्यांबरोबर क्रिकेट खेळण्याची जर का सवय असती तर त्यांचे प्रासाद १७८९ मध्ये जाळले गेले नसते (इंग्लिश सोशल हिस्टरी : १९४५) तथापि, क्रिकेट, शासक आणि शासित यांच्यामधील ऐक्याऐवजी बऱ्याच वेळा दुहीला कारणीभूत झाला आहे. नेटिव क्रिकेटमुळे जेव्हा साम्राज्याच्या प्रतिष्ठेला धक्का पोहोचला तेव्हा प्रतिष्ठेची बाब नेहमी वरचढ ठरत होती. पोलो विरुद्ध क्रिकेट हा वाद यापूर्वीच सांगितला आहे. आणखीन एक मासलेवाईक उदाहरण : एकदा ब्रिटिश कॉन्स्टेबलची बायको संध्याकाळचा फेरफटका मारीत असता तिला बॉल लागला. (दुखापत गंभीर नव्हती) म्हणून ओव्हल मैदानावर खेळण्यास पारशी क्रिकेटपटूंना मज्जाव करण्यात आला होता.

हिंदूंबरोबरचे ब्रिटिशांचे संबंध पाहता, क्रिकेटचा प्रसार संघर्षाला कारणीभूत ठरत होता हे स्पष्ट होते. हिंदू हा बऱ्याच प्रमाणात प्रभावी धार्मिक गट होता, पारश्यांचा आणि मुस्लिमांचा तसा नव्हता. शिवाय ब्रिटिशांनी आपल्यावर राज्य करावे याला त्यांचा सर्वांहून प्रखर विरोध होता. १९०६ च्या फेब्रुवारीमध्ये हिंदू आणि गोरे यांच्यामध्ये एक प्रातिनिधिक सामना झाला. या सामन्यात प्रथमच संपूर्ण 'प्रेसिडेन्सी'मधून (गुजरात, महाराष्ट्र व सिंध) खेळाडू निवडण्यात आले होते. प्रतिकूल परिस्थितीतही सामना हिंदूंनी जिंकला. हा सामना मुंबईत खेळला गेला होता आणि या विषयाची वार्ता, ट्रेनमधून आणि तारायंत्राद्वारे हळूहळू देशभर पसरली. जेव्हा ती दूरवरील पंजाबात पोहोचली तेव्हा लाहोरमधील 'ट्रायब्यून' या राष्ट्रीय बाण्याच्या आघाडीच्या वृत्तपत्राला अस्मान ठेंगणे झाले. समर्पक साम्याचा शोध घेत असताना त्या वृत्तपत्राला अलीकडेच आशियाने युरोपवर मिळवलेल्या विजयश्रीचे स्मरण झाले. हा विजय जपानने रणमैदानात रशियावर संपादन केला होता. विजयामध्ये हिंदू क्रिकेटपटू त्यांच्या जपानी लष्करी प्रतिरूपाएवढेच आदबशीर होते; आर्थर बंदरचा पाडाव झाल्यानंतर आणि त्यानंतर मिळत गेलेल्या साऱ्या विजयामध्ये आत्मसंयमाने वागणाऱ्या जपान्यांना साजेसेच हिंदूंचे वर्तन होते, अशा प्रकारची जीत इतिहास कधी नमूद करीत नाही. परंतु जर का निकाल उलटा लागला असता तर इंग्रज क्रिकेटपटू विजयोन्मादाने अचकट झाले असते, मिजाशीचे प्रदर्शन त्यांनी केले असते असेही, 'ट्रायब्यून'ने रोखठोक लिहिले. या संदर्भात बोअर युद्धप्रसंगी ब्रिटनला जो राष्ट्रभक्ती उन्माद चढला होता त्याचे स्मरण करून देण्यात आले होते (२३ फेब्रुवारी १९०६) पुढील वर्षी हिंदूंनी गोऱ्यांचा पुन्हा पराभव केला. त्यासमयी टिळकांच्या 'मराठा'मधून उपरोधाने इंग्रजांच्या खिलाडूवृत्तीचे आभार मानण्यात

आले होते. आभार का? तर गेली दोन वर्षे हिंदूंना त्यांच्या शासकाच्या स्तरावर उभे राहण्यास आणि अन्यत्र कुठे नसला तरी क्रिकेटच्या मैदानावर क्वचित त्यांच्याकडून पराभूत होण्यास अनुमती दिली (८मार्च १९०७)

ब्रिटिशांचे बोलणे आणि वागणे यांमधील तफावत निदर्शनास आणून देण्याची संधी हिंदूंनी क्रिकेटच्या मैदानावर कधी दवडली नाही. १९१६ मध्ये हिंदू आणि गोरे यांच्यात चौरंगी सामना चालू होता. या सामन्यात प्रसिद्ध इंग्रज क्रिकेटपटू, नाणावलेला मेजर अंपायरशी मांडला आणि त्याचा निर्णय मान्य करण्यास त्याने नकार दिला. अंपायर होते, एम्. डी. पै. पै धीट होते. त्यांनी कडकपणे त्याला मैदानावरून जाण्यास फर्मावले. मेजरने चवताळून 'हिंदू जिमखान्या'ला एक पत्र लिहिले. त्यात अंपायरच्या लायकीबद्दल अविश्वास दर्शविला, त्याच्या व्यक्तिमत्त्वावर शिंतोडे उडवले. ब्रिटिश व्यक्तिमत्त्वाचा एक लक्षणीय घटक म्हणजे त्यांचा खिलाडूपणा असे समजले जाते. पण नेमका तोच या केसमध्ये गायब होता. जिमखान्याने मात्र हा वाद खिलाडू वृत्तीने हाताळला. थंड माथ्याने लिहिले की श्री. पै हे नावाजलेले अंपायर गणले जात असता त्यांना 'नालायक' म्हणता येणार नाही. पैंच्या व्यक्तिमत्त्वाविषयीचे मेजरचे दोषारोप फेटाळून लावताना म्हटले की ते पूर्णपणे खेळाच्या दृष्टीने अहितकारक आहेत आणि सर्वसामान्यपणे कटुता निर्माण करण्यासाठीच हेतूपूर्वक केलेले आहेत. आणि 'अंपायरच्या निर्णयाला आव्हान देण्याचा अधिकार क्रिकेटपटूला नाही कारण अंपायरचा निर्णय प्रत्येक गोष्टीत अंतिम मानला जातो.' (बॉंबे क्रॉनि. ९,११,२३ सप्टेंबर १९१६)

अशी आव्हाने शक्य होत होती याचे कारण क्रिकेटमध्ये हिंदू तुल्यबळ ठरत होते; शिवाय राष्ट्रीय चळवळीचा वाढता खंबीरपणाही याला कारणीभूत ठरत होता. चौरंगी सामन्यांच्या प्रारंभीच्या काळात या सामन्यांमार्फत ब्रिटिशांच्या सत्तेचे प्रदर्शन केले जात असे. यातील एक विधी होता, मुंबईच्या गव्हर्नराची सामन्याच्या वेळची उपस्थिती. पहिल्या महायुद्धाच्या वेळी, गव्हर्नर लॉर्ड विलिंग्डन (माजी केंब्रिज क्रिकेटपटू आणि कट्टर साम्राज्यवादी) दुपारचे सामन्याला हजर राहत. त्यांच्या संगे त्यांची पत्नी. चहापानाच्या मध्यंतरात बॉंबे जिमखान्याचा अध्यक्ष त्यांना घेऊन तंबूमध्ये जात असे. प्रत्येक जमातीतील नामवंत खेळाडूंशी हस्तांदोलन करून त्यांचे पुष्पहार गव्हर्नर दिमाखात स्वीकारीत असे. तथापि, युद्ध समाप्तीनंतर हा सोहळा तणावाला कारणीभूत ठरू लागला. १९२१ मध्ये प्रिन्स ऑफ वेल्स (भावी आठवा एडवर्ड) भारताच्या भेटीला आले होते. त्यांच्या कार्यक्रमांमध्ये चौरंगी सामन्याला भेट समाविष्ट होती. राजपुत्रावर बहिष्कार घालण्याचे आवाहन महात्मा गांधींनी हिंदवासीयांना केले होते. शिवाय बरेच पुढारी तुरुंगात डांबले



अनुक्रमणिका

गेल्यामुळे लोकांच्या भावना प्रक्षुब्ध झालेल्या होत्या. राष्ट्रवादी क्रिकेटप्रेमींनी जाहीर केले की, सामन्याच्या तारखा आणि राजपुत्राच्या भेटीच्या तारखा एकाच वेळी याव्यात यात योगायोग नव्हता तर त्या तशा येतील याची काळजी आधीच अक्कलहुषारीने घेतली होती. नाही तरी त्या एकनिष्ठ पाठिराख्यांना राजपुत्राचा जयजयकार करायला आणि त्याचे स्वागत उत्साहाने करण्यात येत आहे असा देखावा करण्यासाठी वीस हजार नेटिवांचा असा मोठाला जमाव मिळाला असता कुठे? त्यांनी क्रिकेटच्या चाहत्यांना आवाहन केले की, तिकिटांवर ते जे पैसे खर्च करणार ते त्यांनी मलबारमधील दंगलीत ज्यांचे बळी गेले त्यांच्या कुटुंबियांसाठी काँग्रेसने उभारलेल्या 'रिब्लीफ फंडा'ला पाठवून द्यावेत. एका दगडात दोन पक्षी !

प्रिन्स ऑफ वेल्सच्या मुंबईतील आगमनाच्या रात्री शहराचा बराचसा भाग अंधारात होता. संतप्त निदर्शकांच्या जमावाने रस्त्यावरील दिवे फोडून टाकले होते. क्रिकेट सामन्यावरील बहिष्कार *(त्यानंतर काही दिवसांनी सुरू झाले)* अंशत: सफल झाला. अंतिम सामन्याच्या वेळी एक दिवस राजपुत्राचे काही काळ मैदानावर दर्शन झाले. तो सामना पारशी गोरे यांच्यामध्ये असल्यामुळे निभावून गेले, जर का पारश्यांच्या जागी हिंदू असते तर राजपुत्राला *(वा त्यांच्या यजमानांना)* भेट रद्द करणे समंजसपणाचे ठरले असते. *(बॉंबे क्रॉनि. २२ नोव्हेंबर १९२१)*

## ४
## जात आणि संघर्ष

वरील घटनेला दहा वर्षे उलटून गेली आणि दुसऱ्या एका राजकीय लढ्याला गांधीजींना सामोरे जावे लागले. या वेळी प्रतिस्पर्धी ब्रिटिश राजपुत्र नव्हता, हिंदुस्थानातील अस्पृश्यांचा प्रवक्ता होता. १९३१ च्या गोलमेज परिषदेनंतर सरकारने निर्णय घेतला की, अस्पृश्यांना वेगळे मतदार संघ द्यायचे. या निर्णयाचे अस्पृश्यांचे पुढारी डॉ. भीमराव आंबेडकर यांनी स्वागत केले तर गांधीजींनी विरोध दर्शवला. गांधीजींना वाटले की, उच्च वर्णियांमध्ये अंतर्बाह्य सुधारणा घडून यावी, अस्पृश्यतेच्या 'पातका'चा कलंक धुतला जावा म्हणून त्यांनी स्वत: जे प्रयत्न चालवले होते त्यांना या निर्णयामुळे बाधा येईल. १९३२ च्या सप्टेंबरमध्ये पुण्यातील येरवड्याच्या तुरुंगात कारावास भोगत असता वेगळ्या मतदार संघाच्या विरोधात त्यांनी वादग्रस्त आमरण उपोषण चालू केले. उपोषण बरेच दिवस चालले. त्यांच्या जीविताला धोका निर्माण होऊ शकला असता. पण त्यांचे प्राण वाचले, केवळ ते आणि अस्पृश्यांचे तीन प्रतिनिधी यांच्या दरम्यान समेटाचा करार झाल्याने.

या करारावर तिघा प्रतिनिधींच्या सह्या होत्या : डॉ. आंबेडकर, एम्. सी. राजा आणि पी. बाळू. अस्पृश्यांचे पुढारी व भारतीय घटनेचे एक शिल्पकार म्हणून डॉक्टरसाहेबांचे नाव

सर्वश्रुत आहे. दक्षिणेतील एक थोर सामाजिक कार्यकर्ता म्हणून राजा ओळखले जातात. ही दोन्ही नावे आधुनिक भारतीय इतिहासाच्या विद्यार्थ्यांच्या चांगल्याच परिचयाची आहेत. पण या प्रतिनिधी मंडळाचे तिसरे सदस्य बाळू हे कोण? या प्रश्नाचे उत्तर शोधून काढण्याचे परिश्रम या वादावर लिहिणाऱ्या इतिहासकारांनी घेतलेले दिसत नाहीत. (उदा. दलित्स अँड द डेमॉक्रॅटिक रेव्होल्यूशन' : Gail omveat '१९९४) शक्यता आहे, बाळू कोण ते त्यांना ओळखून काढता आले नसेल. बाळू राजकारणी नव्हते, सामाजिक कार्यकर्ते नव्हते, ते होते प्रख्यात क्रिकेटपटू, ज्यांच्या गोलंदाजीने पारशी आणि गोरे यांच्याशी झालेल्या सामन्यात हिंदूंना विजय मिळवून दिले होते. ज्याने, निदान पश्चिम महाराष्ट्रात नावलौकिक संपादन केला होता अशी अस्पृश्यांमधली पहिली सार्वजनिक व्यक्ती म्हणजे बाळू पालवणकर. त्यांच्याविषयी त्यांच्या जातीत आणि जातीबाहेरही नितांत आदर होता. विद्यार्थीदशेतील आंबेडकरांना या अस्पृश्य गोलंदाजाच्या ख्यातीचा अभिमान वाटत होता. मुंबईच्या 'सिडनॅहम कॉलेजा'त आंबेडकर लेक्चरर होते, त्यांचे नाव फारसे कुणाला माहीतही नव्हते, त्यांनी बाळूंचे सत्कार-समारंभ घडवून आणले, बाळूंना मुंबई नगरपालिकेत सदस्यत्व मिळावे यासाठी प्रयत्न केले. पुढे १९२७-२८ मध्ये, अस्पृशांचा प्रमुख पुढारी म्हणून आंबेडकरांकडे पाहिले जाऊ लागले, त्या काळात बाळूंच्या कामगिरीला योग्य ती मान्यता लाभावी म्हणून सुरुवातीला केलेल्या आपल्या प्रयत्नांचा उल्लेख ते खेड्यापाड्यातील श्रोत्यांसमोर आवर्जून करीत असत.

बाळू चांभार होते. हिंदूंच्या चातुर्वर्णांमधील सर्वात खालच्या स्तरावरील हलकी जात. १८७५ मध्ये त्यांचा जन्म धारवाडला झाला. पुढे पालवणकर कुटुंब पुण्याला येऊन स्थायिक झाले. सरकारच्या दारूगोळ्याच्या डेपोमध्ये बंदुका व काडतुसे साफ करण्याचे काम त्यांचे वडील करीत असत. उच्च वर्णियांच्या लेखी हे काम म्हणजे भ्रष्टाचारच. क्रिकेटच्या चेंडूची (हासुद्धा चामड्याचाच बनवलेला) बाळूंची करामत प्रथम ध्यानी आली, 'पूना जिमखान्या'तील ब्रिटिश सभासदांच्या. या जिमखान्यात बाळू नोकर होते. इंग्रज क्रिकेटपटू सराव करीत तेव्हा बाळू त्यांना गोलदांजी करीत असत. त्यांची ख्याती हळूहळू पसरत 'पूना जिमखान्या'चा प्रतिस्पर्धी 'डेक्कन जिमखान्या'पर्यंत पोहोचली. हा जिमखाना उच्चवर्णीय हिंदूंचा होता. केवळ ब्रिटिशांसाठीच असलेल्या, 'पूना जिमखान्या'चा पराभव करण्याची, 'डेक्कन जिमखान्या'ची कैक दिवसांपासून मनीषा. त्यांनी बाळूंना आपल्या संघात सामावून घेतले. *मैदानावर ब्राह्मण बाळूंबरोबर खेळत. परंतु बाहेर आपल्या पंक्तीत त्यांना जेवायला मात्र बसवत नसत. एवढेच नव्हे तर, चहापानाच्या मध्यंतरातदेखील बाळूंना पॅव्हेलियनच्या बाहेर उभे करीत असत;* त्यांच्या क्रिकेट सहकाऱ्यांपासून दूर, आणि फेकून देण्याच्या लायकीच्या पेल्यातून त्यांना चहा दिला जात असे. उच्चवर्णियांना आदर होता तो त्याच्या गोलंदाजीतील



अनुक्रमणिका

प्राविण्याबद्दल. एव्हाना मुंबईच्या 'हिंदू जिमखान्या'ची नजर बाळूंकडे वळली. आपल्या संघात त्यांना ओढण्याचे त्यांचे प्रयत्न सुरू झाले. त्यासाठी जिमखान्यातील काही कर्मठ, परंपरावादी गुजराती सभासदांची समजूत काढण्यात आली. त्यांच्या प्रयत्नांना यश आले. बाळू 'हिंदू जिमखान्या'त दाखल झाले. त्यांच्या पाठोपाठ त्यांचे गुणी क्रिकेटपटू बंधू शिवराम, गणपत आणि विठ्ठल.

१९०६ मध्ये गोऱ्यांवर मिळवलेल्या विजयात बाळू आणि शिवराम यांचा सिंहाचा वाटा होता. या सामन्यात हिंदूंच्या दोन्ही डावांतील धावसंख्या होती २४२ आणि १६० आणि गोऱ्यांची होती १९४ आणि १०२. शंभर धावांनी पराभव. बाळूंनी दोन्ही डावांत मिळून आठ बळी घेतले होते आणि २५ व ११ धावा केल्या होत्या. शिवरामांच्या धावा होत्या ३४ आणि नाबाद १६. त्यानंतर लागलीच, 'इंडियन सोशल रिफार्मर्स'या हिंदू उदारमतवादाच्या आदरणीय वृत्तपत्राने खालच्या जातींतील खेळाडूंना क्रिकेट- संघात स्थान दिल्याबद्दल कौतुक केले. म्हटले की, राष्ट्रात भेदभाव निर्माण करणाऱ्या पुराण्या चालीरितीच्या बंधनातून मुक्त करण्याच्या संदर्भातील हा एक 'लॅन्ड् मार्क' आहे. हा बदल जाणीवपूर्वक झालेला आहे, मर्दानी नैतिकतेने नियंत्रित केलेले स्वातंत्र्य रेल्वेमध्ये विविध जातींचे लोक एकमेकांच्या मांडीला मांडी लावून बसतात नाईजालाने. तशा प्रकारचा हा बदल अळेबळे नव्हता. पुणे आणि मुंवई येथील हिंदू खेळाडूंनी थोड्या फार प्रमाणात दाखवून दिले की, जिथे राष्ट्रहिताला प्राधान्य असते, जात कुठलीही असो, प्रत्येकाला समान संधी देण्यात आली पाहिजे. अशी संधी दिल्याने काही पुराण्या पूर्वग्रहांना मूठमाती दिली जाते. खेळाने घालून दिलेल्या या पाठाचा राजकारणात, सामाजिक आणि शैक्षणिक क्षेत्रात पाठपुरावा केला जावा. हिंदूंमधील उच्च, नीच जातींतील दुही माजवणाऱ्या आणि भेदाभेद करणाऱ्या जुन्या चालीरिती नष्ट होऊ द्या आणि अवघ्या जगाच्या लेखी हिंदुस्थान हास्यास्पद बनले आहे, ती प्रतिमा बदलली जावो *(१८ फेब्रुवारी १९०६).*

भावनांना हात घालणारा हा मजकूर प्रसिद्ध झाला. उच्चनीच जातींतील खेळाडू एकत्र खेळू लागले. पण आणखी एक पूर्वग्रह नष्ट करायचा बाकी राहिला होता. उच्चवर्णीय हिंदू अस्पृश्यांबरोबर खेळत होते, पण त्यांच्या हाताखाली नव्हे. क्रिकेटमध्ये कर्णधाराची भूमिका महत्त्वपूर्ण असते. फलंदाजाचा क्रम, गोलंदाजी क्षेत्ररक्षण यातील बदल करण्याची त्याची चाल विजय संपादन करू शकते वा पराभवाला कारणीभूत ठरते. बाळू हे हिंदूंमधील सर्वोत्तम खेळाडू होते, अत्यंत चाणाक्षदेखील, परंतु त्यांना संघाचा कर्णधार मात्र कधीच केले गेले नव्हते. संघाच्या निवडीत सर्व जातींना समान संधी दिली पाहिजे ही शिकवण हिंदूंच्या पचनी पडली होती, परंतु एका अस्पृश्य कर्णधाराच्या हाताखाली मैदानावर खेळणे ! अब्राह्मण्यम् ! अशी नेमणूक झाली तर वर्णातील उच्चनीच श्रेणीमध्ये उलथापालथच ! १९२० ते



अनुक्रमणिका

१९२० या दरम्यानच्या काळात वार्षिक स्पर्धेसाठी बाळूंना हिंदूंचा कर्णधार करावा अशी मोहीम दरवर्षी निघे. या मोहिमेत वृत्तपत्राच्या बरोबरीने काही क्रिकेटपटूही पुढाकार घेत. उदाहरणार्थ, १९१३ मध्ये एम्. डी. पै यांची कर्णधारपदी निवड झाली. हा बहुमान मिळावा अशी कुठल्याही क्रिकेटपटूची आकांक्षा असते. हा मान पै यांना लाभल्याबद्दल त्यांचा सत्कार करण्यात आला. या प्रसंगी पै म्हणाले की, 'कर्णधार पदाचा मान त्यांचा मित्र मिस्टर बाळू यांना द्यावयाला हवा होता, संघामध्ये ते सर्वात ज्येष्ठ आहेत आणि अनुभवीही' *('बाँबे क्रॉनि. १ ऑक्टोबर १९१३).*

दुर्दैवाने ही उदार वृत्ती 'हिंदू जिमखान्या'तील वकील आणि व्यापारी यांच्यामध्ये नव्हती. बाळूंसारख्या एका चांभाराने आपल्या संघाचे नेतृत्व करण्यापेक्षा पैंसारख्या एका ब्राह्मणाने नेतृत्व करणे त्यांना पसंत होते. बाळू स्वभावाने मवाळ. आपल्यावर होणाऱ्या अन्यायाविरुद्ध आवाज उठवणे त्यांच्या रक्तात नव्हते. स्वत:च्या हक्काचा दावा त्यांनी पुढे दामटला नाही. परंतु एवढी वर्षे निमूट वाट पाहून अखेरीस १९२० मध्ये त्यांच्याबद्दल सहानुभूती असलेल्या एका वृत्तपत्रकारापाशी अगदी कंटाळून त्यांनी उद्गार काढले की हिंदूंच्या क्रिकेटसाठी त्यांनी जे योगदान केले आहे त्याबद्दलचे इनाम म्हणून निदान एक वर्षासाठी त्यांना कर्णधारपद देण्यात यावे. *('बाँबे क्रॉनि. १५ नोव्हेंबर १९२०)* त्यावर्षी एम्. डी. पै कर्णधार होते. परंतु त्या स्पर्धेतील पहिल्या सामन्याच्या वेळी त्यांची प्रकृती बिघडली, ते खेळणार नसल्याचे नक्की झाले. तेव्हा दि. ब. देवधर नामक पुण्याच्या एका तरूण ब्राह्मणाची त्यांच्या जागी नेमणूक करण्यात आली. हा अन्याय कमी झाला म्हणून की काय बाळूंना संघातून वगळण्यात आले. विठ्ठल आणि शिवराम या त्यांच्या बंधूंची निवड झाली होती, परंतु जिमखान्याने घेतलेल्या निर्णयाचा निषेध म्हणून त्यांनी सामन्यात सहभागी होण्यास नकार दिला. एवढेच नव्हे तर त्यांच्यापैकी एकाला कर्णधार करावे असा आग्रह धरला. या निमित्ताने त्यांनी एक जाहीर निवेदन प्रसिद्ध केले. त्यात वर्षानुवर्षे दडपून टाकण्यात आलेली वेदना प्रभावीपणे उफाळून आली : 'श्री. देवधरांपेक्षा *(कर्णधारपदासाठीचा)* आमच्यापैकी कुणाही एकाचा दावा खचितच उजवा आहे हे सांगण्याची आवश्यकता नाही आणि *(हिंदू निवड)* समितीचा निर्णय हा आत्यंतिक अ- खिलाडू वृत्तीचे निदर्शक आहे, क्रिकेटच्या मैदानातील त्यांची *(देवधरांची)* कामगिरी वा ज्येष्ठत्व याहून जात आणि सामाजिक- शैक्षणिक दर्जा यांनीच समिती प्रभावित झाली हे अगदी उघड आहे आणि समितीचा निर्णय पक्षपातीपणाने घेण्यात आलेला आहे, त्यात जातीला झुकते माप देण्याची पूर्वग्रहदूषित वृत्ती आहे. खेळामध्ये सामाजिक व शैक्षणिक दर्जाला स्थान नाही; जेव्हा खालच्या सामाजिक दर्जाच्या क्रिकेटपटूचा दावा निश्चितपणे उजवा असतो. . . *(न खेळण्याच्या)* निर्णयाप्रत पोहोचताना ज्या कारणे मान्यता मिळवण्याचा आमचा दावा सदैव डावलण्यात येतो त्या

तथाकथित पददलित वर्गातील आहोत म्हणून आम्हावर करण्यात आलेला उघड वा प्रच्छन्न अन्याय आम्हाला तीव्रपणे जाणवतो. क्रिकेटमध्ये जातीसारखी बाब निर्णायक ठरावी ही गोष्ट निमूट नमतेपणाने घेणे आम्हास शक्य नाही, म्हणूनच चालू वर्षी हिंदूंच्या संघातून बाहेर राहण्याचा आमचा निर्णय आहे. आम्हाला खात्री आहे, नि:पक्षपाती क्रिकेटप्रेमी जनतेला तत्काळ आमच्या परिस्थितीची कल्पना येईल आणि आम्ही जे पाऊल जाणीवपूर्वक उचलले आहे त्याच्या दोषाचे खापर ते आमच्यावर फोडणार नाहीत, कारण हा प्रश्न आहे, तत्त्वांचा आणि आत्मप्रतिष्ठेचा *(बॉंबे क्रॉनि. ४ डिसेंबर १९२०).*

या निवदेनावरून स्पष्ट होते की विठ्ठल आणि शिवराम यांनी आपला भाऊ बाळू यांच्याप्रमाणे नमते न घेता आवाज उठवला. काळही बदलला होता. १९२०च्या सुमारास महात्मा गांधी हे हिंदी राष्ट्रवादाचे निर्विवाद पुढारी होते आणि त्यांच्या लेखी, स्वराज्याच्या चळवळीत अस्पृश्यता निर्मूलनाला अग्रक्रम होता. आता, बाळूंच्या भावांपैकी एकाला हिंदूंच्या संघाचा कर्णधार करण्याच्या आंदोलनाला अत्यंत वजनदार हिंदूंची आणि हिंदवासियांची प्रधान नैतिक मंजुरी होती. विठ्ठल आणि शिवराम यांनी जेव्हा विद्रोहाचे निशाण उंचावले तेव्हा कैक हिंदू चाहत्यांना वाटले की, 'स्वाभिमानी व्यक्ती म्हणून अशा परिस्थितीत *(त्यांना)* वेगळे वागणे अशक्य होते.' या बंडखोरांसाठी कित्येक हजार रुपये वर्गणी रूपाने लोकांकडून जमा झाले. दरम्यान, हिंदूंनी अंतिम सामन्यात प्रवेश केला होता आणि वाढत्या दबावाला नमून, जिमखान्याने बाळूंना उपकर्णधार केले होते. कर्णधार पै एव्हाना 'फिट'झाले होते, विठ्ठल आणि शिवराम हेही संघात सामील झाले होते. या सामन्याच्या वेळी पै बराच काळ मैदानाबाहेर राहिले, आणि हा निर्णय आधीच घेतलेला होता, जाताना कर्णधारपदाची सूत्रे त्यांनी 'जाणत्या गोलंदाजा'कडे सोपवली होती. सामना अनिर्णित राखण्यात हिंदू यशस्वी झाले. तेव्हा बाळूंच्या पत्रकार मित्राने त्यांच्या 'उत्कृष्ट नेतृत्वाची' ,'गोलंदाजी हाताळण्यातील त्याच्या अचूक निर्णयांची' स्तुती केली *(बॉंबे क्रॉनि. ४-१० डिसेंबर १९२०).*

तीन वर्षानंतर, ऐनभरात असलेला बाळूंचा धाकटा बंधू विठ्ठल यांची अधिकृतरित्या कर्णधार म्हणून निवड करण्यात आली. त्यांच्या नेतृत्वाखाली, कित्येक वर्षांनी, हिंदूंनी पहिल्यांदाच चौरंगी सामना जिंकला. गोऱ्यांबरोबरचा अंतिम सामना संपताच प्रेक्षकांच्या आनंदाला उधाण आले, त्यांनी मैदानावर धाव घेतली आणि विजयी आरोळ्यांनी मैदान दणाणून टाकत हिंदूंच्या कर्णधाराला खांद्यावर वाहून पॅव्हेलियनकडे घेऊन गेले. या विजयामधून व्यापक निष्कर्ष काढण्यात विठ्ठलांचे पाठीराखे तत्पर होते. त्यांनी म्हटले, या वर्षीच्या सामन्याला 'राष्ट्रीय दृष्टिकोनानुसार विशेष महत्त्व आहे.' एका वार्ताहाराने लिहिले,'या विजयामधून तात्पर्य काढंता येणे सहज शक्य आहे, ते तात्पर्य असे : अस्पृश्यता निर्मूलन स्वराज्याप्रत घेऊन जाईल – ही महात्म्याची भविष्यवाणी आहे.' दुसऱ्या एकाने लिहिले,

'अत्यंत सुखदायी घटना, उच्च वर्णीय समजल्या जाणाऱ्या हिंदूंच्या खांद्यावरून कर्णधार विठ्ठल यांना उचलून नेण्यात आले हे सामन्याचे अत्यंत सर्वमान्य फलित. हुर्रे ! कर्णधार विठ्ठल ! हुर्रे ! जातीचा पूर्वग्रह विसरलेले हिंदू झिंदाबाद ! महात्मा गांधी की जय' *(बॉंबे क्रॉनि. १४,१५,१८ डिसेंबर १९२३).*

१९२९ मध्ये विठ्ठलांची कारकीर्द अखेर संपली तेव्हा मुंबईतील एका लेखकाने भावपूर्ण श्रद्धांजली वाहिली : 'एवढे वैभवशाली पान क्रिकेटच्या इतिहासात अन्यत्र कुठेही आढळून येणार नाही. तीस वर्षे *(आणि)* एकमात्र कुटुंब. एका पाठोपाठ एकेक बंधू हिंदूंच्या क्रिकेटची इमारत उंचावत होता. स्वत:च्या बरोबरीने, तिचे वैभव हिंदुस्थानभर आणि हिंदुस्थानाबाहेर पसरवत होता' आणि त्यानंतर त्याने एक धारदार प्रश्न केला होता : 'क्रिकेटचा एक तरी हिंदू प्रेमी ज्याच्यामध्ये अल्पसा सुसंस्कृतपणा असेल, त्याच्या मनात हिंदूंच्या अशा आधारस्तंभाबद्दल त्यांच्या जातीचा क्षुद्र विचार डोकावेल का? हिंदू क्रिकेटपटू *(त्यांचा)* विचार केवळ आदरानेच करणार नाहीत का? *('हिंदू क्रिकेट अँड बाळू ब्रदर्स : आर. व्ही. एम्.', बॉंबे क्रॉनि. ३० नोव्हेंबर १९२९).*

बाळू-बंधूंची कहाणी ही एक शौर्यगाथा आहे. पण आधुनिक भारताच्या इतिहासकारांनी, एवढेच नव्हे तर अस्पृश्यता निर्मूलनाच्या चळवळीच्या इतिहासकारांनीही तिच्याकडे लक्ष दिलेले नाही. या ठिकाणी सी. आय्. आर. जेम्स या त्रिनिदादमधील लेखक आणि क्रांतिकारकाचे शब्द आठवतात. क्रिकेटचा इतिहास आणि संस्कृती यावरील त्यांच्या 'बियाँड बाउंडरी' या महत्त्वपूर्ण पुस्तकात म्हटले आहे : 'एखादा प्रसिद्ध लिबरल इतिहासकार एकोणिसाव्या शतकातील इंग्लंडचा सामाजिक इतिहास लिहू शकेल आणि दोन ख्यातनाम सोशालिस्ट इंग्लंडच्या सर्वसामान्य लोकांचा इतिहास लिहिल्याचा दावा करू शकतील, आणि या तिघांनीही जो माणूस त्या काळात अत्यंत प्रख्यात होता त्या माणसाचा एकदाही उल्लेख केलेला नाही. इतिहासकार म्हणून जेम्स ज्यांचा उल्लेख करतात त्यांपैकी पहिला जी. एम्. ट्रेव्होलियान आणि दुसरे दोन रेमंड पोस्टगेट आणि जी. डी. एच्. कोल आणि 'त्याच्या काळात प्रख्यात इंग्रज' म्हणून ज्याचा नामोल्लेख त्यांच्या पुस्तकात आढळत नाही त्याचे नाव होते डब्ल्यू. जी. ग्रेस, नामवंत क्रिकेटपटू, ज्याच्या खेळाने 'दोन पिढ्यांचे रुक्ष रिकामे जीवन समृद्ध केले होते' आणि इंग्लंडमधील सामान्य लोकांना त्यांच्याबद्दल पराकोटीचा आदर होता. १९१५च्या जुलैमध्ये वयाच्या सदुसष्टाव्या वर्षी हार्ट अटॅकने ते निधन पावले. तेव्हा लढाईच्या पवित्र्यात असणाऱ्या ब्रिटिशांना अखेरचा दणका हाणण्याची आकांक्षा बाळगणाऱ्या जर्मनांनी तत्काळ दावा केला की हा क्रिकेटपटू 'झेप्पेलिन हल्ल्या'चा बळी होता.

क्रिकेटच्या भाषेत बोलायचे झाल्यास बाळू हे ग्रेस यांच्या तोडीस तोड होते, समतुल्य



अनुक्रमणिका

होते : हिंदुस्थानात पैदा झालेला पहिला सच्चा थोर क्रिकेटपटू म्हणून. परंतु, त्यांच्या योगदानाने ही सीमाही ओलांडली होती. आपल्या बंधूंसमवेत पददलित जातींमधील आत्मप्रतिष्ठेच्या चळवळीत त्यांनी महत्त्वपूर्ण कामगिरी बजावली होती. सामाजिक कार्याच्या संदर्भात बाळूंच्या कामगिरीची तुलना अमेरिकन बेसबॉलपटू जॅकी रॉबिन्सन याच्या कामगिरीशी करता येईल. प्रमुख लिगमधून खेळून तोवर अभेद्य असलेली सामाजिक बंधने तोडू शकलेला पहिला काळा. अर्थात ही घटना आहे १९४७च्या अखेरची.

म्हातारे होऊन, सन्मान भूषवून बाळू १९५५ मध्ये वारले. तेव्हा हिंदुस्थान स्वतंत्र झालेला होता आणि जातींबद्दलचे पूर्वग्रह, निदान मुंबईत तरी, बऱ्याच प्रमाणात संपुष्टात आले होते. त्यांच्या निधनाचे वृत्त सर्व वृत्तपत्रांमधून ठळकपणे प्रसिद्ध झाले हे खरे पण 'पूना पॅक्ट'मधील त्यांची भूमिका, *(त्याहून आश्चर्यकारक)* हिंदूंच्या कर्णधारपदासाठीचा झगडा यांबाबत श्रद्धांजली वाहणाऱ्यांपैकी एकानेही पुसटताही उल्लेख केला नव्हता. बाळूंना जाहीर आदरांजली वाहण्यात आली. त्यात उच्च वर्गीय हिंदू क्रिकेटपटू विजय मर्चंट व पारशी क्रीडासमालोचक ए. एफ्. एस्. तल्यारखान यांनी अप्रतिम गोलंदाज म्हणून त्यांचा गौरव केला. परंतु बाळूंच्या कामगिरीच्या दुसऱ्या बाजूचे विस्मरण ज्यांना झाले नव्हते असेही काहीजण होते. संसदेतील अस्पृश्य खासदार आणि विधिमंडळातील अस्पृश्य आमदार, बाळूंच्या पार्थिव देहावर जिथे अंत्यसंस्कार झाले, त्या सांताक्रूझच्या स्मशानभूमीवर जमलेल्या प्रचंड गर्दीत सहभागी झाले होते. *(हिंदुस्थान टाइम्स (दिल्ली) ६ जुलै १९५५).*

## ५
## देश एक की दोन?

१९२६च्या डिसेंबरमध्ये, एम्. सी. सी. ने आपला संघ हिंदुस्थानला पाठवला होता. या पाहुण्यांना खाना दिला, त्या समारंभात हिंदू जिमखान्याच्या अध्यक्षाने बढाई मारली की, खेळाद्वारे त्यांनी 'हिंदूंमध्ये लक्षणीय सामाजिक सुधारणा घडवून आणली आहे.' ते म्हणाले, 'प्रत्येक हिंदूला, अगदी अस्पृश्यांनादेखील जिमखान्याचे दरवाजे खुले आहेत आणि क्रिकेटद्वारे, जातीची बंधने तोडण्याचे काम, जिमखान्याला शक्य झाले आहे.' *('बॉंबे क्रॉनि. ७ डिसेंबर १९२६).* या विधानाचा इरादा स्पष्ट होता – उच्च वर्णीय हिंदूंनी अस्पृश्यांना समान लेखले, तद्वतच हिंदवासियाशी ब्रिटिशांनी आता समान पातळीवर खेळण्याची घडी आली आहे, क्रिकेटमध्ये आणि राजकारणामध्येही. स्वतःची अशी पाठ थोपटून घेण तसे अकालीच होते. क्रिकेटच्या मैदानावर जातीचे युद्ध जिंकले गेले असेल, तरीही याहून अधिक जबरदस्त अडथळा हिंदूंना अद्यापि पार करावयाचा होता. मुस्लिमांबरोबरच्या त्यांच्या संबंधांशी तो संबंधित होता. उपखंडातील मुस्लीम ही एक मोठी धार्मिक जमात होती. मुंबईतील

क्रिकेटच्या मैदानाला हिंदुस्थानातील राजकारणामधील अत्यंत जटिल प्रश्नावरून हळूहळू रणमैदानाचे स्वरूप येत गेले : हिंदुस्थान हे एक राष्ट्र आहे की ब्रिटिश सत्तेमुळे तकलुपी ऐक्याचे स्वरूप प्राप्त झालेले विविध जमातींचे कडबोळे आहे.

काँग्रेस पक्षाने, अर्थात, अशी भूमिका घेतली होती की, हिंदुस्थान हे एक राष्ट्र आहे आणि तो पक्ष हा देशहित सांभाळणारा योग्य असा मार्गदर्शक आहे. या संघटनेने मुस्लीम, पारशी, शीख आणि ख्रिश्चन यांना आपल्यात सामावून घेतलेले असले तरी एकोणीसशे तिशीत हिंदूंचा वरचष्मा असलेला पक्ष म्हणून त्या पक्षाकडे पाहिले जाऊ लागले होते. एकोणीसशे तिशीत आणि चाळीशीत बराचसा मुस्लीम मतदार संघ काँग्रेस गमावून बसली होती. तिथे तिचे प्रतिस्पर्धी मुस्लीम लिगने बाजी मारली होती. हिंदु-मुसलमानांमधील संबंध झपाट्याने बिघडत गेले. हिंदुस्थानच्या उत्तर व पश्चिम भागात जातीय दंग्याचा उद्रेक झाला. प्रत्येक दंगलीबरोबर देशाचे आपण प्रातिनिधत्व करतो हा काँग्रेसचा दावा दुबळा ठरत गेला आणि प्रत्येक दंगलीबरोबर, हिंदुस्थान हे एक राष्ट्र नाही तर निदान दोन– एक हिंदू आणि दुसरे मुस्लीम– या युक्तिवादाला बळकटी येत गेली.

या राजकीय वातावरणात, जातीनुसार आयोजित केल्या जाणाऱ्या प्रमुख क्रिकेटस्पर्धांच्या अस्तित्वाने राष्ट्र एकसंघ आहे हा दावा कमकुवत केला होता. मुस्लिमांचा जर एक वेगळा क्रिकेट संघ आहे, तर मग एका वेगळ्या राष्ट्राची मागणी करण्यापासून त्यांना थोपवावे कोणी? पारशी, शीख आणि खिश्चन हे संख्येने एवढे कमी होते की, त्यांच्याकडून धोका उद्‌भवणे संभवनीय नव्हते. *(१९४१ मध्ये हिंदुस्थानची लोकसंख्या अशी होती : हिंदू : २७. ५० कोटी, मुस्लीम : ९. १० कोटी, ख्रिश्चन : ७ कोटी, शीख : ५ कोटी, पारशी : १लाख)* तिशीच्या मध्यावर चौरंगी सामन्यांच्या विरोधात राष्ट्रवादी जनमत तीव्र झाले होते. या विरोधाला बळकटी लाभली १९३४ मध्ये. या वर्षी 'रणजी ट्रॉफी' स्पर्धा सुरू झाली. ही स्पर्धा राष्ट्रीय पातळीवर होत होती आणि त्यात देशभरच्या प्रांतांतील संघ सहभागी होत होते. विशेष म्हणजे, या स्पर्धेचे स्वरूप 'जातीय' नव्हते. १९३० ते १९३३ या काळात चौरंगी सामने सविनय कायदेभंगाच्या चळवळीमुळे खेळले गेले नव्हते. 'रणजी ट्रॉफी'च्या पहिल्या वर्षी अठरा संघ उतरले होते. दशकाच्या अखेरीस या संख्येत डझनभर संघांची भर पडली. पतियाळाच्या महाराजाने दिलेल्या देखण्या सुवर्ण करंडकासाठी प्रत्येक संघ अटीतटीने सामने खेळत होता. 'रणजी ट्रॉफी'मुळे वेगवेगळ्या शहरांमधून, गावांमधून क्रिकेटच्या विकासाला हातभार लागला. विविध प्रांत, संस्थाने, सरकारी विभाग यांचा पुरस्कार संघांना लाभत होता. सत्तेची आणि आश्रयदात्यांची पर्यायी केंद्रे देशभर झाली. परिणामी, हिंदी क्रिकेटमधील मुंबईच्या वर्चस्वाला आव्हान मिळाले.



अनुक्रमणिका

चार वर्षांच्या खंडानंतर चौरंगी सामने पुन्हा सुरू झाले मात्र, त्यांच्या विरोधात एकच गिल्ला सुरू झाला. या आवाजाला जनमानसात पोहोचवण्याची महत्त्वपूर्ण कामगिरी पार पाडली 'बाँबे क्रॉनिकल'ने. काँग्रेसच्या ध्येयधोरणांचा पाठपुरावा करणारे हे वृत्तपत्र जबाबदारीने राष्ट्र उभारणीच्या कार्यात सहभागी होते ! बाळूबंधूंच्या बाजूने मोहीम उघडून जातीय पूर्वग्रहांचा अडसर दूर करण्यात महत्त्वाचा वाटा उचलणाऱ्या या वृत्तपत्राने आता हिंदू-मुस्लीम वादाकडे लक्ष केंद्रित केले. २७ नोव्हेंबर १९३५च्या अंकात 'क्रॉनिकल'ने म्हटले, 'हिंदी क्रिकेटच्या इतिहासात एका विवक्षित टप्प्यावर जातीय स्पर्धा, बहुधा, आवश्यक असतीलही. परंतु निकोप राष्ट्रीयत्वाच्या विकास कार्यात ती उपयुक्त ठरत नसल्यामुळे तिला सन्मानाने मूठमाती देण्याची घडी आलेली आहे.' वृत्तपत्राचा क्रीडा-संपादक जे. सी. मैत्र सातत्याने 'रणजी ट्रॉफी'- स्पर्धेची भलाभण करीत होता आणि चौरंगी सामन्यांच्या विरोधात आवाज उठवत होता. आंतरराज्यीय क्रिकेट स्पर्धांना तो पाठिंबा देत होता. कारण त्यायोगे वेगवेगळ्या प्रांतांतील उदयोन्मुख, लायक खेळाडूंना वाव मिळत होता. पण हेच एकमेव कारण नव्हते. या स्पर्धांद्वारे 'जातीयतेचे बंध तोडण्यास आणि राष्ट्रीयत्वाचे मुक्त आणि निकोप वातावरण निर्माण होण्यास' मदत होईल अशी त्याची धारणा होती. चौरंगी सामन्यांना लोकांचा पाठिंबा होता. तो त्याने मान्य केला होता. परंतु ही स्पर्धा म्हणजे 'जातीय वैमनस्याद्वारे क्रीडाउत्साह वाढीस लावण्याची ही मध्ययुगीन पद्धत' हे त्याचे ठाम मत होते. दुर्दैवाने,'खेळाचा दर्जा आणि रंगत यांहून सामन्यांच्या जातीय स्वरूपाबद्दलच लोकांना अधिक आकर्षण होते. हे नि:संशय' *(बाँबे क्रॉनि. १८ डिसेंबर १९३७, १९ नोव्हेंबर १९३९).* एका क्रीडा-समीक्षकाने म्हटले, 'या देशातील क्रिकेट चाहत्यांचा मोठा वर्ग खिलाडू चुरशीने खेळणारे विविध प्रांतांतील उत्तमोत्तम खेळाडूंना पाहाण्यापरीस जातीय क्रिकेट बघण्यासाठी झुंबड करतो ही दु:खदायी बाब आहे !'

१९३९च्या सप्टेंबरमध्ये महायुद्धाला तोंड फुटले. त्याचा परिणाम तात्काळ सामन्यावर झाल्याचे जाणवले नाही. परंतु, पुढील उन्हाळ्यात, प्रांताप्रांतामधील झाडून साऱ्या काँग्रेस मंत्र्यांनी राजिनामे दिले *(१९३५च्या 'गव्हर्नमेंट ऑफ इंडिया अ‍ॅक्ट'न्वये हे मंत्री सत्तेवर आले होते. त्यांचा मताधिकार मर्यादित होता. त्यांच्यावर ब्रिटिशांचे नियंत्रण होते)* युद्ध समाप्तीनंतर हिंदुस्थानला स्वातंत्र्य देण्यात येईल असे आश्वासन काँग्रेसने मागितले होते. त्या मोबदल्यात त्यांच्या युद्ध-प्रयत्नांना पाठिंबा देण्याची तयारी दर्शवली होती. परंतु सरकारकडून अपेक्षिलेले आश्वासन मिळाले नाही. गांधीजींनी आपल्या अनुयायांना आता 'सत्याग्रहा'ची हाक दिली, आणि हजारो स्वयंसेवकांनी *(यात भूतपूर्व मंत्री होते)* कारावास पत्करला. अशा प्रकारे, पंचरंगी सामन्याच्या विरोधाचा पाया असलेल्या जातीय सलोख्याला आता राजकीय अन्यायाची जोड मिळाली. १९४०च्या स्पर्धेच्या अखेरीस, मुंबईचे एक प्रमुख काँग्रेस नेते



अनुक्रमणिका

आणि भूतपूर्व गृहमंत्री, के. एम्. मुनशी यांनी क्रिकेटप्रेमींना आवाहन केले की, त्यांनी 'सुदैवाने लाभलेल्या ''पास्ट टाइम''मध्ये मशगूल राहू नये' ते पुढे म्हणाले,'युद्धात ब्रिटनचा मित्र होण्याचा हिंदुस्थानचा हक्क नाकारला गेला असता, सरकारच्या सध्याच्या धोरणांना संमती देण्याचे नाकारून तुमच्या देशातील १,५०० लोकनियुक्त प्रतिनिधींनी कारागृहात बंदिवान होणे पत्करले असता महोत्सवाला लोटलेले प्रचंड प्रेक्षक पाहून सरकारची समजूत होईल की,'जनता एवढी सुखी आहे आणि आपत्तींशी त्यांनी एवढे जुळवून घेतले आहे की, क्रिकेट सामन्यांना जाऊन मौज लुटण्याइतकी उसंत त्यांना आहे' *(बॉंबे क्रॉनि. ३ डिसेंबर १९४०).*

१९४०च्या डिसेंबरमध्ये 'हिंदू जिमखान्या'चे अध्यक्ष व सचिव सल्ला घेण्यासाठी गांधीजींना भेटले. जातीय क्रिकेट सामन्यांमधून जिमखान्याने लौकिक मिळवला होता, नफाही उचलला होता. सामने चालू ठेवण्यासाठी गांधीजींचे आशीर्वाद मिळवण्याचा उद्देश या भेटीमागे होता. परंतु गांधीजींनी त्यांना हादरा दिला. त्यांनी परखडपणे सांगितले की,'हे सामने थांबवले जावेत अशी ज्यांची इच्छा आहे अशांशी ते पूर्ण सहमत आहेत, त्यांच्याविषयी त्यांना सहानुभूती आहे.' त्यांनी 'मुंबईच्या क्रिकेटप्रेमी जनतेला सांगितले, 'त्यांनी क्रीडाविषयक नियमावली सुधारावी आणि त्यातून जातीय सामने काढून टाकावेत.' ते पुढे म्हणाले,'कॉलेज आणि संस्था यांच्यामधील सामने मी समजू शकतो, परंतु हिंदू, पारशी, मुस्लीम आणि इतर जाती यांचे वेगवेगळे संघ असण्यामागील कारण मला समजू शकत नाही. मला वाटते की ही अ- खिलाडू विभागणी खेळामध्ये निषिद्ध मानली जावी' *(बॉंबे क्रॉनि. ७ डिसेंबर १९४०).*

गांधीजींच्या हस्तक्षेपाने 'क्रॉनिकल' आणि त्याचे बराच काळ संपादक असलेले सैद अब्दुल्ला ब्रेलवी यांचे हात बळकट केले. असे सांगितले जात असे की, त्यांची एकनिष्ठता वादातीत होती आणि कॉंग्रेसशी त्यांची बांधिलकी संशयातीत होती. हा संपादक राष्ट्रवादी विचारसरणीचा मुस्लीम होता. एकसंघ हिंदुस्थानासाठी झटणारा तो एक मुस्लीम बुद्धिवादी होता. पंचरंगी सामने रद्द करावेत, यासाठी त्यांनी प्रखर आवाज उठवला होता. 'जी ईर्षा प्रत्येक देशप्रेमी हिंदवासीयाने राष्ट्रीय कार्यक्रमांमधून, खास करून खेळांमधून घालवून देण्यासाठी शिकस्त करायला हवी ती अनिष्ट जातीय ईर्षा कावेबाजपणाने जिवंत ठेवल्याबद्दल' त्यांनी संपादकीयांमधून सातत्याने कडाडून हल्ले चढवले. 'बॉंबे क्रॉनिकल'ने डझनवारी जाहीर सभा घेण्याच्या कामी पुढाकार घेतला. या सभांमधून ब्रेलवी आणि इतर राष्ट्रवादी जनतेला आवाहन करीत असत की, तिने या स्पर्धांवर बहिष्कार घालावा आणि जे पैसे ती तिकिटांवर खर्च करणार ते अधिक योग्य अशा कार्यासाठी पाठवून द्यावेत. उदाहरणार्थ, दुष्काळग्रस्तांच्या मदतीसाठी वा हिंदु-मुस्लिमांमधील तेढ समूळ नष्ट करण्याच्या कामी. १९४१च्या नोव्हेंबरमध्ये ब्रेलवींनी एका भाषणात सार्वजनिक जीवनाच्या सर्व

क्षेत्रांमधून 'जातीय कीड' काढून टाकण्याची कळकळीची हाक दिली. सार्वजनिक उपक्रमांच्या इतर अनेक क्षेत्रांप्रमाणेच वेगवेगळ्या जमातींमधून क्रिकेटचे प्रेम वाढीला लागावे यासाठी आम्ही कमीत कमी प्रतिकार करण्याचा मार्ग चोखाळला. धर्मीय संप्रदायाच्या शाळा आणि विद्यापीठे सुरू करून आपल्या देशात शिक्षणाचा प्रसार व्हावा यासाठी आमचा प्रयत्न असतो. जातीय क्रीडा-संस्था आणि क्लब स्थापन करून आपल्या देशातील क्रीडा आणि क्लब-जीवन यांना प्रोत्साहन देतो. मुस्लीम रेस्टॉरंट आणि हिंदू रेस्टॉरंट स्थापन करून जनतेच्या शारीरिक गरजा आम्ही भागवतो. जातीय मतदारांकरवीच केवळ आपण आपल्या राज्याचे वा देशाचे प्रशासन करू शकतो. कमीत कमी प्रतिकार करण्याचा हा मार्ग कुठल्या थराला गेला आहे हे पुढील वस्तुस्थितीमधून स्पष्टपणे कळून येते : आपल्या शहरातील हिंदवासियांसाठी असलेल्या एकमेव तरणतलावात तुमच्या सहधर्मियांव्यतिरिक्त तुम्ही अन्यांसंगे पोहू शकत नाही. पारशी, हिंदू, मुस्लीम यांच्यासाठी वेगवेगळे समय आहेत' *(बॉंबे क्रॉनि. १ डिसेंबर १९४१).*

१९४१मध्ये मुंबईत 'सिटिझन्स ॲन्टी– पेट्यॅंग्युलर कमिटी'ची स्थापना करण्यात आली. या समितीने क्रिकेटवर बहिष्कार टाकण्याचे आवाहन केले. तिचा एक नेता म्हणाला, 'पंचरंगी सामन्यांची उपयुक्तता केव्हाच संपुष्टात आली आहे.' पुढे पुस्ती जोडली, 'थोर माणसे जातीय खेळाचा धिक्कार करीत असताना, एका पंधरावड्यासाठी आपण पंचरंगी सामन्यांपासून स्वत:ला दूर ठेवू शकलो नाही तर, आपण काहीही करण्यास नालायक आहोत' *(बॉंबे क्रॉनि. १ डिसेंबर १९४१)* या चळवळीच्या आघाडीवर होते डाव्या विचारसरणीचे विद्यार्थी. पैसे मोजणाऱ्या पब्लिकच्या बरोबरीने त्यांनी खेळाडूंनाही आपले लक्ष्य बनवले होते. १९४१चे पंचरंगी सामने सुरू होण्याआधी एक महिना 'फोर्ट स्टुडंट्स युनियन'ने सामन्यात सहभागी होणाऱ्या जमातीच्या प्रत्येक प्रमुख क्रिकेटपटूंना एकाच मजकुराचे पुढील पत्र पाठवले : 'आम्ही, मुंबईतील विद्यार्थी मानतो की, जातीय तत्त्वावर खेळले जाणारे हे सामने म्हणजे उभरत्या हिंदी पिढीला देण्यात येणारे सावकाश भिनणारे जहर आणि स्वातंत्र्याप्रत नेणाऱ्या मार्गावरील एक अडसर.' या पत्राला उत्तर कुणी पाठवले असल्याची लेखी नोंद नाही, परंतु सामने खेळायला खेळाडू मुंबईला आले त्यावरून त्यांची मते कळून आली. विद्यार्थ्यांनी मैदानाबाहेर धरणे धरले. त्यांच्या हातातील फलकावर पंचरंगी सामन्याबद्दलचे गांधीजींचे मत ठळकपणे लिहिले होते. तिकिटे काढून स्टेडियममध्ये जाणाऱ्यांच्या नावे त्यांनी 'बैलाला हो' केले *(टाइम्स ऑफ इंडिया, १ नोव्हेंबर १९४१).*

पंचरंगी सामने मोडीत काढावेत म्हणून चळवळ जोर करीत असतानाच ते सामने यापुढेही चालू राहावेत यासाठी जोरदार चळवळ उभी राहिली. पारश्यांना हे सामने हवे होते. कारण या अल्पसंख्याक जमातीला त्यायोगे बहुसंख्याकांच्या बरोबरीचे स्थान लाभत होते.



अनुक्रमणिका

हिंदुस्थानच्या जनतेतील फुटीचा लाभ उठवणे ही राज्यकर्त्यांची राजनीती. क्रिकेटोत्सवाच्या विरोधात आवाज जोर धरू लागला असतानाच, मुंबईमधील 'पंचरंगी फुटबॉल स्पर्धा' आणि 'पंचरंगी पोहण्याच्या शर्यती' आयोजित करण्यात पुढकार घेतला आणि बऱ्याच मुस्लिमांना मनोमन वाटले की, या स्पर्धा म्हणजे त्यांच्या वेगळ्या स्थानावर करण्यात आलेला शिक्कामोर्तब, त्यांच्या स्वत:च्या अशा राष्ट्राला देण्यात आलेली मान्यता, हिंदुस्थानच्या धर्माधिष्ठित विभाजनाची नांदी. मुस्लीम लिगचे मुखपत्र 'डॉन' या वृत्तपत्राने दावा केला की, पंचरंगी सामन्याच्या विरोधी-मोहिमेला 'हिंदू-मुस्लिमांमधील मतभेदांशी काही एक देणेघेणे नाही. हिंदू आणि मुस्लीम यांना स्वतंत्र होण्याची आकांक्षा आहे. ते राजकीय तत्त्वाधिष्ठित तोडग्याची प्रतीक्षा करीत आहेत; परंतु निषेधाची ही ओरड म्हणजे मुख्य समस्येपासून *(म्हणजे दोन जमातींमधील राजकीय तोडगा)* लक्ष बळजबरीने अन्यत्र वळवण्याचा अट्टाहास. राजकीय प्रदर्शनीयतेच्या वृत्तीचा एक भाग आहे. ही प्रदर्शनीयता आमच्या काही हिंदू मित्रांना भावते, सूज्ञपणा आणि प्रगती यांची परीसीमा म्हणून. अमेरिकन संघ ब्रिटिश संघाविरुद्ध खेळतो, मतभेदाची दरी न रुंदावता; आणि विविध राष्ट्रे 'लिग ऑफ नेशन्स'च्या आदर्श तत्त्वांविषयी मने कलुषित न करता आपापले "चॅम्पिअन्स्" घेऊन ऑलिंपिक स्पर्धेत भाग घेतात.' या अर्थनिरूपणान्वये मुस्लिमांचे वेगळे राष्ट्र गृहीत धरण्यात आल्याचे स्पष्ट आहे. अधिकृत प्रादेशिक विभाजन करून त्यावर राजकीय शिक्कामोर्तब व्हायचेच बाकी होते.

जातीय क्रिकेटमध्ये खास स्वास्थ्य असलेला एक छोटासा 'ग्रुप' म्हणजे 'ऑल इंडिया रेडियो मर्चण्ट्स असोसिएशन.' जेव्हा पंचरंगी सामन्यांच्या समितीने एका वर्षासाठी रेडियोवर धावते समालोचन करण्यास संमती न देण्याचा निर्णय घेतला, तेव्हा असोसिएशनने त्याविरुद्ध मोहीम उघडून तो निर्णय रद्दबातल करवून घेण्यात यश मिळवले. त्यांचा युक्तिवाद होता : 'रेडियोत वर्षभरात जे कार्यक्रम होतात त्यांपैकी लोक ज्याची आतुरतेने वाट पाहत असतात असा हा कार्यक्रम असून, प्रत्येक जातीतील, जमातीतील, धर्मातील माणूस तो ऐकत असतो' *(बॉंबे क्रॉनि. १६ डिसेंबर १९४०)*. तथापि, स्पर्धेला अत्यंत जोरदार पाठिंबा मिळाला. प्रेक्षकांकडून, ज्यांना राजकीय वा आर्थिक लाभ मिळवायचा नव्हता असे लोक. 'सिटिझन्स ॲन्टी-पेटॅग्युलर कमिटी'च्या विरोधात त्यांनी मत नोंदवले, त्यांच्या पायांनी आणि त्यांच्या पैशाच्या पाकिटांनी, समितीच्या हाकेकडे दुर्लक्ष करून ते सामन्यांना प्रचंड गर्दी करीत होते. जातीय खेळ खेळले जाऊ नयेत म्हणून बुद्धीवादी 'बॉंबे क्रॉनिकल' मधून लिहित होते, त्याच वृत्तपत्राच्या स्तंभातून क्रिकेट-मैदानावर अधिक मुताऱ्या बांधाव्यात म्हणून वाचक मुंबई नगरपालिकेला विनंती करीत होते. काही क्रिकेटप्रेमींनी तर असा दावा केला की, जाती जमातीमधील तेढ नष्ट करण्यांस स्पर्धेचे सहाय्य झाले आहे. एका पत्रलेखकाने लिहिले, क्रिकेटने 'मुंबईमधील समाजाच्या सर्व वर्गांचे लक्ष वेधून घेतले आहे,

२० रुपये मिळवणाऱ्या हमालापासून, नाही, अगदी एक पै कमाई असणाऱ्या भिकाऱ्यापासून दोंदे सुटलेल्या शेठियांपर्यंत वा टोपीवाल्या नोकरशहापर्यंत, झाडून सर्वजण वेगवेगळ्या संघाचे भाग्य डोळ्यांत प्राण साठवून अवलोकित असतात. त्याहून विशेष म्हणजे, स्पर्धेचे स्वरूप जातीय असले तरी क्रिकेटमध्ये जातीय भावना नाहीत, असल्याच तर नगण्य, आणि नायडुंनी चढवलेल्या षटकाराला कुठलाही हिंदू ज्या उत्साहाने वाहव्वा करतो त्याच उत्साहाने मुसलमानही वाहव्वा करताना तुम्हाला दिसेल' *(बाँबे क्रॉनि, २८ नोव्हेंबर १९३५).*

या धुमाळीत गोची झाली होती ती 'हिंदू जिमखान्या'ची. जातीय क्रिकेट स्पर्धेला लोकांचा प्रचंड प्रतिसाद आणि तिला काँग्रेसचा प्रखर विरोध, या दोन पातळ्यांवर जिमखान्याला कसरत करावी लागत होती. १९४०च्या डिसेंबरमध्ये, एका ख्यातनाम काँग्रेसवाल्याने स्वत:ची नाराजी सूचित केल्याने,'जनरल बॉडी'च्या वादळी सभेत स्पर्धेमधून हिंदूंनी बाहेर पडावे असा ठराव संमत झाला. २८० विरुद्ध २४० मते. जिमखान्याशी संलग्न असलेल्या क्लबांनी इतर जिमखान्यांकडून चिथावणी मिळाल्याने या निर्णयाच्या विरोधात जोरदार आवाज उठवला, परंतु त्यांचा विरोध अयशस्वी ठरला. कचरा खेळाडू गोळा करून त्यांना संघ उभा करावा लागला. *(बाँबे क्रॉनि. १४, २० डिसेंबर १९४०).* हिंदूंचा संघ नसल्याने स्पर्धेतील रंगत गेली, प्रेक्षकांची संख्या रोडावली आणि या आधीच्या स्पर्धांची धार बोथट झाली. डि. एफ्. काराका या वाचकप्रिय स्तंभ लेखकाने विजयी आवेशात 'एक आगळीवेगळी श्रद्धांजली रचली : मुंबई पंचरंगी सामन्यांचा आनंददायी आणि अपेक्षित मृत्यू झाला हे जाहीर करण्यास हिंदी क्रिकेटला दु:ख होत नाही. . . ते थडग्यामधून पुन्हा कदापिही न उठोत' *(बाँबे क्रॉनि. ३० डिसेंबर १९४०. शक्यता आहे, इंग्लिश क्रिकेटचे अवसान झाले म्हणून दुखवटा प्रदर्शित करतेसमयी १८८२च्या 'स्पोर्टिंग टाइम्स'मध्ये वाहण्यात आलेली श्रद्धांजली 'मॉडेल' म्हणून कारकांसमोर असावी)* परंतु ते उठले. बारा महिन्यांच्या आत. खरे आहे, आता नवीन 'सिटीझन्स कमिटी' अस्तित्वात आली होती, आणि ब्रिटिशांच्या मालकीच्या आणि सत्ताधारी वर्गाशी बांधिलकी असलेल्या 'टाइम्स ऑफ इंडिया'ने पंचरंगी सामन्याच्या विरोधात चाललेल्या वाग्युद्धात आपली विरोधी आघाडी स्तंभामधून उघडली. गांधीजींचा इशारा *(क्रिकेट प्रेमीच्या दृष्टिकोनानुसार)* बिनधोकपणे 'पुरानी बात' म्हणून बाजूला करून, संघ पाठवण्याचा 'हिंदू जिमखान्या'ने निर्णय घेतला. जिमखाना एवढा धीट झाला याला कारणे होती : क्रिकेटपटू खेळण्यासाठी उत्सुक होते, सभासद सामना बघण्यासाठी जाण्यास आणि टाळ्या पिटून प्रोत्साहन देण्यास उतावीळ झाले होते, 'बॅलन्स शीट'मधील नफ्याचा आकडा रोडावला होता आणि विशेष म्हणजे १९४०ची स्पर्धा मुस्लिमांनी जिंकली होती.

१९४१ मध्ये गर्दी लोटली आणि हिंदू जिंकले, परंतु पुढील वर्षी 'चले जाव'ची चळवळ देशभर फैलावली आणि स्पर्धा घेणे अवघड झाले. १९४३ मध्ये, तुरुंगाबाहेर असलेल्या काँग्रेसवाल्यांनी विरोधाचे अस्त्र नव्याने पाजळले. त्यांना संस्थानिकांनी साथ दिली. कारण स्वतंत्र हिंदुस्थानचे जे राज्यकर्ते बनणार होते आणि त्यांच्याशी प्रारंभीच समझोता करणे संस्थानिकांना लाभदायक होते. इंदूर, पतियाळा आणि बडोदा या संस्थानांच्या महाराजांनी आपल्या खेळाडूंना आदेश दिले की त्यांनी स्पर्धेत भाग घेऊ नये. परंतु, स्पर्धेत भाग घ्यावयाचा यावर 'हिंदू जिमखाना' ठाम होता. त्याने चलाखी केली, जाहीर केले की, नफ्यातील काही भाग तो 'बेंगॉल फेमिन रिलीफ फंडा'ला देईल : Dimने आता आशा व्यक्त केली की,'पुढील वर्षी आणखी बंगाली दुष्काळ नसेल, त्या वर्षीच्या पंचरंगी सामन्यांचे समर्थन करण्यासाठी' (बॉंबे क्रॉनि. १९ डिसेंबर १९४३). तथापि, क्रिकेटशी हातमिळवणी करण्यासाठीच जणू नव्या आपत्ती कोसळत गेल्या आणि १९४४ मध्ये जिमखान्याने सर्व कमाई 'गुजरात' आणि 'खानदेश फ्लड रिलीफ फंडा'ला दिली. इतर जिमखाने 'हिंदू जिमखान्या'ला अनुसरले. तेव्हा विरोधकांनीही मान्य केले की,'जातीय क्रिकेट स्त्युत्य नाही पण जर का जातीय क्रिकेट अभागी मानवांच्या दु:खाचा थोडासा का होईना परिहार करीत असेल तर जातीय क्रिकेट जगो आणि त्याची भरभराट होवो ! (अमृत बझार पत्रिका, ३ ऑक्टोबर १९४४, बेरी सर्वाधिकारी).

एकोणीसशे चाळीसमध्ये राष्ट्रवादी राजकारणी, विचारवंत, व्यापारी, शक्तिशाली आश्रयदाते (संस्थानिक) आणि वृत्तपत्रे यांच्या विरोधाला पंचरंगी सामन्यांना सामना करावा लागला, तोसुद्धा महायुद्ध आणि दुष्काळ यांच्या पार्श्वभूमीवर. आपल्या नेत्यांच्या आदेशाला धुडकावून, आपल्या खिशातले असतील ते पैसे खर्चून पब्लिक सालोसाल सामन्यांना गर्दी करीत होते. 'खरे सांगायचे म्हणजे, गेली चाळीसएक वर्षे त्यांना या सामन्यांची एवढी चटक लागली आहे की, दारूडा जसा गुत्त्याकडे खेचला जातो तसेच ते खेचले जातात.' (बॉंबे क्रॉनि., १५ नोव्हेंबर १९४४). गुत्ते १९४६ पर्यंत खुले होते, तोवर पाकिस्तानची निर्मिती निश्चित झाली होती आणि स्पर्धा साऱ्यांनाच अडचणीत आणणाऱ्या ठरल्या, त्यांचे अत्यंत कट्टर समर्थक वगळता.

## ६
## जातीय क्रिकेट आणि जातीयवाद

मुंबईत जल्लोष उडवणाऱ्या जातीय क्रिकेट स्पर्धाविषयी विरोधकांचा आक्षेप होता की, मैदानावर आणि बाहेर, जातीवर अधिष्ठित असलेल्या 'आयडेंटिटी'ला स्पर्धामुळे खतपाणी मिळत होते, राष्ट्रीय एकात्मतेची भावना लोप पावत होती, आपण प्रथम हिंदुस्थानी आहोत

याचा विसर पडत होता. काही टीकाकारांचा दावा होता की, पंचरंगी सामन्यांनी धर्माधर्मांतील वैमनस्य दृढ केले होते. अशा टीकाकारांपैकी एक होता ए. एफ्. एस्. तल्यारखान. बॉबी तल्यारखान म्हणून क्रिकेटप्रेमी त्यांना ओळखत. ते लेखक आणि क्रीडासमालोचक होते. एकोणीसशे तिशीमध्ये क्रिकेटचे सामने लोकप्रिय करण्यात त्यांचा सिंहाचा वाटा होता. ते उत्कृष्ट समालोचक होते. आकाशवाणीवर ते एकटेच समालोचन करीत, अगदी तपशीलवार, प्रत्येक चेंडूची दखल घेत. परंतु एकोणीसशे चाळीशीच्या प्रारंभी क्रिकेटचे वेड लावणारे हेच तल्यारखान पंचरंगी सामन्यांचे कट्टर विरोधक बनले. चौपाटीवर 'सिटीझन्स कमिटी'ने आयोजित केलेल्या एका जाहीर सभेत प्रखर हल्ला चढवताना ते म्हणाले,''व्यक्तीवर 'हिंदू', 'मुस्लीम' वा 'पारशी' असे गोंदलेले असेल तरच ती खेळात उत्साहने भाग घेऊ शकते या विचाराने कुणी जन्माला येत नाही ही गोष्ट वादातीत आहे. पुढील आयुष्यात तिला अशा साचेबंद चौकटीत बंदिस्त केले जाते. याचा संबंध राजकारणाशी नाही. शाळेत असे शिकवले जात नाही. विद्यार्थी त्यांच्या आईवडिलांकडून हे शिकत नाहीत. ही कल्पना त्यांच्या मनात आखून दिली आहे ती पंचरंगी सामन्यांनी, जे जातीय ईर्षेनेच जाणीवपूर्वक खेळले जातात. (बॉंबे क्रॉनि, २३ नोव्हेंबर १९४१).

या विश्लेषणान्वये, फोडा आणि सत्ता गाजवा या ब्रिटिशांच्या धोरणामध्येच स्पर्धेचे बीज दडलेले होते. याची परिणती पुढे झाली ती अशी, १९४७ मध्ये पाकिस्तानच्या मागणीला बळकटी येऊन ती रास्त मानली गेली. १९१२ ते १९४५ या दरम्यान जातीवर अधिष्ठित असलेले मुंबईतील चौरंगी आणि पंचरंगी सामने, १९४७ मध्ये जातीवर अधिष्ठित असलेल्या हिंदुस्थानच्या फाळणीला कारणीभूत ठरले होते का?

क्रिकेटपटूंचे या संदर्भातील मतप्रदर्शन लक्षात घेता वरील प्रश्नाला नकारात्मक उत्तर द्यावे लागेल. सिंधमधील दोघा क्रिकेटपटूंनी, यातील एक हिंदू होता, दुसरा इंग्रज, आवाहन केले होते की जातीय क्रिकेट जातीजातींमध्ये तंटे निर्माण करतात असे ज्यांना वाटते त्यांनी 'कराचीमध्ये यावे आणि खेळाडू आणि प्रेक्षक यांच्यामधील खेळाडू स्पर्धा आणि सौहार्द्राची भावना पाहावी.' पुढे पुस्ती जोडली होती, 'मतपरिवर्तन होऊनच ते माघारी जातील.' हे आवाहन केले गेले होते १९२८ मध्ये. पण एका तपानंतरही तसाच दावा काहीजण करीत होते, जिथे तेव्हा खेळ आणि राजकारण ऐन जोषात होते त्या मुंबई नगरीतील पंचरंगी सामन्यांच्या संदर्भात. १९४० च्या नोव्हेंबरमध्ये मुस्लीम संघाचा कर्णधार सैद वझिर अली यांनी वृत्तपत्रात निवेदन दिले होते. त्यात त्यांनी दावा केला होता की, स्पर्धा अजिबात राष्ट्रविघाक नाही, होणारही नाही, आणि हिंदी क्रिकेटच्या भल्यासाठी ती चालू राहायला हवी.' पुढील वर्षी, जेव्हा पंचरंगी सामन्यांचे भवितव्य डळमळीत होते तेव्हा हिंदूंचे कर्णधार सी. के. नायडू यांनी लिहिले की, स्पर्धा जर थांबवण्यात आल्या तर 'हिंदी क्रिकेटचे मरण'

निश्चित. त्यांना ठामपणे वाटत होते की स्पर्धेने 'कुठल्याही जातीय तेढीला प्रोत्साहन दिलेले नाही.' वस्तुस्थिती अशी होती की तिने 'खेळाडू स्पर्धा वाढीला लावली आणि जातीय ऐक्याला हातभार लावला. तिने जातींना एकत्र आणले, त्यांच्यामध्ये फूट पाडली नाही.' मुस्लीम क्रिकेटपटू मुश्ताक अलीच्या मते सामन्यांनी 'नेहमीच निकोप खेळाडू स्पर्धेला प्रोत्साहन दिले आहे, आणि खेळाडू आणि प्रेक्षक यांच्यामध्ये खिलाडू वृत्ती वागवलेली आहे.' त्याचा अनुभव असा : 'भोवतालच्या स्टँडमधून टाळयांच्या गजरात आणि आरोळ्यात भेदभाव न करता, चांगल्या खेळीचे कौतुक केले जाते, ते कौतुक नायडूंच्या (हिंदू) षटकारासाठी असेल, निस्सारांच्या (मुस्लीम) बळी घेणाऱ्या 'फिझर'साठी असेल वा भायाच्या (पारशी) लाजवाब क्षेत्ररक्षणसाठी असेल.' (बॉंबे क्रॉनि. २६ नोव्हेंबर १९४०; 'टाइम्स ऑफ इंडिया', १४ नोव्हेंबर १९४१) या संदर्भात, 'क्रिकेट डिलाइट्फुल' (१९६७) या पुस्तकात मुश्ताक अलींनी सांगितलेली आठवण बोलकी आहे. मुश्ताक स्वत: बऱ्याच वेळा प्रतिस्पर्धी संघाबरोबर सराव करीत आणि त्यांचे हितोपदेशक होते हिंदू बुजुर्ग सी. के. नायडू. एका महत्त्वाच्या सामन्याच्या वेळी, नायडूंनी मुश्ताकांना फर्मावले की त्यांनी दुखापत झालेल्या हाताकडे दुर्लक्ष करून मैदानावर जावे आणि हिंदूवर विजय मिळवून देण्यासाठी मुस्लिमांना हातभार लावावा. सांगितले : 'नेहमीच प्रथम संघ, त्यानंतर क्रिकेटपटू.'

क्रिकेटपटूंच्या विधानात प्रामाणिकपणाचा अंश आहे परंतु 'केस' अशी खरोखरीच होती का? हिंदू आणि मुस्लीम चकमकी एकमेकांच्या कौशल्याला आणि कामगिरीला कडाडून दाद द्यायला प्रवृत्त करीत होत्या, की अन्यत्र खेळल्या जाणार होत्या अशा जीवघेण्या चकमकींची ती नांदी होती? या विषयावर बऱ्याच काळ चर्चा झडत आहेत. *'संग्राम उणे गोळीबार'* या शब्दांत आंतरराष्ट्रीय खेळाचे *जॉर्ज ऑरवेल* यांनी केलेले विधान एखादा उद्धृत करतो. १९३९च्या नोव्हेंबरमध्ये पंचरंगी सामन्याच्या वादाचा सूर जेव्हा तापायला सुरुवात झाली होती तेव्हा एका ब्रिटिश लेखकाने नमूद केले होते : 'अल्डस हक्स्लेंनी म्हटले आहे की आशावादी सैद्धान्तिक राष्ट्राराष्ट्रांना एकत्र जोडणारा बंध म्हणून खेळाकडे बघतात, परंतु सांप्रतच्या राष्ट्रवादाच्या भावना लक्षात घेता, आंतरराष्ट्रीय गैरसमजुतींचे ते आणखी एक निमित्त बनले आहे. फुटबॉलचे मैदान आणि शर्यतीचे ट्रॅक यांवर होणाऱ्या झुंजी अधिक गंभीर स्पर्धांची केवळ नांदी, त्यांना कारणीभूत ठरणारी निमित्ते'(बॉंबे क्रॉनि. ८ डिसेंबर १९३९) ब्रिटिश कादंबरीकारांमधील एकवाक्यतेचे हे चित्र पूर्णत्वास नेणारा ॲलन सिल्लिटो म्हणतो की, 'तथाकथित शांततापूर्ण काळात राष्ट्रीय भावना जाग्या ठेवण्याचे एक साधन म्हणजे खेळ. तो राष्ट्रीय भावनांना खतपाणी घालतो, अंती युद्ध योजून.' ('मॉमेन्ट्स अँड कॅव्हर्न्स (१९७३) मधील 'स्पोर्ट अँड नॅशनॅलिझम' या प्रकरणामधून)

खेळाडूंचे मत याहून भिन्न आहे. १९६८ मध्ये 'इंटरनॅशनल ऑलिम्पिक कमिटी' दक्षिण



अनुक्रमणिका

आफ्रिकेला पुन्हा सहभागी करून घ्यावे की नाही यावर विचारविनिमय करीत होती, तेव्हा अमेरिकन काळ्या ॲथलिटांनी मेक्सिको ऑलिम्पिकवर बहिष्कार टाकण्याची धमकी दिली होती. जेसी ओवेन्सने बहिष्काराला विरोध करताना सांगितले होते : (वांशिक) गैरसमजांची दरी मिटवून टाकण्यास 'ॲथलिटिक्स'मध्ये आम्हाला जेवढे शक्य झाले आहे तेवढे अन्यत्र नाही' शक्यता आहे, ३२ वर्षांमधील बर्लिन ऑलिम्पिकमधील त्याचा स्वतःचा अनुभव त्यांच्या मनात जागा झाला असावा. त्या ऑलिम्पिकमध्ये, ओवेन्सने प्रतिष्ठेची म्हणून मानल्या जाणाऱ्या लांब उडीमध्ये लुझ लाँग या देखण्या जर्मनाला पराभूत केले होते. तरीही, लाँगने धावत जाऊन ओवेन्सला मिठी मारली होती आणि त्याचे अभिनंदन केले होते; परंतु काळ्या माणसाची ही जीत म्हणजे 'अजिंक्य आर्य' या 'मिथ'ला मिळालेला दणका असेच मानण्यात आले होते (स्वतः हिटलरने हे उघडच).

एरवी वैरभाव बाळगणाऱ्या गटांना, तो काळ्या आणि गोऱ्यांचा असो, ब्राह्मण आणि अस्पृश्यांचा असो, किंवा हिंदू आणि मुसलमानांचा असो, एकत्र आणण्याचे कार्य खेळाने केले. परंतु खेळाडू ज्यांचे घटक होते त्या विशाल समाजात त्याने एकोपा निर्माण केला होता का, की त्याऐवजी पुरातन द्वेष आणि वैर यांना खतपाणी घातले होते? चौरंगी सामन्यांचा पुरावा पूर्णपणे निर्णायक नाही. सिंधचे एक माजी गव्हर्नर सर लॅन्सलॉट ग्रॅहम यांची खात्री झाली होती की 'जातीय सामने जातीजमातीमध्ये सलोखा निर्माण करतात आणि मैदानावर व मैदानाबाहेर त्यांच्यात सुसंवाद घडवून आणतात, केवळ क्रिकेटमध्येच नव्हे तर इतर खेळांमध्येही.' लॉर्ड हॅरीस यांचे मत याहून भिन्न नव्हते : स्पर्धा 'कुठल्याही जातीय सहजवैरावर मात करू शकेल. उदाहरणार्थ, मला वाटते, तिने एकात्मतेच्या भावनेने विविध जातीजमाती एकत्र आणायला हव्यात, त्याच भावनेने क्रिकेट खेळला जायला हवा.' क्रिकेट जमातींना काही काळासाठी एकत्र आणू शकत असला तरी 'हिंदुस्थानच्या जनतेला एक राष्ट्र म्हणून संबोधणे अशक्य आहे' याविषयी हॅरीसच्या मनात संशय नव्हता : Divide et impera (फूट पाडा आणि सत्ता गाजवा) ही हिंदुस्थानातील ब्रिटिशांची नीती आहे या आरोपाला उत्तर देताना ते म्हणतात : ' फूट पाडण्याचा प्रयत्न करण्याची ब्रिटिश राज्याला काहीएक आवश्यकता नाही; क्रिकेटपेक्षाही अधिक गंभीर असलेल्या बाबींवरून हिंदुस्थानचे नेटिव आपणहून ते अत्यंत परिणामकारकरित्या करतात.'

तेव्हाच्या आणि सांप्रतच्या हिंदी राष्ट्रवाद्यांच्या लेखी, हे मत प्रदर्शन म्हणजे ब्रिटिशांची अंतस्थ इच्छा उघड होऊ नये म्हणून पांघरलेला बुरखा होता. गांधीजी आणि काँग्रेस यांनी सच्ची आणि दृढ राष्ट्रीय एकात्मता घडवून आणली आहे हे मानण्यास ब्रिटिश तयार नव्हते. ब्रिटिश अधिकाऱ्यांच्या दाव्याच्या सार्वकालिकतेबद्दल इतिहासकार शंका व्यक्त करतील. एकोणीसशे वीसमध्ये ज्या गोष्टींनी एकात्मता घडवून आणली असे सांगितले जाते, त्या

गोष्टींनी एकोणीसशे चाळीशीमध्ये नवीन द्वेषभावना उत्पन्न केल्या नसतील वा जुन्याच द्वेषभावनांचे पुनरुज्जीवन केले नसेल कशावरून? वस्तुस्थिती अशी होती : चौरंगी सामन्यांच्या पहिल्या तपात, पारश्यांचा पराभव करणे हीच हिंदू क्रिकेटपटूंची प्रबळ इच्छा होती. पारश्यांनी क्रिकेट खेळायला प्रथम सुरुवात केली होती. मुंबईच्या बाजारात ते हिंदूंचे प्रतिस्पर्धक होते आणि सर्वात महत्त्वाचे कारण, ब्रिटिश राज्याशी त्यांनी जुळवून आणलेले सांस्कृतिक आणि आर्थिक सख्य. १९१९च्या डिसेंबरमध्ये, हिंदू संघाने प्रथमच चौरंगी सामन्यात पारश्यांचा पराभव केला, त्या वेळी मैदानावर व त्यानंतर मैदानाबाहेर उडालेला जल्लोष बेफाम होता, दीर्घ काळ चालू होता. पारशी अजिंक्य आहेत ही समजूत या विजयाने हिंदूंनी खोटी पाडली होती आणि त्यांचे पाठीराखे या अभूतपूर्व विजयाने धुंद झाले होते. अंतिम सामना खेळला जायचा होता. तरीही 'हिंदू जिमखान्या'ने हिंदू क्रिकेटपटूंना जंगी मेजवानी दिली होती. प्रत्येक जातीने आपल्या जातीच्या प्रत्येक खेळाडूचा सत्कार केला होता. परंतु अंतिम सामन्यात हिंदूंची मुस्लिमांशी गाठ पडली तेव्हा सामन्याच्या दुसऱ्या दिवशी, त्या दोन्ही संघांना ताज महालमध्ये 'डिनर' आयोजित करण्यात आले होते. सर इब्राहीम रहिमतुल्ला हा कायदेतज्ज्ञ अध्यक्षस्थानी होता. अंतिमत: हिंदूंनी विजय मिळवला त्या वेळी आनंदोत्सवाला फारसे उधाण आले नव्हते (बाँबे क्रॉनि. ४,९, डिसेंबर १९१९)

१९१९ मध्ये पारशी हेच हिंदूंचे खरे प्रतिस्पर्धी होते; क्रिकेटमध्ये आणि व्यापार धंद्यात. राजकीय दृष्ट्याही, गांधीजींच्या पुढाकाराने खिलाफत चळवळीने (ही चळवळ खलिफांना पूर्वीची सत्ता मिळवून देण्यासाठी सुरू झाली होती. पहिल्या महायुद्धानंतर ब्रिटिशांनी या सत्तेची प्रथमत: खच्ची केली होती, तदनंतर पाश्चात्य विचारसरणीचा पगडा असलेल्या केमाल अत्तातुर्कने ती पूर्णपणे संपुष्टात आणली होती) हिंदू-मुस्लिमांमध्ये बंधुत्वाची भावना जागवली होती. हे परिवर्तन ह्या अलीकडच्या काळातील अभूतपूर्व घटना होती. 'इस्लाम जिमखान्या'च्या वेगाने प्रगती करणाऱ्या संघाला आपलेपणाने वागवले जात होते. १९२४ मध्ये मुस्लीम पहिल्यांदा चौरंगी सामना जिंकले तेव्हा हिंदू खेळाडू प्रतिस्पर्धांच्या जिमखान्याकडे गेले होते. मुख्य वक्ते होते मोहम्मद अली जीना. तेवीस वर्षांनंतर ज्या वेगळ्या राष्ट्रासाठी ते लढा देणार होते त्याचा विचारही या काळात त्यांच्या मनात डोकावला नव्हता. वस्तुत: पाकिस्तानचे हे भावी संस्थापक हिंदु-मुस्लिम ऐक्याचे प्रभावी प्रवक्ते म्हणून ओळखले जात होते. जीना म्हणाले की क्रिकेट दोन गटांना एकत्र आणू शकतो, 'मुसलमानांच्या विजयात हिंदू बांधवही सच्च्या खिलाडू वृत्तीने आनंद लुटू शकतात. क्रिकेट मैदान जीवनातील अनेक पाठ शिकवील. सामना चालू असताना बंधुत्वाच्या भावनेचा जो प्रत्यय येत होता तो लक्षणीय होता आणि त्यांनी आशा व्यक्त केली की खेळाडू म्हणून मुस्लिमांनी 'चॅम्पिअनशिप' जिंकली त्याबद्दल हिंदू बांधव खचितच खूष होतील, इतकेच नव्हे तर ते त्यांच्या आनंदात सहभागी होतील' (बाँबे क्रॉनि. १२ डिसेंबर १९२४). १९३०-३४च्या सविनय कायदेभंगाच्या चळवळीने हिंदु-मुस्लीम संबंधांना मैदानावर आणि



अनुक्रमणिका

मैदानाबाहेर एक नवीन वळण दिले. खिलाफत चळवळीच्या काळात या दोन समाजांत निर्माण झालेले सौहार्द्र वाढीला लावण्यात गांधीजी आणि काँग्रेस उघड उघड अपयशी ठरले होते. १९३४ मध्ये चौरंगी सामने पुन्हा सुरू झाले तेव्हा गोरे आणि पारशी या दोन्ही संघांना उतरती कळा लागली होती आणि हिंदू आणि मुस्लीम विजेतेपदासाठी अटीतटीने झुंजत होते. दरम्यान, मुस्लीम लिगच्या वाढत्या प्रभावाने– तिच्या प्रमुख पदावर होते आता जहाल बनलेले जीना- त्यांनी-राजकीय आव्हान उभे केले होते, असे आव्हान अर्धशतकाच्या कारकिर्दीत काँग्रेसपुढे ठाकले नव्हते.

चौरंगी सामने आता व्यापक अशा धार्मिक आणि राजकीय संघर्षाचा एक भाग बनले. स्पर्धा अधिकाधिक कडवी होत गेली होती, निकाल खिलाडू वृत्ताने स्वीकारणे जड जाऊ लागले होते. चहाते अधिक पक्षाभिमानी बनले होते, आरडाओरड करून विरुद्ध पक्षाच्या खेळाडूंची हुर्यो करू लागले होते. जातीय क्रिकेटने जमातींना जवळ आणले या दाव्याला विजयनगरच्या महाराजांनी उत्तर दिले आहे : हिंदु-मुस्लिमांची लढत चालू आहे अशा पंचरंगी सामन्याच्या वेळी, एखाद्याने स्टँडला भेट दिली तर, त्याच्या नजरेला पडेल की, एक जमात दुसऱ्या जमातीचे तळपट होवो म्हणून सूडबुद्धीने कशी धगधगत असते आणि 'हिंदूंचा धि:कार असो!' वा 'मुसलमानांचा धि:कार असो!' ही भाषा त्याच्या कानावर पडेल. (बाँबे क्रॉनि, २७ नोव्हेंबर १९४१). या हुल्लडबाजीकडे समंजसवृत्तीने पाहणे क्रिकेटपटूंना नेहमीच शक्य होत नव्हते. १९३६च्या हिंदू-मुस्लिमांच्या उपान्त्य सामन्यात फलंदाजी करायला निघतानाचा अनुभव दि. ब. देवधरांनी नमूद केला आहे : 'अशा ऐन कसोटीच्या क्षणी, प्रेक्षक हुल्लड करायचे आणि येणाऱ्या फलंदाजाचे चित्त विचलित करायचे. चौरंगी सामने खेळले जात होते त्या 'बाँबे जिमखान्या'ची चौकाराची सीमा फार दूर नव्हती, आणि फलंदाजांनां निरुत्साही आणि नाउमेद करणारे प्रेक्षकांचे उद्‌गार फलंदाजाच्या कानी पडू शकत होते. माझी एकाग्रता भंग करण्यासाठी वझिरच्या संघाने केलेली हुल्लडबाजी, केलेले प्रयत्न मी कदापि विसरू शकणार नाही' (आय लुकबॅक : अॅन ऑटोबायोग्राफी, १९६६) मुंबईपासून शेकडो मैल दूर असलेल्या गावात कॉलेज-विद्यार्थ्यांमध्ये हिंदू आणि मुस्लीम असे दोन गट पडत, प्रत्येक गट स्वधर्मियांची तळी उचलून धरण्याच्या ईर्षेने रेडियोवरील समालोचन ऐकत असे. शहरापुरती मर्यादित असणाऱ्या पारशी आणि हिंदू यांच्यामधील स्पर्धेची जागा आता हिंदू आणि मुस्लीम यांच्यामधील देशभरच्या वैमनस्याने घेतली. ही परिस्थिती आढीतेढी करण्याच्या कामी मुस्लिमांच्या विजयांनी हातभार लावला. मैदानावर आणि मैदानाबाहेर कमकुवत म्हणून गणल्या गेलेल्या मुस्लिमांनी १९३४ आणि १९४० या काळात पाचदा विजेतेपद मिळवले. आर. भट्टाचार्य या इतिहासकाराने खेळातील दैव राजकीय दैवास कसे तोड आहे यावर भाष्य करताना लिहिले : 'मुस्लीम राष्ट्रवादामधील चढती भरती

संघाच्या क्रिकेटच्या पराक्रमात आढळून येऊ लागली, स्वत:चे वर्चस्व शाबीत करण्याचे ठिकाण म्हणजे मैदान ('इंडियन क्रिकेट कॅव्हलकेड', १९५७) आता 'दुसऱ्या' जिमखान्याच्या विजयाचे स्वागत करण्यास, विजयोत्सवात हजर राहण्यास क्रिकेटपटू राजी होत नव्हते. हिंदूंचा जेव्हा पराभव झाला, आरोपप्रत्यारोपांच्या फैऱ्या कैक ठिकाणी झडल्या तशा त्या 'बॉंबे क्रॉनिकल'च्या स्तंभांमधूनही झडल्या. या दोषारोपांचा आवाज चढा होता. खेळाडू, कर्णधार, निवड-समिती व्यवसथापक यांच्यावर टीकाकार खाऊ की गिळू अशा ईर्षेने तुटून पडले होते. १९३९ मध्ये ते जिंकले तेव्हा जे. सी. मैत्राने नमूद केल्याप्रमाणे नित्याप्रमाणे पुष्पहारांची खैरात झाली, त्याच्या जोडीने फटाक्यांची जोरदार आतषबाजी झाली, या वर्षाच्या पंचरंगी सामन्यांचे नवीन वैशिष्ट्य. परंतु फटाके उडवणे ही राजकीय वा रणमैदानावरील विजयाचा आनंद व्यक्त करण्याची पारंपरिक पद्धती होती ही पुस्ती मात्र त्याने जोडली नव्हती. त्यानंतरच्या समारंभात, खेळाडूंना ट्रॉफी आणि चेक सन्मानपूर्वक देण्यात आले. समारंभाची सांगता, 'वंदे मातरम' गाण्याने झाली. या राष्ट्रीय गीताचा हिंदू 'फ्लेवर' सुस्पष्ट होता.

क्रिकेटचा अभ्यास करणारे, त्यावर लिहिणारे जे होते त्यांच्या नजेरला संवेदनशीलतेमधील हा बदल जाणवला होता. १९३६ मध्ये मुंबईमध्ये एक स्तंभलेखक रुस्तम वकील यांनी नमूद केले आहे की क्रिकेटपटूचे कौतुक भरभरून होत होते, ते सर्वसमावेशक होते, तरी संघाबद्दलच्या आत्मीयतेमध्ये जातीयतेचा अंश होता. 'क्रिकेटपटू कुणीही असो,कुठल्याही जातीचा वा धर्माचा वा रंगाचा असो, या ना त्या प्रकारे न्याय दिला जातो. फटक्याच्या वा गोलंदाजीच्या नजाकतीला दाद दिली जाते.' परंतु 'या एकमेवाद्वितीय उत्सवाच्या चांगल्या परिणामाला मारक असे गंभीर वैगुण्य होते, 'ते म्हणजे' त्याचे जातीय स्वरूप 'स्पर्धेमध्ये जोवर जातीवर भर दिला जातो तोवर उत्तम संघ विजयी होवो असे म्हणणारा माणूस कल्पित तरी असेल वा महात्मा!' (बॉंबे सेंटिनल, ३ डिसेंबर १९३९)

'त्यांच्या' आणि 'आपल्या', क्रिकेटपटूंविषयीचे प्रेम आणि जमातीविषयीचे शत्रुत्व यांमधील फरक वकिलांनी अधोरेखित केला. त्यानंतर दोन वर्षांनी जे . एम्. गांगुली या कलकत्त्याच्या क्रीडासमीक्षकाने चौरंगी सामन्यांच्या दोन टप्प्यांमधील फरक नोंदवला : 'एक निर्मळ आणि अविकृत, दुसरा जातीय विषाणुंनी ग्रासलेला. स्पर्धेचे बीज रुजले आणि ती सुरू झाली तो काळ वेगळा होता. खेळाचे वातावरण स्वच्छ होते, जातीय आणि धार्मिक भावनांनी ते गढूळलेले नव्हते. खुल्या हिरव्यागार मैदानावर आणि लखलखीत निळ्याभोर आकाशाखाली खेळाडू त्यांची जात विसरत असत आणि खेळ खेळणे हा एकच विचार त्यांच्या मनात असे. आजूबाजूंनी त्यांना जे प्रोत्साहन देत, दाद देत, त्यांच्या गुणवत्तेला आणि झकास कामगिरीला असे, त्यांची जात्त, जमात वा धर्म कोणताही असो. प्रत्येकजण खेळाचा आनंद लुटत असे, कोण विजेता, कोण पराजित हा प्रश्नच अप्रस्तुत असे. चौरंगी

सामन्यातील विजयाकडे जातीय जीत म्हणून नव्हे, तर विजयी संघाच्या उत्तम कामगिरीचे फलित म्हणून पाहिले जात असे, सामन्यानंतर मागे कटुता उरत नसे आणि कोत्या असूयेचा मागमूसही नसे, तर पुढल्या खेपेला इतरांनी याहूनही चांगला खेळ खेळावा म्हणून आकांक्षा प्रज्वलित करण्याचा प्रयत्न असे. एकूण, त्या काळात चौरंगी सामन्यांनी अनिष्ट परिणाम केले नव्हते, उलट निकोप स्पर्धेला उत्तेजन दिले होते आणि क्रिकेटला डोळसपणाची जोड दिली होती.'

'ते सुखद दिवस आता इतिहासजमा झाले आहेत, ज्यांना जातीय पिसाटपणा जागा करून स्वत:चे ईप्सित साध्य करायचे आहे आणि राजकीय क्षेत्रात शक्य होईल तेवढे सारे उपद्व्याप करूनही जे शांत होऊ शकत नाही, उलट नवीन भूमी आणि हिरवीगार कुरणे यांच्या शोधात जे बाहेर पडतात, त्या आपमतलबी पुढाऱ्यांचे आभार मानायला हवेत. खेळाच्या पवित्र मैदानाची विटंबना करण्यासही ते मागेपुढे पाहत नाहीत. म्हणूनच सांप्रत क्रिकेट मैदानावर ज्या गोष्टी दिसत आहेत त्या घडून आल्या. याच कारणे जातीय क्रिकेट आणि जातीय वैमनस्य यांमध्ये चौरंगी क्रिकेटची अधोगती झाली आहे. ('इंडियन क्रिकेट', जानेवारी १९३८ या अंकामधील 'क्वाड्रँग्युलर क्रिकेट. अ प्ली फॉर इट्स ॲबॉलिशन' या लेखामधून)

अर्थात् हे लिहिले गेले होते ते हिंदू आणि मुस्लीम यांनाच मनात ठेवून. वस्तुत: जेव्हा वांशिकदृष्ट्या वा धार्मिकदृष्ट्या निकालांचे अर्थनिरुपण केले जात नव्हते तो काळ निरभ्र होता असे नव्हे. कटुता आणि वैमनस्य, विजय आणि आनंदभरा जल्लोष, प्रारंभापासूनच स्पर्धेचे अविभाज्य घटक होते. बाळू बंधूंच्या घटनेने खरेखरीच दाखवून दिले होते की जमातींमधील सामाजिक विषमता नष्ट करण्याच्या कामी क्रिकेट सहाय्यभूत होऊ शकतो, परंतु त्याच वेळी क्रिकेट एका जमातीच्या विरोधात दुसऱ्या जमातीला मजबूतरित्या एकत्र आणू शकतो हेही निदर्शनास आणून दिले होते. क्रिकेट मैदानावर आणि अन्यत्र, वांशिक स्तरावर हिंदू गोऱ्यांच्या विरोधात होते; आर्थिक आघाडीवर ते पारश्यांच्या विरोधात होते; आणि अंतिमत: आणि आनुषंगीकरित्या, स्वतंत्र हिंदुस्थान हे एक संघ राष्ट्र होणार की त्याचे विभाजन या प्रश्नावर मुस्लिमांच्या विरोधात 'जातीय' क्रिकेटमध्ये 'जातीय' संघर्षाचे बीज प्रारंभापासून होते. ही गोष्ट एकानेच अचूक हेरली होती. हिंदी क्रिकेटचा पहिला इतिहासकार– तो होता हिंदी क्रिकेटचा पहिला बंडखोर, विद्रोही, १८८१ च्या पोलो-विरोधात विनंती अर्ज करायला लावणारा चिथावणीखोर. ज्यांच्या विश्वास होता की 'क्रिज' अरुंद अशीच आहे, गोरा काळा बनू शकेल एवढी, ज्यांनी पाहिले होते जातीय क्रिकेट म्हणजे निरंतरची खिलाफत चळवळ. सौहार्द्र वाढवणारी. त्या साऱ्यांना *शापूरजी सोराबजी* यांनी तेव्हाच इशारा दिला होता. 'सर्व राजकीय मतभेद नाहीसे होतील वा क्रिकेट संस्थेद्वारा साऱ्या आपमतलबांना मूठमाती मिळेल अशी अपेक्षा करणे म्हणजे मूर्खांच्या नंदनवनात राहणे' (द स्ट्रगल : पोलो व्हर्सेस क्रिकेट, १८९७) (रामचंद्र गुहा यांच्या लेखावरून)



अनुक्रमणिका

# भाषा आणि समाज

## सर्वभाषा समभाव?

## भाषा संस्कृती आणि राष्ट्रीय अस्मिता (Identity)

**–विठ्ठलराव गोठणकर**

भाषा, संस्कृती आणि राष्ट्रीय अस्मिता यासंबंधी या लेखात विचार करण्यात येणार आहे. तथापि लिखित अथवा बोलीभाषा या स्वरूपातली भाषा हेच संस्कृतीचे माध्यम असल्याकारणाने, एखाद्या संस्कृतीत भाषेची परिस्थिती नेमकी काय असते हाच या लेखाचा मुख्य विषय आहे. अधिक फोड करून सांगावयाचे झाल्यास बहुसांस्कृतिकता (MULTI CULTURALISM) ही भाषेवर किती प्रमाणात अवलंबून आहे? या प्रश्नाचाच विचार अधिक करून होईल. 'राष्ट्र' या संकल्पनेचा विचारही या चर्चेत अनुस्युत आहे. प्रथम एक मुद्दा लक्षात घेतला पाहिजे, तो हा की 'राज्य' आणि राष्ट्र या दोन वेगळ्या गोष्टी आहेत. आपण सारेच जण कोणत्या ना कोणत्या राज्यात राहतो. राष्ट्रात रहात असतोच असे नाही. या राष्ट्र-राज्यातून लोक-व्यवहारासाठी भाषेचाच (उदा. शाळातून मिळणारे शिक्षण) वापर होतो. परंतु तो वापर कुठे आणि कसा करावयाचा या संबंधीचे निर्णय हे राजकीयच असतात आणि ते महत्त्वाचे असतात. 'राज्य' ही प्रत्यक्ष अस्तित्वात असलेली शासन व्यवस्था आहे. 'राष्ट्र' ही संकल्पना आहे. हे आपण विसरता कामा नये. (भारत हे 'राज्य' आहे पण जगभर पसरलेले 'हिंदु' हे हिंदु राष्ट्राचे घटक असू शकतात) हे या ठिकाणी आपण विसरता कामा नये. आपण सारेच 'राज्या'तून रहात असतो. राज्य आणि राष्ट्र (उदा. संयुक्त राष्ट्र– संघाला अभिप्रेत असलेले 'राष्ट्र') यांच्यात सामान्यपणे एकात्मतता (Indentity) आहे असे गृहीत धरले जाते. हा फारच धोकादायक गोंधळ आहे.

साम्राज्यवादात अंर्तभूत होत होत्या, त्या वसाहती व अंकीत देश आता जवळ जवळ नाहीसे झालेले आहेत. आपण सारेच जण आजकाल स्वतंत्र्य आणि सार्वभौम राज्यातून वसती करून आहेत. याला अपवाद फारच थोडे आहे. या अपवादाचे एकच उदाहरण चारशे पॅलोस्टिनिएन लोकाना हद्‌पार करण्यात आल्यानंतर ते सारे लोक लेबनॉन आणि इस्त्राईल या दोन राज्यांच्या दरम्यान असलेल्या पण कोणाच्याच अधिपत्याखाली नसलेल्या प्रदेशात वसती करून आहेत. पण असे अपवाद जवळजवळ नाहीच असे म्हटले तरी चालेल. याचे कारण हद्‌पार करण्यात आलेले लोक आणि निर्वासितही सामान्यपणे कोणत्या ना कोणत्या राज्यात रहातच असतात. यदाकदाचित् या 'राज्यां'स ते आपले 'राज्य' म्हणत नसले तरी ते एका कोणत्या तरी राज्यात रहातच असतात. उदा. बांगला देश, येथील 'बिहारी मुसलमान' हे आपणास पाकिस्तानचे नागरिक म्हणवितात. पण त्याना पाकिस्तान आपले म्हणत नाही. असे



अनुक्रमणिका

असले तरी ते 'बांगला देश' या राज्यात राहातात. 'राज्य' म्हणजे काय त्यात कोणत्या गोष्टी अंर्तभूत आहेत याबद्दल एकमत होण्यास सर्वसामान्यपणे आडकाठी येणार नाही. याचे कारण अठराव्या शतकाच्या उत्तरार्धात जे अनेक नवे स्वतंत्र्य राजकीय गट (ENTITY) तयार झाले. ते या 'राज्य' म्हणजे काय या नव्या आदर्शानुसार तयार झालेले आहेत. या गटाने एक विशिष्ट भूप्रदेश व्यापलेला असतो. हा प्रदेश सामान्यपणे सलग असतो. निदान सलग असणे हे अधिक पसंत केले जाते. शेजारच्या राज्यांपासून या प्रदेशाच्या सीमा अगदी स्पष्टपणे ठरवून दिलेल्या असतात. एकाच प्रादेशिक सरकारच्या अमलाखाली असलेल्या या भूप्रदेशात राहणाऱ्या सर्व लोकांवर– याला एकही अपवाद नसतो– एकाच कायद्याचा वापर करण्यात येतो व त्यानुसारच व्यवहार होतो. या राजवटीविरुद्ध व तिच्या कायदेकानुनाविरुद्ध कोणाकडे जाऊन फिर्याद करून न्याय मागता येत नाही. याला अपवाद फक्त त्या प्रदेशातील राजवटीने मान्यता दिलेल्या न्यायपिठांचा. त्यांच्याकडे धाव घेता येते. उदा. युरोपमधील राज्यांचा संघ (EUROPEAN UNION) तयार झाल्यानंतर त्या युरोपिय संघराज्यांचे कायदेकानून तयार झाले. पण संघराज्यात सामील असलेल्या राष्ट्रांच्या राष्ट्रीय कायदेकानूनांपेक्षा या नव्या कायद्यांची सत्ता वरच्या थरावरची आहे, हे प्रस्थापित होण्यासाठी या युरोपिय संघराज्यातील प्रत्येक राष्ट्राची त्या कायद्याना मान्यता मिळवावी लागली होती. एखाद्या राज्याच्या अमला–खालील प्रदेशात जे कोणी जन्मास येतात व तेथेच राहतात, ते सारेच त्या राज्याचे नागरिक आहेत. पण या राज्याने ज्यांची गणना 'परदेशी' म्हणून केलेली असते. त्याना हे नागरिकत्व प्राप्त होत नाही. त्याना त्यातून वगळण्यात आलेले असते. राज्यातील शासनाला नागरिकत्व कोणास बहाल करावयाचे याबद्दलची सत्ता राज्याला असते, तसेच ते नागरिकत्व काढून घेण्याचा अधिकार असतो. लोकशाही राज्यव्यवस्था ज्या राज्यात विद्यमान आहे त्याठिकाणी मात्र हा अधिकार तेथल्या शासनव्यवस्थेकडे नसतो. 'परकीय' म्हणून ज्यांची गणना केली जाते, ते दुसऱ्या एका राज्याचे नागरिक आहेत असे मानले जाते. पहिल्या महायुद्धानंतर या परिस्थितीत चांगलाच फरक पडला आहे. अमानुषतेकडे झुकणारा तो बदल आहे, व दिवसें दिवस त्यातील अमानुषता वाढत आहे. पहिल्या महायुद्धानंतर कोणत्याच देशाचे नागरिकत्व नसलेल्या माणसांच्या संख्येत वाढ होऊ लागली, व आता ती संख्या चांगलीच प्रचंड झाली आहे. या अशा नागरिकांचा उल्लेख या शोकजनक शतकात, 'राज्यहीन' 'बेकायदेशीर उपरे' किंवा अन्य तसल्याच कनिष्ठता दर्शविणाऱ्या बिरूदाने केला जातो.

मुख्यत्वेकडून एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस केव्हातरी राज्यातील नागरिक हे एखाद्या 'कल्पित समूहाचे' (imagined community) बरोबर एकात्म (Identity) आहेत असे मानले जाऊ लागले. या 'कल्पित समूहा'तले लोक भाषा, संस्कृती, एथनिसिटी आणि यासारख्या अनेक गोष्टीनी एकमेकांबरोबर जोडले गेले आहेत, असेही गृहीत धरण्यात आलेले होते. एथनिसिटी, सांस्कृतिक आणि भाषिक बाबतीत एकसंघ आणि एकजीव असलेली लोकसंख्या असलेले राज्य हे 'आदर्श राज्य' समजले जाऊ लागले. ही आदर्श



अनुक्रमणिका

राज्याची कल्पना म्हणजे लोकसंख्येचे एथनिक शुद्धीकरण करण्यास आमंत्रण होते, ते किती धोकादायक व कमालीचे अवास्तव आहे हे आपणास आता चांगलेच ज्ञात झाले आहे. याचे कारण आजच्या घडीला या जगात जी दोनशे राज्ये विद्यमान आहेत, त्यापैकी फारतर बारा राज्ये ही या 'आदर्श राज्याची' कसोटी पार करतील. शिवाय 'एथनिक शुद्धीकरण' या कल्पनेने या राज्यांचे मुळ संस्थापक जे कोणी असतील तेही आश्चर्यचकित झाले असते. ज्या समाजाच्या शासन-व्यवस्थेचा आधार 'राज्य' नावाची गोष्ट होती; तो समाज मानववंश-शास्त्रातील कल्पनावर आधारित नव्हता. आपल्या राज्यात समाविष्ट असलेल्या लोकसंख्येत एथनिक, सांस्कृतिक वा भाषिकदृष्ट्या किती भिन्न प्रकारचे लोक आहेत, हा मुद्दाच 'राज्या'च्या संस्थापने मागे नव्हता. एक समान राज्यघटना आणि समान कायदा यांच्या अमलाखाली एकत्र नांदण्याचा निर्णय घेतलेल्या सार्वभौम लोकांचा समूह, ही त्यांच्या 'राज्य' या संघटनेविषयीची कल्पना होती. स्पष्टपणे विचार करणे, सर्वांना समजावयास सोपी व ओघवती असलेली फ्रेंच ही भाषा. त्या भाषेत आब्बे सिअयेस (ABB'É SIEYES) यांनी असे सांगितले की 'राष्ट्र' हे त्या राष्ट्रात राहणाऱ्या लोकांचे प्रतिनिधी आहे. या स्वरूपात एकच विधान सभा आणि समान कायदा यांच्या अमलाखाली राहण्यासाठी एकत्र आलेला व्यक्तींचा समूह म्हणजे 'राष्ट्र'. समान एथनिक वारसा, समान, संस्कृती, भाषा, धर्म आणि तत्सम अशाच इतर गोष्टी असलेले लोकसमूह, निरनिराळ्या भूप्रदेशातील 'राज्या' करवी आविष्कृत होतील ही संकल्पनाच मुळात नवीन आहे. निरनिराळ्या 'राज्यां'चे एकवार सोडून द्या. कोणत्यातरी एका राज्यात तरी ही परिस्थिती आढळेल, ही कल्पनादेखील त्याकाळी कोणाला मंजूर नव्हती. इतिहासात तोवर मान्य झालेल्या मूल्यापासून ते प्रत्यक्षात पाठ फिरविण्यासारखे होते. झिओनिझमच्या (ज्यू राष्ट्रवाद) बाबतीत नेमके हेच घडले

इ. स. १९०० साली एका सनातनी ज्यू धर्मगुरूने लिहिले होते,

*"इस्त्रायल राष्ट्रातील लोकांनी धर्मातीत (सेक्युलर) राष्ट्रवादाचा पोशाख चढविला पाहिजे असे सांगणारे काही परके लोक डोके वर काढू लागले आहेत. इस्त्रायल हे इतर राष्ट्रा-सारखेच एक राष्ट्र असले पाहिजे. राष्ट्रीय भावना, भूमी व भाषा. या तीन गोष्टीवर ज्यू धर्मवाद (JUDAISM) आधारित आहे. या रसायनात राष्ट्रीय भावना हीच गोष्ट स्तुतीस सर्वात अधिक पात्र आहे. ज्यू धर्मवाद टिकवून धरण्याच्या दृष्टीने ती अत्यंत कार्यक्षम व परिणामकारक आहे. 'तोरा' आणि धर्माप्रमाणे वर्तन, हा प्रत्येक व्यक्तीचा खाजगी प्रश्न आहे. हरएक व्यक्तीचा जो काही कल असेल त्यावर तो अवलंबून असेल, असे विचार हे लोक मांडतात. या अशा दुष्ट व अनिष्ट प्रवृत्तींच्या (EVIL) व्यक्तींची परमेश्वराकडून कान उघडणी होऊ दे आणि जे कोणी जरूसलेमची निवड करतील ते त्यांची तोंडे बंद करू देत."*

हे येथे उल्लेखिलेलें विधान करणारे डिझिकोव्हर रेब्ब (DZIKOVER REBBE) हे ज्यू धर्मगुरू ज्यू धर्मवादाची जी परंपरा आहे त्याचे उत्तम प्रतिनिधी होते हे निःसंशय.

आणखीही एक मुद्दा याठिकाणी नमूद केला पाहिजे. या लेखाचा जो मुख्य विषय आहे, त्यालाच तो जाऊन भिडणारा आहे. न बदलणारी व केवळ त्याच समाजाची अशी एकच एथनिक सांस्कृतिक अगर दुसऱ्या एखाद्या प्रकारची तत्सम एकात्मता (Identity) ही संकल्पनाच एक मनोविच्छेदी (BRAIN WASHING) संकल्पना आहे. आपणास एका वेळी एकच जोडा वापरता येतो. आपणास दुसरा जोडा वापरताच येणार नाही. तसे काही मानवी मनाच्या एकात्मतेचे (Indentity) नाही. उदा. लंडन शहरात राहणारी 'पटेल' ही व्यक्ती ही आपणास प्रामुख्याने एक ब्रिटिश नागरिक, एक भारतीय, एक हिंदू, एक गुजराथी भाषिक, केनियातून स्थलांतर करून आलेली व्यक्ती, पाटीदार समाजाचा एक घटक, पटेल कुळातील एक व्यक्ती, किंवा अन्य काही समजते. यापैकी एखाद्या वेळी आपणास ती काय समजते, हे सर्वस्वी ती ज्या परिस्थितीत असेल त्यावर अवलंबून आहे. परदेशी लोकांची ओळखपत्रे तपासणारा अधिकारी, एखादा पाकिस्तानी, एखादा मुसलमान, एखादा बंगाली भाषिक आणि इतर असेच अनेक या सर्वांपैकी ज्या कोणाबरोबर तो 'पटेल' व्यवहार करीत असेल त्यावर त्याची एकात्मता (Identity) अवलंबून असते. थोडक्यात सांगावयाचे झाल्यास प्लेटोच्या तत्त्वज्ञानाला अभिप्रेत असलेल्या 'सारतत्वा'सारखे एकच सारतत्व 'पटेल' या व्यक्तीत असत नाही. तो वर उल्लेखिलेल्या सर्व आणि इतरही अनेक गोष्टी एकाच वेळी असतो.

ऐतिहासिक दृष्टीने विचार करता, राष्ट्रीय एकजनसीपणामागे, बहुपेडी एकात्मततेची कल्पना आहे. गतकाळात (आणि आजही त्याचे अवशेष आढळतात) प्रत्येक जर्मन मनुष्य याचेपाशी दोन किंवा तीन प्रकारच्या एकात्मता एकाच वेळी असत, उदा. तो एखाद्या टोळीचा– जमातीचा (सॅक्सन, स्वाबिएन, फ्रँक) घटक असे, एखाद्या जर्मन राज्याचा वा प्रदेशाचा नागरिक असे; किंवा जर्मन भाषिक संस्कृतीचा घटक असे. तत्कालीन जर्मन भाषिक संस्कृतीत, एक सर्व जर्मनानी प्रमाणभूत मानलेली लिखित जर्मन आणि अनेक स्थानिक बोलीभाषा समाविष्ट होत्या. या बोलीभाषातून 'लिखित– जर्मन' वाङ्मय विकसित होण्यास सुरुवात झालेली होती. युरोपिय धर्मसुधारणा युगात बायबलचे भाषांतर स्थानिक भाषातून होऊ लागले. बायबलची वेगवेगळ्या जर्मन– बोलीभाषेत अनेक भाषांतरे त्या काळी तयार झाली होती. हिटलरची राजवट येईपर्यंत, जो कोणी बव्हेरीयन, सॅक्सन किंवा स्वाबियन होता, तोच जर्मन समजला जात असे. लिखित अशी जी प्रमाणित जर्मन सांस्कृतिक भाषा होती, तीच जर कोणी बोलला तर ह्या सर्वांना ती सामान्यपणे समजत असे.

बहुभाषिकता, आणि बहुसांस्कृतिकता, हा या लेखाचा मध्यवर्ती मुद्दा आहे. त्याच्यापाशी येथे आपण स्वाभाविकपणे येऊन ठेपतो. एक संकल्पना या स्वरूपात या दोन्ही संकल्पनांचा ऐतिहासिक दृष्टीकोनातून विचार करता त्या नवीनच संकल्पना आहेत. तीन वेगवेगळे घटक आणि परिस्थिती यांचा संयोग होईपर्यंत या संकल्पनांचा उदय होणे शक्य नव्हते. सार्वत्रिक



अनुक्रमणिका

साक्षरता हे उद्दिष्ट, सर्व सामान्य जनाचे राजकीय जनजागरण आणि संघटन, आणि एका विशिष्ट स्वरूपातील भाषिक राष्ट्रवाद हे ते तीन घटक होत.

ऐतिहासिक दृष्टीकोनातून विचार करता, वेगवेगळ्या भाषिकांचे आणि भिन्नभिन्न संस्कृतीचे सहजीवन ही एक नेहमीचीच परिस्थिती होती. एकच भाषा, आणि एकच संस्कृती असलेल्या लोकांचीच केवळ वस्ती असलेला प्रदेश सामान्यपणे आढळत नाही. युरोपमधील आईसलँडसारखा देश ह्या देशाची लोकसंख्या फक्त तीन लाख, महाराष्ट्रातल्या अनेक जिल्ह्यांची लोकसंख्या ह्यापेक्षा कितीतरी जास्त आहे. पण एवढ्या कमी लोकसंख्येच्या देशातही आइसलँडीकरणाचे धोरण, स्विकारून, त्यासाठी करोल कायदे करून, या छोट्या समाजाचा एकजीनकीपणा टिकवून धरावा लागतो. या देशात स्थलांतर करून कायम राहाण्यासाठी येणाऱ्या प्रत्येक परकीय नागरिकाला, आपले मुळातील नाव बदलून, त्याला एक जुने आईसलंडी नाव घ्यावे लागते. (समजा तो 'नेहरू' असला तर त्याला 'जेधे' व्हावे लागते) 'तसा त्या राज्याचा कायदाच आहे. फ्रेंच राज्यक्रांती झाली त्यावेळी फ्रान्समधील फक्त पन्नास टक्के लोकाना मोडकी-तोडकी फ्रेंच भाषा बोलता येत होती. त्यापैकी फक्त बारा टक्के (१२%) लोक ती 'शास्त्रशुद्ध' बोलत असत. याहीपेक्षा व सगळ्यात अगदी टोकाचे उदाहरण इटाली या राज्याचे. इटाली हे जेव्हा 'राज्य' झाले, तेव्हा दर शंभर माणसांपैकी फक्त दोन किंवा तीनच लोक सामान्यपणे 'इटालीयन' भाषेचा घरात बोलताना उपयोग करीत. याचे कारण त्याकाळी बहुतेक सारेच 'मौखिक' जगतात, वावरत असत. म्हणूनच बोली-भाषा आणि अल्पसंख्य अशा सुशिक्षितांची लिखित भाषा यांच्यात दुवा असण्याची आवश्यकताच नव्हती. एका विशिष्ट अल्पसंख्य लोकांचाच खास करून लेखन आणि वाचन यांच्याशी संबंध होता. अशी परिस्थिती जोवर होती, तोवर एक जिवंत भाषा या स्वरूपात वावरण्याचे इटालीयन भाषेला काहीही कारणच नव्हते. भारतातेच उदाहरण घ्या. मुसलमानी अमल ज्या विभागात होता, तेथे पर्शियन ही राज्यकारभाराची भाषा होती. कोणीही भारतीय (यात बाटलेले मुसलमानही झाले) ही भाषा आपल्या घरी बोलत नसे. ब्रिटिशांचे राज्य आल्यानंतर 'इंग्लिश' ही राज्यकारभाराची भाषा झाली. ती तरी कोणाला समजत होती?– पूर्वीच्या काळी अशिक्षित व्यक्तीला, त्याची भाषा नसलेल्या व्यक्तीशी जेव्हा व्यवहार करणे प्राप्त होते. (तेव्हा व्यवहार करावाच लागे) अथवा त्याच्याशी कोणत्याना कोणत्या मार्गाने संपर्क साधावा लागे. अशा प्रसंगी दोन्ही भाषा येणाऱ्या दुभाष्याचा वापर करणे क्रमप्राप्तच होते. असा दुभाषा मिळणे, हे शक्य होत असे नाही. पण व्यवहार-व्यापार-उदीम या गोष्टी चालूच असत. त्याचा परिणाम इंग्लिश/फ्रेंच या भाषा व स्थानिक (उदा. चिनी) भाषा यांचा संकर होऊन PIDGIN अगर CREOLE पिडगिन / क्रिओल यांच्यासारख्या भ्रष्ट भाषा तयार होत; व त्यात व्यवहार चाले. या भ्रष्ट-भाषा लिखित स्वरूपात नसल्या, तरी संपर्क भाषा या स्वरूपात त्या फारच परिणामकारक कामगिरी बजावित. आजकाल भाषाशास्त्रज्ञात या अशा भ्रष्ट भाषांचा अभ्यास करणे, ही एक फॅशनबेल गोष्ट झालेली आहे.



अनुक्रमणिका

एक सर्वसामान्य नागरिक हा जेव्हा 'राज्या'चा महत्त्वाचा घटक बनतो, तेव्हाच एकच राष्ट्रीय भाषा, या गोष्टीला महत्त्व प्राप्त होते. तसेच राज्यातील सर्व नागरिकाना लिहिता वाचता यावयास हवे, अशी जेव्हा धारणा असते, तेव्हाच लिखित भाषा व बोलीभाषा या दोघात संबंध असणे आवश्यक होऊन बसते. परंतु या ठिकाणी एक मुद्दा लक्षात ठेवावयास हवा. तो म्हणजे सार्वत्रिक असे प्राथमिक शिक्षण मिळाले पाहिजे, हा विचार व त्या संबंधीची कृती या दोन्ही गोष्टी शंभर वर्षापेक्षा जुन्या नाहीत. अर्थात या विधानाला फारच थोडे अपवाद आहेत, पण ते आहेत.

राज्यात एकच प्रमाणित भाषा असली पाहिजे, याबद्दल मुळात जे प्रतिपादन झाले, ते सांस्कृतिक दृष्टीकोनातून नव्हते. ते सर्वस्वी लोकशाहीवादी होते. समजा एखाद्या राज्याचा व्यवहार, हा त्या राज्यातील नागरिकाना न समजणाऱ्या भाषेत होत असेल, तर मग त्या व्यवहाराबद्दल ज्ञान करून घेणे वा तो समजावून घेणे हे बाजूलाच राहिले. सामान्य नागरिकाला त्यात कधीही सहभागी होता येत नसे. (उदा. इ. स. १८४० पूर्वी हंगेरीच्या लोकसभेचा कारभार लॅटिन भाषेत होत असे) केवळ अल्पसंख्य अभिजनाचेच सरकार असावे याबद्दलची ती हमी नव्हती का? असे प्रतिपादन इ. स. १७९४ साली आब्बे ग्रेगॉईर (ABB'E GREGOIRE) यांनी केले होते. म्हणूनच समानता हे प्रधान मूल्य समजल्या जाणाऱ्या फ्रान्समध्ये, फ्रेंच मनुष्य आपल्या घरात कोणतीही भाषा बोलू दे, पण फ्रेंच नागरिकाला फ्रेंच भाषेत शिक्षण घेणे आवश्यक होते. लोकशाहीवादी क्रांतियुगाची अमेरिका ही निर्मिती आहे. त्या देशातही फ्रान्ससारखीच परिस्थिती होती. अमेरिकेत स्थलांतर करून आलेल्या नागरिकाला म्हणूनच 'इंग्लिश' भाषेच्या ज्ञानाबद्दल परीक्षा द्यावी लागे. लिओ रोस्टेन यांचे THE EDUCATION OF HYMAN KAPLAN या प्रख्यात पुस्तकाचे जे कोणी वाचक असतील त्याना या भाषिक एकजीनसीपणा प्राप्त करून घेण्याच्या प्रक्रियेचा चांगलाच परिचय होईल. कापलान याना इंग्रजी भाषेशी बौद्धिक 'कुस्ती' करावी लागत होती. याचा अर्थ ते आपल्या पत्नीबरोबर घरात इंग्रजी भाषेत संभाषण करीत होते असा नाही. ते त्या दोघांच्या मातृभाषेत-यिडिश (YIDISH) मध्येच करीत होते. तसेच त्यांची मुले स्थानिक इंग्रजी शाळेत दाखल झालेली होती. धर्म ही जशी प्रत्येकाची खाजगी बाब होती. तसेच भाषेबाबतही होते. बिगर इंग्रजी भाषिकानी, आपआपसात व्यवहार करताना, त्यानी कोणत्या भाषेत बोलावे व लिहावे हा ज्याचा त्याचा वैयक्तिक प्रश्न होता. या संदर्भात येथे नमूद केलेली वस्तुस्थिती लक्षणिय अशीच आहे. इ. स. १९७० साली म्हणजे सध्या ज्या प्रचंड प्रमाणात लोक अमेरिकेत स्थलांतर करून जात आहेत, त्या काळापूर्वी सुमारे साडे तीन कोटी अमेरिकन लोकानी आपली मातृभाषा इंग्रजी नाही असे नोंदविले होते. यात आणखी एक कोटीची भर घालावयास हवी; कारण त्यांच्याबद्दल नीटशी माहिती उपलब्ध नाही. या माहितीत आणखी एक मुद्दा दडलेला आहे. या सर्व लोकांपैकी तीन- चर्तुथांश लोक अमेरिकेतच जन्माला आलेले होते.



अनुक्रमणिका

प्रमाणीत राष्ट्रीय भाषेतून दिलेले शिक्षण वगळता, इतर भाषातून मिळणारे शिक्षण, हे सरकारी क्षेत्रात येत नव्हते. परंपरागतपणे तो खाजगी क्षेत्राचा भाग होता, अथवा अल्पसंख्य जमातीनी स्थापलेल्या स्वयंसेवी संस्थामार्फत, अगर स्थानिक पातळीवरील संस्थामार्फत ते शिक्षण देण्यात येत असे. अमेरिकेत ही परिस्थिती इ. स. १९८० सालापर्यंत कायम होती. उदा. इ. स. १८४० साली सिनासिनाटी या शहरात इंग्रजी व जर्मन या दोन्ही भाषात शिक्षण मिळावे या स्थानिक व्यवस्थेत सुरुवात झाली. इ. स. १९६० ते १९७०च्या दरम्यान इंग्रजी आणि एखाद्या अन्य भाषेतून मध्यवर्ती सरकारमार्फत शिक्षण देण्यात यावे, या मागणीने जोर धरला. असे होईपर्यंत सिनसिनाटी शहराच्या धर्तीवरची द्वैभाषिक शिक्षण देण्याची व्यवस्था अनेक ठिकाणी एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धातही प्रचलीत होती. इ. स. १९७०च्या आसपास या अशा प्रकारचे शिक्षण देणाऱ्या संस्था हळूहळू नाहीशा झाल्या, या ठिकाणी एक मुद्दा अधोरेखित केला पाहिजे. द्वैभाषिक शिक्षण ही शैक्षणिक मागणी नव्हती. ती राजकीय मागणी होती. इ. स. १९७०च्या सुमारास अमेरिकेमध्ये एक नवे एथनिक आणि एक नवे अस्मितादर्शी राजकारण उदयास येत होते, त्याचा ती आविष्कार होता.

एखाद्या ठिकाणी एकच प्रभावी अशी राष्ट्रीय लिखित वा बोलीभाषा नसे. तसेच एखाद्या भाषेला असलेल्या उच्च प्रतीच्या प्रतिष्ठेबद्दल, त्या भाषेव्यक्तीरिक्त इतर भाषिकांची नापसंतीच होती. ही अशी परिस्थिती ज्या ठिकाणी अस्तित्वात होती त्या ठिकाणी आणखी वेगळाच बनाव सिद्ध होत असे. उदा. हॅप्सबर्ग साम्राज्यात बहुभाषिक नागरिक होते. या साम्राज्यात इ. स. १८४८ मध्ये राज्य– कारभाराची भाषा आणि शालेय– शिक्षण कोणत्या भाषेत घ्यावे हा मुद्दा राजकीय झाला होता. यानंतर बेल्जियम आणि फिनलंडमध्येही हेच घडले होते. या अशा देशातून ज्या सर्व– सामान्य सुत्राच्या अनुषंगाने व्यवहार चालत असे त्याचे उत्तम उदाहरण 'हंगेरीयन नॅशनॅलिटी लॉ' हे आहे. या कायद्यानुसार प्राथमिक शाळेच्या पातळीवर लोकाना आपल्या मातृभाषेत शिक्षण मिळणार होते. काही विशिष्ट परिस्थितीत माध्यमिक शाळांच्या पातळीवरही लोकांना आपल्या मातृभाषेतच शिक्षण मिळणार होते. सरकारी अधिकाऱ्याशी व्यवहार करताना प्रत्यक्षपणे अगर दुभाष्याकरवी लोकांना मातृभाषेचा वापर करण्यास परवानगी दिली पाहिजे असे या कायद्याने सांगितले होते. परंतु या कायद्यातदेखील 'भाषा' म्हणजे काय हे राजकीय परिभाषेतच सांगितलेले आहे, हे खास करून लक्षात घेतले पाहिजे. या कायद्याने केलेल्या भाषेच्या व्याख्येत, ज्यूंच्या यिडीश (YIDISH) भाषेचा अंतर्भाव नव्हता. तसेच ISTRIA इसट्रीया प्रदेशात बोलली जाणारी CREOLE क्रिओल स्वरूपाच्या संकरीत– बोलीभाषेचाही त्यात अंतर्भाव नव्हती. इ. स. १८५० साली इसट्रीया या विभागात तेरा वेगवेगळ्या राष्ट्रीय बोलीभाषा होत्या अशी भाषातज्ज्ञांनी नोंद घेतलेली आहे.

बोलीभाषा अगर परिभाषा (JARGON) यांच्यापेक्षा वेगळेपणा दर्शविणारी 'भाषा' असे स्वरूप प्राप्त करून घ्यावयाचे असेल, तर ती भाषा ज्या प्रदेशात प्रचलीत आहे त्या प्रदेशाची गणना 'राष्ट्र' म्हणून व्हावी लागेल, अथवा त्या प्रदेशातील लोक हे 'राष्ट्रीक'

म्हणून समजले जाणे आवश्यक असते. आता हे जे सूत्र आहे ते ज्या प्रदेशात एकच भाषा बोलणारे लोक चांगलेच स्थिरावलेले असतात, त्याठिकाणी चांगले काम करते. याठिकाणी स्थानिक अथवा विभागीय सरकाराना ज्यास सर्वसामान्य वापरात असलेली भाषा (UMGANG–SPRACHE) म्हणता येईल तिचा वापर करून चांगल्या कार्यक्षमतेने आपला कारभार चालविता येईल. परंतु एकच भाषिक लोक नसून 'मिश्र' अशा भाषिक लोकसमूहांची वस्ती आहे अशा ठिकाणी आणि बहुतेक मोठ्या शहरातून हे सूत्र उपयोगी ठरत नाही. उलट त्यामुळे अनेक मोठे प्रश्न निर्माण होतात. या ठिकाणी अर्थातच खरा प्रश्न असतो, तो प्राथमिक शिक्षणाचा नसून, तो माध्यमिक, विश्वविद्यालयीन आणि उच्च शिक्षणबाबतचा असतो. याच क्षेत्रात मुख्य भाषिक लढाया खेळल्या जातात. याठिकाणी सार्वत्रिक साक्षरता अथवा आम जनतेला शिक्षण हा प्रश्न नसून, बिनसरकारी अभिजनांची भाषिक प्रतिष्ठा हा प्रश्न असतो. येथे एका गोष्टीचे खास करून स्मरण केले पाहिजे. युरोपमध्ये दुसऱ्या महायुद्धापूर्वीच्या काळात वय वर्षे १५-१९च्या दरम्यान असलेल्या लोकसंख्येपैकी फक्त दोन टक्के विश्वविद्यालयीन वा इतर उच्च शिक्षण घेत होती. डेन्मार्क आणि नेदरलँडचा सारखे जे युरोपिय देश खऱ्याखुऱ्या लोकशाही करता प्रसिद्ध होते व आहेतही त्या देशातही तीच परिस्थिती होती. या अशा परिस्थितीत विश्वविद्यालयीन शिक्षण घेणाऱ्या फिनलंडसारख्या एखाद्या चिमुकल्या देशाच्या रहिवाशांकडे, फ्रेंच किंवा स्विडिश भाषेचा अभ्यास करण्याची निश्चितपणे क्षमता होती. एवंच पुन्हा एकदा, मुद्दा होता तो शैक्षणिक नसून राजकीय होता.

प्रत्येक देशाची एकच भाषा, ही एक विचार पद्धती आहे. राष्ट्र– राज्य होण्याच्या जे देश आकांक्षा बाळगून होते, त्यांच्या आकांक्षाचा ती विचारधारा अविभाज्य भाग बनली होती. या अशा राष्ट्र– राज्यात अर्थातच भाषिक अल्पसंख्य जरूर होते. त्यापैकी ज्या कोणी आपल्याला मातृभाषेतच शिक्षण मिळावयास हवे असा आग्रह धरला, त्याठिकाणी खास व्यवस्था केली गेली होती. स्वित्झर्लंडसारखे बहुभाषिक राष्ट्रे हे पंगत मोडून बसलेले राष्ट्र समजले जाते. परंतु स्वित्झर्लंडमधील राज्यव्यवस्थेचा विचार करिता, त्यास खरे म्हणजे बहुभाषिक राष्ट्र मानता येणार नाही. राज्यव्यवस्थेसाठी स्वित्झर्लंडचे कॅन्टोन नावाने ओळखल्या जाणाऱ्या अनेक विभागात विभाजन झालेले आहे. प्रत्येक कॅन्टोनला फार मोठ्या प्रमाणात स्वायत्तता व स्वातंत्र्य देण्यात आलेले आहे. त्यातील जवळजवळ सगळ्याच कँन्टोनमध्ये एकच भाषा प्रमाण मानण्यात येते. याचे कारण सारेच कॅन्टोन सामान्यपणे एक भाषिकच आहेत. या कारणामुळे स्वित्झर्लंड हे तसे बहुभाषिक राष्ट्र नाही. कोणत्या ना कोणत्या साम्राज्यात समाविष्ट असलेले देश दुसऱ्या महायुद्धानंतर स्वतंत्र्य झाले. सोव्हियट रशियाचे. साम्राज्य या विधानात समाविष्ट अर्थातच करता येणार नाही. आपल्या स्वत:ची अशी एकच राष्ट्रभाषा असली पाहिजे, नसली तर ती विकसित केली पाहिजे, हे या सर्व राष्ट्रांचे ध्येय होते. राष्ट्रीय शिक्षण आणि संस्कृती याना पायाभूत मागून हे उद्दिष्ट साध्य करावयाचे होते. या तत्वानुसार पाकिस्तानात उर्दू, भारतात हिंदी, श्रीलंकेत सिंहली आणि अल्जेरियात अरेबिक या भाषाना,

त्या त्या देशात राष्ट्रभाषेचे स्थान देण्यात आले. आपले संकल्पित उद्दिष्ट साध्य झाले आहे असे या देशास वाटले. परंतु हा आभास वा स्वप्न फारच धोकादायक होते. फार मोठ्या लोकसमूहाच्या दृष्टीने एकच भाषा हा नियम तसा गैरलागूच आहे. आपल्या लोकसमूहाची व्याख्या एथनिसिटी आणि भाषा यांच्या सहाय्याने करणारे जे अगदी छोटे असे जे लोकसमूह असतात त्यांना एकजिनसीपणा हे आपले ध्येय आहे असे वाटते व त्या पाठीच ते लागलेले असतात, उदा. लॅटव्हिया हा फक्त लेटीश भाषिकासाठी आणि मोलडाव्हिया हा फक्त रोमानिअन भाषिकासाठी. आता असे घडले की इ. स. १९४० मध्ये सोव्हियट रशियाने मोलडाव्हिया हा प्रदेश पुन्हा एकदा आपल्या रशियन साम्राज्यात सक्तीने सामील करून घेतला. परंतु हे साम्राज्यवादी कृत्य घडले, त्यावेळी, मोलाडाव्हियात पन्नास टक्क्याहून अधिक लोक रोमानिअन भाषिक नव्हते. त्यात युक्रेनियन, रशियन, बल्गेरियन, तुर्क आणि इतर अनेक भाषिक गट अंतर्भूत होते. याठिकाणी एक मुद्दा स्पष्ट करून घेणे आवश्यक आहे. आपली भाषा बदलण्यास जेव्हा एखादा बहुएथनिक आणि बहुभाषिक गट तयार नसतो, तेव्हा एकच राष्ट्रीय भाषा असणारा समाज निर्माण करण्याकरिता काय करावे लागते? त्यासाठी आमजनतेवर जुलूम– जबरदस्ती– सक्तीच करावी लागते. इ. स. १९३९ साली, आणि त्या पूर्वीही पोलंडमध्ये तेहतीस टक्क्याहून अधिक लोक बिगर– पोलीश होते. आज त्या देशात जवळजवळ सर्वच लोक पोलीश आहेत, हे कसे घडले? पोलंडमध्ये जे कोणी जर्मन होते. त्याना पश्चिम युरोपमध्ये हद्दपार करण्यात आले. लिथुनिअन, बेलोरशियन, आणि युक्रेनियन यांची वस्ती ज्या विभागात होती, त्याना पोलंडपासून अलग करून सोव्हियट साम्राज्याच्या पूर्व विभागात सामील करून घेण्यात आले. कैक लाख ज्यूंचा खून करण्यात आला (हे सारे मानवताप्रेमी (?) सोव्हियट साम्राज्याची कृपेमुळे घडले) याज–बरोबर आपण हेही लक्षात ठेवले पाहिजे की, आजच्या जगात रोजगाराच्या शोधार्थ म्हणून लोक प्रचंड प्रमाणात स्थलांतर करून एका देशाहून दुसऱ्या देशात जातात, निर्वासित म्हणून जातात. देशातल्या देशात शहरीकरणाचा एक भाग म्हणून एका विभागातून दुसऱ्या विभागात जातात. प्रेक्षणिय स्थळे पहाणे वा स्थलपालट या कारणासाठी फार मोठ्या संख्येने लोक निरनिराळ्या देशात स्वखुषीने संचार करीत असतात. अशा परिस्थितीत कोणताही एक देश 'एकजिनसी' या परिस्थितीत फार काळ रहाणे शक्य नाही. दयामाया न दाखविता, अगदी परक्या लोकांना वारंवार बाहेर घालवून देऊन, तो देश 'एकजिनसी' परिस्थितीत ठेवणे शक्य होईल. थोडक्यात आपल्या व्यक्तिरिक्त इतराना 'अस्पृश' ठरविणारा समाज, कायद्याने आणि जुलूम– जबरदस्तीने निर्माण करावा लागेल.

एवंच एखाद्या देशात शैक्षणिक आणि सांस्कृतिक आविष्कार यांच्यासाठी एकाच भाषेचा वापर करावयास मिळणे, ही जवळ जवळ अशक्य कोटीतली गोष्ट आहे. तसे यदाकदाचित् झालेच, तर त्याचा अर्थ त्या भाषेचा वापर करण्याच्या बाबतीत, त्या भाषिकानी अत्यंत अशिष्ट मार्गांनी, त्या भाषेला तो अधिकार मिळवून दिल्याचे ते उदाहरण ठरेल. याचाच अर्थ



अनुक्रमणिका

तो तसा वापर करावयास मिळणे, हे राजकीय तत्त्वप्रणालीचे द्योतक आहे किंवा फार करून ते व्यवहारी निर्णयाचे द्योतक ठरेल. याला अपवाद फक्त शैक्षणिक क्षेत्राचा. समाजात जी भाषा बोललीच जात नाही, किंवा जी भाषा बोलली जाते, तिच्याशी जिचा संबंधच नाही, अशा लिखित भाषेत सार्वत्रिक उद्दिष्ट साध्य करणे हे अत्यंत कठीण काम आहे. नव्हे ते अशक्यच आहे. याला अर्थातच अपवाद आहे. असंख्य पालक आणि एखादा लोकसमूह हा आपल्या मुलानी या अशा परक्या भाषेत शिक्षण घ्यावे वा साक्षर व्हावे याबद्दल उत्सुक असतो. उदा. इंग्लिश ही ज्या देशांची भाषा आहे, त्या ठिकाणी स्थलांतर करून रहावयास गेलेल्या जवळ जवळ सर्वच पालकांची इच्छा आपल्या मुलांनी इंग्रजीतच शिक्षण घ्यावे अशी असते यासाठी द्वैभाषिक शिक्षणाची आवश्यकता आहे का? हा मुद्दा वेगळाच आहे. तो याठिकाणी प्रस्तुत नाही. परंतु जी भाषा अगोदरच प्रस्थापित झालेली आहे, त्या भाषेत शिक्षण न मिळता ते दुसऱ्याच भाषेत मिळावे अशी मागणी सरकारी पातळीवरून केली जाते. (उदा. महाराष्ट्रातील उर्दू शाळा काँग्रेसचे एक मान्यवर नेते बाळ गंगाधर खेर यांची देणगी आहे !) या मागणीमुळे ती अन्य भाषा शिकणारांचा तसा काहीही दृष्य फायदा होणार नसतो. अशा परिस्थितीत ही मागणी करण्यामागचा हेतू, कोणाला तरी सत्ता व प्रतिष्ठा यांची प्राप्ती व्हावी हाच असतो. तसेच या मागणीचा एकंदर शिक्षण घेण्याबाबत व शिक्षण घेण्यातील सुलभतेशी तसा काहीही संबंध नाही. तथापि जी भाषा, या अशा स्पर्धेत उतरूच इच्छित नाही, अशी भाषा तगून रहाण्यासाठी, आणि तिचा विकास होण्यासाठी, ही मागणी एखाद-वेळ करण्यात येईलही, याचे कारण त्या भाषेत शिक्षण घेतले नाही, तर ती भाषा हळूहळू नष्टच होण्याची शक्यता असते. परंतु ही मागे हटत चाललेली भाषा, जिवंत रहाण्यासाठी त्या भाषेत सरकारी पातळीवर मान्यता मिळालीच पाहिजे का? हा एक ज्याविषयी दिलचस्पी असावी असा प्रश्न आहे. परंतु शिक्षण क्षेत्रातील सर्वोच्च तज्ज्ञाचे म्हणणे असे आहे की, द्वैभाषिक शिक्षण हे त्याचे उत्तर नव्हे.

आणखी एक महत्त्वाचा मुद्दा नमूद करणे आवश्यक आहे. एखादी भाषा शुद्ध मौखिक अवस्थेतून वाचन व लिखाण यांच्या प्रांतात जेव्हा प्रवेश करते, त्यावेळी त्या भाषेची प्रकृतीच बदलते. या संबंधात पु. ल. देशपांडे यांनी मोठे खुमासदास व तितकेच प्रत्यक्ष अनुभवावयास येणाऱ्या वस्तुस्थितीचे वर्णन केले आहे. ते लिहितात, (कवी) "बोरकरानी हट्टाला पेटून कोकणीचा किल्ला लढवला. पण ह्या उत्साहाच्या भरात एक दुर्दैव ओढवल कोकणीचे बोरकरांच्या कविमनाला ओढवणारे लाघवी, घरगुती, मात्र ती लेखी व्हायला लागल्यामुळे हरवत चालले. तिचे सारे साजरेपण, तिची सारी शक्ती, घर, कुटुंब, कुळागार, देऊळ यांच्या अवतीभोवती होती. तिच्या अंगावर घरच्या लक्ष्मीचे तेज होते. ती कुळागारातून खेळत होती. उत्सवात मिरवत होती. तिचे सारे विषय कुटुंबात जे बोलले जातात असले अंत:करणाच्या उमाळ्याचे होते. ती आता घर सोडून सरकारी कामाला लागली, आणि तिचे

हे भाबडेपण संपले, आणि सध्या ती न पेलणारी राजकी भाषा बोलू लागली. 'मिनिस्टर ऑफ फॉरेन अफेअर्स'चा 'भायेल्ल्या भानगडीचो मंत्री' झाला असेही मी ऐकले आहे.....'' ''भारताच्या मुख्यमंत्री इंदिरा गांधी आणि रशियाचे कॉशीजिननी हाँगी नव्ये दिल्लीत'' काय-ठरलेले किंवा ''इंटरनॅशनल मोनेटरी फंडाचे किते जाले'' असला घाराभायेल्ल्या भानगडीत पडण्याची पाळी आली.' थोडक्यात ही भाषा समाजाच्या शिक्षणाची व सरकारी व्यवहाराची भाषा बनते. असे झाले म्हणजे मग त्या भाषेचे व्याकरण प्रमाणित करावे लागते. शब्द-संग्रहातील शब्द नक्की करावे लागतात. शुद्ध लेखनात शिस्त आणावी लागते, शब्दांचे स्पेलिंग ठरवू द्यावे लागते, आणि वेळप्रसंगी त्या भाषेतील शब्दांचे उच्चारही प्रमाणित करावे लागतात. ह्या नव्या गरजा ज्या निर्माण झालेल्या असतात त्याची दखल घेऊन शब्दसंग्रह वाढवावा लागतो. उदा. आधुनिक हिब्रु भाषेतील किमान एक तृतीयांश शब्द हे विसाव्या शतकात तयार झालेले आहेत. याचे कारण बायबल कालीन जुनी हिब्रु भाषा, ही प्राचीन काळातील मेंढपाळ, गोपालक आणि शेतकरी यांची भाषा होती. आधुनिक गरजांच्या दृष्टीने ती अनेक बाबतीत अपुरी ठरत होती. म्हणून नवे शब्द तयार करून शब्दसंग्रह विस्तारित करावा लागला. माबीनिगिओन (MABINIGION) यांची जुनी वेल्श सुधारून नवीन वेल्श तयार होणे क्रमप्राप्त होते. आधुनिक राज्यात काही भाषा सांस्कृतिक भाषा म्हणून अगोदरच प्रस्थापित झालेल्या आहेत. उदा. इटालियन, स्पॅनिश, फ्रेंच, इंग्लिश, रशियन, स्कँडेनेव्हियन, आणि फारतर आणखी एक दोन भाषांची नावे घेता येतील. परंतु या भाषानादेखील एकोणिसाव्या शतकाच्या अगोदर सामाजिक जोडजोडीच्या (SOCIAL ENGINEERING) अवस्थेतून जावे लागले होते. या जगातील बहुतेक सर्व भाषाना— त्या जेव्हा आधुनिक बनत होत्या, तेव्हा या अवस्थेतून जावे लागलेले आहे. गेल्या शतकात ही प्रक्रिया वेगाने होत होती. आता तिचा वेग मंदादला आहे एवढेच. उदा. स्पेनमधील बास्क भाषेसारख्या काही भाषा अजूनही त्या अवस्थेतून मार्गक्रमण करीत आहेत. भाषेचे केवळ मौखिक स्वरूप जाऊन ती 'लिखित भाषा' या अवस्थेत प्रवेश होणे, या प्रक्रियेत तिचे बोलीभाषा हे स्वरूप नष्ट होते. आफ्रिकन- अमेरिकन अथवा त्यांचे पाठीराखे काही वेळा असे म्हणतात की 'आमच्या मुलाना प्रमाणित इंग्रजी शिकवू नका, कारण घरात ते ती भाषा बोलत नाहीत. 'म्हणून ते ज्या 'काळ्या इंग्रजीत बोलतात. तीच त्याना शिकवा.' वास्तविक 'काळी इंग्रजी' हे प्रमाणित इंग्रजीचे भ्रष्ट रूप नाही. ती एक स्वतंत्र्य अशी बोलीभाषा आहे.' तशी ती असेलही परंतु त्या बोलीभाषेचे एकदा शालेय- शैक्षणिक भाषेत रूपांतर झाले म्हणजे मग आफ्रिकन- अमेरिकन मुले जी बोलीभाषा बोलतात, त्यासारखी ती शालेय भाषा मग रहात नाही. एका प्रख्यात फ्रेंच इतिहासकाराची मातृभाषा फ्लेमिश होती. तो एकदा म्हणाला होता 'आजकाल फ्लँडर्स शहरातून जी फ्लेमिश शिकवली जाते, ती भाषा फ्लँडर्समधील माता, आणि आजी-आजोबा आपल्या मुलांना पूर्वी जी फ्लेमिश भाषा शिकवित असत, ती फ्लेमिश राहिलेली नाही.' शब्दशः अर्थ घेऊन हेच सांगायचे झाल्यास ती इत:पर मातृभाषा राहिली नव्हती.



अनुक्रमणिका

प्रख्यात इतिहासकार हॉबसबॉम हे न्यूयॉर्कमध्ये रहात असताना, त्यांच्या घराची देखभाल एक स्पॅनिश बाई करीत असे. तिला स्पॅनिश व गालीसिअन या दोन्ही भाषा येत होत्या. ती स्पेनमधील ज्या विभागातून आलेली होती; तेथल्या सर्वांनाच त्या दोन्ही भाषा येतात. गालीसिअन भाषेचे शुद्धीकरण व प्रमाणीकरण होऊन ती भाषा आता गाल्लेगो या नावाने ओळखली जाते. परंतु त्या स्पॅनिश बाईला ही प्रमाणित भाषा समजत नसे. याचे कारण त्या स्पॅनिश विभागात सर्वांना जी समजत होती, तशी ती समान बोलीभाषा नसून, ती एक सामाजिक रचना बनली होती.

येथवर जे प्रतिपादन करण्यात आले आहे ते बरोबर असेल अगर नसेलही. असे म्हटले याचे कारण बाहेरचे जग हे इतक्या झपाट्याने बदलत आहे की, काही वर्षांपूर्वी प्रस्तुत असणाऱ्या गोष्टी / घटना आज अप्रस्तुत ठरल्या आहेत. राष्ट्रवाद हा जेव्हा ऐनभरात होता. तेव्हा कोणाच्या विचारातही आल्या नसल्या अशा घटना घडल्या आहेत– घडत आहेत. परंतु राष्ट्र– राज्य या अवस्थेत नुकत्याच प्रवेश केलेल्या राज्यांना त्या घटना धोकादायक आहेत असे वाटत नाही. या घटनांपैकी तीन महत्त्वाच्या येणेप्रमाणे – (१) आपण इत:पर केवळ वाचन आणि लेखन यावर आधारलेल्या संस्कृतीत वास्तव्य करून नाही आहोत. (२) सगळीच उद्दिष्टे साध्य करण्यासाठी 'एकच राष्ट्रीय भाषा असावी लागते व अशी राष्ट्रीय भाषा सर्वसामान्यपणे शक्य असते',ही कल्पना मान्य असलेल्या जगात आपण रहात नसून, आपण अगदी आवश्यकपणे बहुभाषिक जगात वास्तव्य करून आहोत. (३) आपण अशा युगात रहात आहोत की, जागतिक पातळीवर परस्पराशी संपर्क साधणसाठी एकच भाषा सध्यातरी आहे. ती भाषा आहे इंग्रजी किंवा तिचे एखादे रूप (उदा. 'भारतीय– इंग्लिश')

यातली पहिल्या क्रमांकाची जी घटना आहे, ती मुलत: चित्रपट, दूरचित्रवाणी, आणि सर्वात महत्त्वाचा घटक म्हणजे छोटा स्ट्रॅन्सीस्टर या सर्वांचा परिणाम आहे. याचा अर्थ असा आहे की, बोलीभाषा ही आमने– सामने बोलली जाणारी घरगुती अगर तत्सम बंदिस्त जगाची भाषा राहिलेली नाही. बाहेरच्या प्रचंड जगाच्या आणि अधिक विस्तृत अशा सांस्कृतिक विश्वाच्या आवाक्यात स्ट्रॅन्सीस्टर ऐकणारी ती निरक्षर माणसे प्रत्यक्ष आली आहेत. या घटनेचा आणखी एक परिणाम असा आहे की, छोट्या भाषा आणि बोलीभाषा यांना सहजपणे तगून राहणे शक्य झाले आहे. एखाद्या स्थानिक आकाशवाणी केंद्रावरील कार्यक्रमास पुरेसा ग्राहक वर्ग देणारी, अगदी कमी लोकसंख्या असलेली भाषा असली तरी ते भागण्यासारखे आहे. एवंच अल्पसंख्य भाषा जिवंत रहावी/यासाठी तरतूद म्हणून फारसे पैसे बाजूला काढून ठेवावे लागणार नाहीत. त्याजबरोबर या सर्व माध्यमाकरवी सर्वच अल्पसंख्य भाषिक एका बहुसंख्यी भाषेच्या प्रभावाखाली येत असल्याकारणाने, भाषिक एकजिनसीपणाची अवस्था येण्यासाठी गती प्राप्त होईलच. साकल्याने विचार करीता, आकाशवाणी छोट्या भाषाना झुकते माप घालते. याउलट दूरचित्रवाणी हे माध्यम त्यांच्याविरुद्धच आहे. पण ही परिस्थिती फार काळ टिकून राहणार नाही. केवळ दूरचित्रवाणी

आणि उपग्रह– दूरचित्रवाणीद्वारा दूरचित्रवाणी हे माध्यमदेखील सर्वच सर्वसामान्यांच्या सांस्कृतिक विश्वाच्या आवाक्यात आलेले आहे. आकाशवाणीला एकेकाळी जे स्वरूप होते, ते दूरचित्रवाणीलाही झपाट्याने प्राप्त होत आहे. न्यूयॉर्क शहरात केबल दूरचित्रवाणीवर, इटानियन, फ्रेंच, चिनी, जपानी, स्पॅनिश, पोलीश, ग्रीक आणि अल्बेनियन भाषातले कार्यक्रम इ. स. १९९४ सालीही उपलब्ध होते. मध्यंतरीच्या काळात, या भाषात दुसऱ्या अनेक भाषांची भर पडली आहे (उदा. हिंदी, बंगाली) मुंबईतही आपण हेच अनुभवतो. गुजराथी, कानडी, तेलगू, तामिळ, मल्याळी, हिंदी आणि इतरही अनेक भाषांचे कार्यक्रम केबल दूरचित्रवाणीवर पहाता येतात. थोडक्यात एखाद्या भाषेचा आपल्या स्वत:च्या अशा समूहापलीकडे, आपले घर आणि परिसर यांच्याही पलीकडे जाऊन, बाहेरच्या मोठ्या जगात प्रदेश करण्यासाठी त्या भाषेला *सरकारी* मान्यता असावयास पाहिजेच असे काही इत:पर नाही. अर्थात याचा अर्थ असा कोणी करू नये की निरक्षर माणसाला दिवसेंदिवस कठीण आणि वाढत जाणाऱ्या अडचणीना तोंड द्यावे लागत नाही. साक्षर माणसाशी तुलना करता निरक्षर माणसाची परिस्थिती अजूनही फारच बिकट आहे. मग त्या निरक्षराची भाषा लेखनाची असो वा संगणकाची असो.

युरोपमध्ये प्रत्येक राष्ट्रात जो प्रमुख बहुसंख्य भाषिक गट असतो, तो ज्या भाषा बोलतो त्यांच्या मिश्रणावर त्या राष्ट्राची प्रमाणीत भाषा आधारलेली असते. कालांतराने त्या भाषेचे रूपांतर त्या राष्ट्राच्या वाङ्मयीन भाषेत होते. एखाद्या साम्राज्याचा भाग, अशा अवस्थेत जे देश पूर्वी होते; व नंतर स्वतंत्र्य झाले, त्याठिकाणी मात्र हे घडत नाही. उदा. श्रीलंका हे राष्ट्र एकेकाळी ब्रिटिश साम्राज्याचा भाग होते. स्वतंत्र्य झाल्यानंतर या राष्ट्राने सिंहली या भाषेला एकमेव राष्ट्रीय भाषेचे स्थान दिले. या धोरणाचे परिणाम फारच धोकादायक व चिंताजनक झालेले आहेत. वस्तुस्थिती अशी आहे की, अशा राष्ट्राना अत्यंत सोईची अशी 'राष्ट्र'भाषा म्हणजे या देशातील सर्व नागरिकाना समजेल अशी मिश्रभाषा अथवा एकमेकांच्या न समजणाऱ्या भाषा बोलणारे लोक एकमेकांशी जेव्हा संपर्क साधतात व केवळ त्यातूनच विकसित झालेली भ्रष्ट भाषा (PIDGIN) ही सर्वात सोईची राष्ट्रभाषा. स्वाहिली, फिलीपिनी, भाषा इन्डोनेशिया ही अशा मिश्रभाषांची काही उदाहरणे आहेत. या धोरणाचा असा फायदा असतो की प्रत्यक्ष बोलल्या जाणाऱ्या भाषांच्या दृष्टीने ही भाषा 'तटस्थ' असते आणि म्हणूनच कोणत्याही भाषिक गटाला आपला तोटा वा फायदा झाला आहे असे वाटत नाही. तोटा झालाच तर फक्त तो अभिजन वर्गाचा होतो. भाषा हे कारण करून, यादवी युद्ध भारतात होऊ नये, यासाठी इंग्रजी ही सरकारी कारभार व व्यवहार करण्याची भाषा पत्करून, भारताने त्या विषयीची सांस्कृतिक किंमत मोजलेली आहे. श्रीलंकेने तसे न केल्याने, तेथे काय घडत आहे हे सर्वानाच चांगले ठाऊक झाले आहे. भारताने किंमत मोजली याचे स्वरूप असे आहे की जे कोणी परकीय (इंग्रजी) भाषेत अनेक वर्षे शिक्षण घेतात व तिच्यात प्राविण्य मिळवितात, आणि अगदी उत्तम प्रकारे ती भाषा बोलतात, हे लोक

राजकारणात आणि व्यापार उदिमातही एका विशिष्ट मध्यम पातळीपलीकडे कधीही जात नाहीत, परंतु यादवी युद्धातून उद्‌भविणाऱ्या परिस्थितीशी तुलना करता, ही किंमत तशी माफकच आहे. कल्पना करा की युरोपच्या लोकसभेत फक्त हिंदी भाषेच्या वापरास परवानगी देण्यात आलेली आहे. लंडन टाईम्स, ल मॉंद, आणि फ्रँकफुर्ट आलगमिन झाईतुंग, ही वृत्तपत्रे फक्त हिंदी भाषेत निघत असल्याकारणाने, ज्यांचे हिंदीत शिक्षण झालेले आहे त्यानाच ती वाचता येतील. भारतात हेच झालेले आहे. टाईम्स ऑफ इंडिया, हिंदुस्थान टाईम्स, हिंदू स्टेटसमन कोण वाचतो?

परंतु आता हे सारेच बदलते आहे. हे बदलही झपाट्याने व सखोल परिणाम करतील अशा प्रकारे घडत आहेत. बहुभाषिक समाजातील भाषांचे एकमेकांशी असलेले संबंधही झपाट्याने बदलत आहेत. गतकाळात सर्वच भाषाना आपणास, 'राष्ट्रीय भाषे'ची प्रतिष्ठा प्राप्त व्हावी अशी महत्त्वाकांक्षा होती. एकदा राष्ट्रीय भाषा झाल्यानंतर ती भाषा राष्ट्रीय संस्कृती आणि शिक्षण याना पायाभूत ठरणार होती. अशा प्रकारे ज्ञानाच्या पातळीवर, सर्व उद्दिष्टे साध्य करणारी भाषा होऊन, इतर महत्त्वाच्या मोठ्या सांस्कृतिक भाषांचा दर्जा ती प्राप्त करून घेणार होती. हे सारे करीत असताना, विशेषत: ती भाषा ज्या काळात प्रभुत्व गाजविणारी अशी जी कोणती दुसरी भाषा असेल, तिच्याशी मुकाबला करून आपले श्रेष्ठत्व ती भाषा सिद्ध करण्याची मनिषा बाळगून असे. उदा. फिनलंडमध्ये सर्वच कामासाठी फिनिश भाषा ही स्विडिश भाषेची जागा घेणार होती. बेल्जियममध्ये फ्लेमिश ही फ्रेंच भाषेची जागा घेणार होती. म्हणूनच एखाद्या बोलीभाषेच्या विद्यापिठाची स्थापना ही त्या भाषेचा 'मुक्ती'ची मोठी खूण समजली जात असे. फिनलंड, वेल्स आणि फ्लेमिश या भाषिक चळवळींच्या इतिहासात या अशा प्रकारच्या विद्यापिठांची स्थापना हा त्यांच्या राष्ट्रीय इतिहासातील महत्त्वाचा दिवस आहे. गेल्या शतकात अनेक छोट्या भाषानी हे करण्याचा प्रयत्न केला आहे. सतराव्या शतकात युरोपमध्ये, डचानी या प्रक्रियेस सुरुवात केली— ती आजवर कॅटलान विद्यापिठाच्या स्थापनेपर्यंत चालूच आहे; बास्कसारख्या छोट्या भाषा अजूनही या कामी प्रयत्नशील आहेत.

प्रत्यक्ष व्यवहारात युरोपमध्ये तरी आता विद्यापिठे स्थापन झालीच पाहिजेत या मागणी मागचा जोर हळूहळू नाहीसाच होत चालला आहे. अर्थात हा कल रोखण्यासाठी छोटी राष्ट्रे आपल्याला शक्य असेल ते सारे करीत असतात. ते काहीही असो, सध्या तरी प्रत्येक भाषेला आपले असे स्थान प्राप्त झालेले आहे. आता अगदी वेगळी परिस्थिती असल्या-कारणाने त्या स्थानाचा उपयोग वेगळ्याच उद्दिष्टांसाठी होतो. म्हणूनच जुन्या काळी जे करावे लागत होते तेच आता करण्याची आवश्यकता राहिलेली नाही. याचे अंशत: कारण हे आहे की आंतरराष्ट्रीय उद्दिष्टे साध्य करण्यासाठी फारच थोड्या भाषांचा प्रत्यक्ष वापर होतो. युरोपियन युनियन (युरोपचे संघराज्य) आपल्या उत्पन्नाचा एक तृतीयांश भाग भाषांतरावर खर्च करते. या युनियनमध्ये एकंदर अकरा भाषाना सरकारी दर्जा दिलेला आहे. यावरून

एवढा प्रचंड खर्च करावा का लागतो हे समजेल. परंतु असे असले तरी युनियनचे बहुतेक कामकाज प्रत्यक्षपणे दोन भाषातच चालते; असे गृहीत धरले तर ते चुकीचे ठरणार नाही. इस्टोनियन भाषेत रेणुविय– जीवशास्त्र या विषयावर शोध निबंध लिहिता यावा म्हणून शब्दकोश तयार करता येईलही. हा शब्दकोश प्रत्यक्षात तयारही झाला. परंतु इस्टोनियन रेणुविय जीवशास्त्रज्ञ सोडल्यास, इस्टोनियन भाषेत लिहिलेला हा शोध निबंध अन्य कोणी वाचावयास तयार होतील असे नाही. म्हणूनच आंतरराष्ट्रीय थरावर प्रचलीत असलेल्या भाषेतच त्या शास्त्रज्ञाना तो शोध निबंध लिहीणे आवश्यक आहे. अर्थशास्त्रासारख्या ज्ञानशाखेतही, फ्रेंच आणि जर्मन अर्थशास्त्रज्ञाना तोच मार्ग पत्करावा लागला आहे. एखाद्या देशात असे समजू या की उच्च शिक्षण घेण्याकरता येणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या चांगलीच मोठी आहे; आणि हे सारे विद्यार्थी एकच भाषिक असते. (उदा. भारत व त्यात समाविष्ट असलेली राज्ये), तर त्याठिकाणी त्या भाषेत चांगला समृद्ध असा वैज्ञानिक– शब्दकोश तयार करणे संयुक्तिक आहे. अशाच ठिकाणी विज्ञानाचा परिचय करून देणारी शालेय पुस्तके तयार करून घेणे संयुक्तिक आहे. परंतु अधिक उच्च शिक्षण घ्यायचे झाले तर याही विद्यार्थ्यांना एखादी आंतरराष्ट्रीय प्रमाण भाषा शिकून घ्यावीच लागेल. तसे केले तरच विज्ञानातले जे काही आधुनिक असेल ते त्याना वाचता येईल. इतकेही केल्यानंतर या विद्यार्थ्यांना बहुतकरून इंग्रजीचेही चांगले ज्ञान करून घ्यावे लागेल. याचे कारण बौद्धिक जगतात तरी पूर्वी मध्ययुगीन युरोपमध्ये लॅटिन भाषेची जी जागा होती, ती आता जगात इंग्रजीने घेतलेली आहे. सर्व विश्वविद्यालयातून काही विषयात तरी इंग्रजीतच शिक्षण देणे वस्तुस्थितीला धरून ठरेल. नेदरलँड आणि फिनलँड या देशातील विद्यापिठातून हे धोरण काही प्रमाणात स्विकारण्यात आलेले आहे. येथे लक्षात घ्यावयाची गोष्ट म्हणजे या दोन देशात स्थानिक भाषा ही जीवनाच्या सर्व थरात व सर्व ज्ञान शाखात उपयोगात यावी म्हणून प्रथम प्रयत्न झाले होते. थोडक्यात या धोरणाशिवाय अन्य मार्ग सध्या तरी दिसत नाही. एकोणिसाव्या शतकात हंगेरीमध्ये सरकारी पातळीवर मज्यार या भाषेला व्यापक स्वरूप देण्याचे प्रयत्न झाले. अणू– विज्ञानापासून तो काव्यापर्यंतच्या सर्व गोष्टी या भाषेतून आविष्कृत करण्याचे सरकारी धोरण होते, पण वस्तुस्थिती अशी आहे की जगातील एकंदर सहाशे कोटी लोकांपैकी फक्त एक कोटी लोक मज्यार भाषा बोलतात. थोडक्यात प्रत्येक सुशिक्षित हंगेरीयन माणसाला बहुभाषिक व्हावे लागते आणि तसा तो आहेही.

आजच्या या युगात एका भाषेने दुसऱ्या भाषेची जागा घेतली पाहिजे अशी परिस्थिती नाही. सर्व भाषानी एकमेकाना पूरक असण्याचे हे दिवस आहेत. मग प्रत्येक देशातील सरकारी धोरण काहीही असो. उदा. स्वित्झर्लंडमध्ये 'स्विस– जर्मन' ही बोलीभाषा सरकारी भाषा करण्याकरिता प्रयत्न होत नाही. त्या मागणीचा पाठपुरावाही कोणी करीत नाही. याचे कारण सरकारी कामकाजासाठी 'हाय– जर्मन' ही जर्मन भाषाबोली, इंग्लिश, किंवा फ्रेंच भाषा वापरण्यास कोणत्याही प्रकारचा राजकीय आक्षेप नाही. CATALUNA कॅटालुनामध्ये



अनुक्रमणिका

कॅटलान ही सर्व गरजा पुरी करणारी (all purpose) भाषा करण्यात आली. त्याचा परिणाम असा झाला की, या विभागातील गरीब आणि अशिक्षित माणसाना एक आंतरराष्ट्रीय भाषा स्पॅनिश शिकण्याची जी संधी होती, ती गमवावी लागली. स्पेनचा हा विभाग पूर्वी द्वैभाषिक असल्याकारणाने, येथील स्थानिक नागरिकाना स्पॅनिश बोलता येत असे आणि लिहिता येत असे. पॅराग्वे (PARAQUAY) मधील प्रत्येक नागरीक 'गुआरानी' ही भाषा बोलतो. अगदी काटेकोरपणे बोलावयाचे झाल्यास या देशातील पंचेचाळीस टक्के लोक द्वैभाषिक आहेत. स्पॅनिश लोकांनी त्या देशात 'वसाहत' स्थापन केल्या दिवसापासून गुआरानी ही फक्त तेथील स्थानिक इंडियनांची भाषा होती, हे खरे. परंतु देशातील सर्व विभागातील लोकाना ती समजत होती आणि आजही समजते. असे आहे तरी गुआरानी या भाषेचा उपयोग काव्य–लेखन, नाट्य लेखन, आणि तत्सम इतर कारणासाठीच होतो. बाकीच्या सर्व क्षेत्रात स्पॅनिश वापरण्यात येते. आणखी एक उदाहरण. या देशात क्यूएचा QUECHA या भाषेला इ. स. १९७० साली सरकारी पातळीवर मान्यता देण्यात आली असतानाही, त्या भाषेत वृत्तपत्र निघावे अगर विश्वविद्यालयीन शिक्षण मिळावे अशी मागणी पुढे आलेली नाही. स्पेनमधील बारसिलोना या शहरात स्थानिक पातळीवर कॅटालन ही भाषा सर्वत्रच बोलली जाते. परंतु या ठिकाणी देखील अगदी आजपर्यंत येथील सर्व महत्त्वाची दैनिके, आणि राष्ट्रीय दैनिकांच्या कॅटालन आवृत्याही स्पॅनिश भाषेत निघतात. म्हणूनच आपणास असा निष्कर्ष काढावा लागतो की, तिसऱ्या जगातील सर्वसाधारण राष्ट्र– राज्याला एकच सर्व गरजा पुरी करणारी सर्व व्यापी भाषा (all purpose) पत्करून भागणार नाही.

देशातल्या देशात आणि एखाद्या विस्तीर्ण प्रदेशात, परस्परांशी संपर्क साधण्याचे साधन म्हणून एखाद्या 'समान– भाषे'चा (LINGUA FRANCA) चा उदय होण्यास या अशा परिस्थितीमुळे प्रोत्साहन मिळते. नागरिक पातळीवर इंग्लिश भाषेला त्याच कारणासाठी महत्त्व प्राप्त झाले आहे. या अशा ज्या 'समान भाषां'चा उदय होतो, त्या कदाचित् सांस्कृतिक व वाङ्मयीन भाषा ठरतीलही. पण ते त्यांचे मुख्य उद्दिष्ट नसते. युरोपिय मध्ययुगतील कनिष्ठ पातळीवरच्या धर्मगुरुला लॅटिन येत होते. परंतु त्या लॅटिनला व्हर्जिल या कवीच्या आणि सिसरो या राजकारणी मुत्सद्याच्या लॅटिनशी फारसे कर्तव्य नव्हते. अर्थात प्रत्येक देशाला राज्यकारभार करण्यासाठी व सर्वसामान्य जनतेशी संपर्क ठेवण्यासाठी सरकारी भाषेची जरूर आवश्यकता आहे. या अशा 'समान भाषा' एखाद वेळी सरकारी भाषा बनतीलही वा बनणार नाहीतही. परंतु या 'समान भाषा'ना सरकारी भाषेचा दर्जा जेव्हा प्राप्त होईल तेव्हा त्यानी एक धोका कटाक्षाने टाळला पाहिजे. सांस्कृतिक भाषा या स्वरूपात, तो ठेका केवळ आपल्याकडेच आहे अशी अवस्था प्राप्त करून घेण्याचे त्या भाषेने कटाक्षाने टाळले पाहिजे. या अशा समान संपर्क भाषावर कवींची पकड कशी बसणार नाही, याची आपण जितकी काळजी घेऊ तितके ते चांगले. याचे कारण दुर्बोधता आणि भाषिक राष्ट्रवाद यांना काव्य प्रोत्साहन देते. याउलट असेही घडते की, नोकरशाही आणि तंत्रवैज्ञानिक परिभाषा



अनुक्रमणिका

(JARGON) यांच्या प्रभुत्त्वाखाली जाण्याचा धोका ही या अशा भाषाना असतो, याचे कारण दोन क्षेत्रात, या समान भाषांचा जास्त करून वापर होत असतो. या अशा समान भाषेत स्पष्टपणे विचार करता यावा व जे विचार स्पष्टपणे व्यक्त करता यावेत यासाठी पथ्ये आवश्यक आहेत. आपण आज जे प्रत्यक्षात घडताना पहात आहोत. उदा. 'अमेरिकन इंग्लिश' ही भाषा ठोकळेबाज– परिभाषेच्या (JARGON) जबरदस्त प्रभावाखाली आहे. मानवाने निर्माण केलेल्या कोणत्याही भाषेत असे आजवर घडले नव्हते. एवंच येथे नमूद केलेले धोके किती वास्तव आहेत हे यावरून लक्षात यावे.

आता केवळ 'राजकीय भाषा' असे ज्यास म्हणता येईल अशा भाषाविषयी दोन शब्द. राष्ट्रीय अगर धार्मिक उद्दिष्टे आणि आकांक्षा याचे प्रतिक म्हणून या 'राजकीय भाषा' निर्माण होतात. एखाद्या देशापासून फुटून बाजूस होणे, अथवा वेगळेच आहोत हे दाखवून देणे हेच या भाषांचे उद्दिष्ट असते. इंग्लंडमध्ये कॉर्निश भाषा पुन्हा एकदा तयार करण्यात येत आहे; हे या संबंधातील आत्यंतिक टोकाचे उदाहरण, ही भाषा अठराव्या शतकाच्या मध्यावरती बोलली जात होती. कॉर्नवाल हा विभाग इंग्लंडपासून अलग आहे हे दाखविणे हा या भाषेच्या निर्मिती मागचा हेतू आहे. अशा प्रकारे निर्माण केलेली 'राजकीय भाषा' यशस्वी होईलही. इस्त्रायलची हिब्रु भाषा हे त्या संबंधातील उदाहरण. या अशा भाषा प्रत्यक्ष वापरात– बोलण्यासाठी, लिहिण्यासाठी, राज्यकारभारासाठी असलेल्या भाषा म्हणून यशस्वी होतील अथवा त्या अयशस्वी ठरतील. दोन महायुद्धाच्या दरम्यान स्कॉटलंडमध्ये प्रचलीत असलेली बोलीभाषा, त्या विभागातील राष्ट्रीय कवीनी, ती वाङ्मयीन भाषा (LALLANS) लाल्लानस हे तिचे नाव करण्याचा जोरदार प्रयत्न केला होता. पण तो अयशस्वी ठरला. ही दोन्हीही उदाहरणे अगदी टोकाची आहेत हे खरे. परंतु आपले तेच खरे आहे, आपला जो आग्रह आहे तोच बरोबर आहे. असा दावा करणारे घटक प्रत्येक भाषेत असतात. आजचे युग हे राष्ट्रीय अगर प्रादेशिक फुटीरवादाचे आहे. या अशा परिस्थितीत भाषिक फुटीरतावाद हा राजकीय स्वातंत्र्यास पूरक ठरण्याची स्वाभाविक प्रकृती प्रकट करतो. आपण हे पूर्वीच्या युगोस्लावियात घडताना पहात आहोत. थोडक्यात सांगावयाचे झाल्यास ही जी नवी 'राजकीय– भाषा' तयार करण्याचा हेतू परस्परांशी संपर्क साधण्याबाबतची सुलभता, अगर सांस्कृतिक संवर्धन हा नसतो, हे लक्षात ठेवले पाहिजे. याशिवाय राष्ट्रीय अगर प्रादेशिक विचारांचे जे लढाऊ पुरस्कर्ते असतात. त्याना त्यांचे असे हक्काचे स्थान या भाषिक चळवळीमुळे प्राप्त होते. या लढाऊ व्यक्तींशिवाय इतर कोणालाही या चळवळीत 'स्थान' नसते, हा जो 'फायदा' या भाषिक फुटीरतावादाचा असतो, तो वेगळाच. इंग्लंडसारख्या लोकशाही बद्धमूल झालेल्या देशात आपण हे वेल्समध्ये घडताना पहात आहोत. पुन्हा एकदा ठोसपणे एक मुद्दा नमूद करणे आवश्यक आहे. या अशा प्रकारच्या भाषिक हालचाली व चळवळी हे संस्कृतीचे संवर्धन करणे वा तिला प्रोत्साहीत करणे, हे काम करीत नसून, केवळ राजकारण हाच त्या चळवळी मागचा हेतू असतो. 'भाषेची शुद्धता' म्हणजे काय या



अनुक्रमणिका

विषयाचा अभ्यास करणारे जे भाषा तज्य आहेत त्यानी ही वस्तुस्थिती आहे हे केव्हाच प्रस्थापित केले आहे. उदा. झेक भाषाशुद्धी चळवळ जेव्हा ऐनभरात होती, तेव्हा त्या भाषेतील जर्मन शब्द वा तस्मम इतर घटक यांचे उच्चाटन करण्यामागे, त्या चळवळीचा प्रामुख्याने रोख होता. परंतु एकीकडे हे करीत असताना झेक भाषेत जे असंख्य फ्रेंच शब्द घुसत होते अथवा लॅटिन भाषेतून उसनवारी होत होती त्याचा अजिबात प्रतिकार झाला नाही. हे असे घडणे स्वाभाविक होते. रूथेन्स (RUTHENS) भाषिक हे आपण 'राष्ट्र' आहोत वा आपली भाषा वेगळी आहे असे सर्वसामान्यपणे सांगत नाहीत. परंतु ते खास करून युक्रेनवाद्यांच्या विरुद्ध आहेत. तसेच कॅटलान राष्ट्रवादही सर्वस्वी स्पॅनिश राष्ट्रवादाविरुद्ध आहे. तिच गोष्ट वेल्श या भाषिक राष्ट्रवाद्यांची चळवळ खास करून आणि एकमेवपणे इंग्लिशांच्या विरुद्ध आहे.

एवंच या सर्वामुळे सर्वसामान्यपणे 'बाल्कनी– करण' होण्याची चिन्हे दिसू लागला आहेत. उदा. नुकत्याच स्थापन झालेल्या युरोपियन युनियनेचे धोरण सध्या अस्तित्वात असलेल्या राष्ट्र-राज्याविरुद्ध असलेल्या प्रदेशानां झुकते माप घालण्याकडे आहे. याचा अर्थ हे धोरण फुटीरतावादाला प्रोत्साहन देणारे आहे. स्कॉट आणि कॅटलान राष्ट्रवाद्यांनी या धोरणाचे झटकन अचूक माप घेऊन आपल्या मागण्या पुढे रेटून, त्या पदरात पाडून घेण्यात यश मिळविले. मुख्य प्रश्न आहे तो हाच आहे. बालकनीकरण झाल्याने, भाषिक व सांस्कृतिक एकात्मतेचा (IDENTITY) कोणताही प्रश्न सुटणार नाही. आपण पूर्वी होतो तेथेच राहणार आहोत. ब्रस्सेल्स मध्ये असलेले युरोपियन युनियनचे मध्यवर्ती सरकार भाषांतर आणि भाष्य यासाठी आपल्या उत्पन्नाचा एक तृतीयांश भाग, खर्च का करीना? युरोपला परवडत असेल तर त्यांनी ते का करू नये? परंतु असे असले तरी युरोपियन युनियनचा राज्यकारभार, प्रामुख्याने वा कधीही पोर्तुगीज, ग्रीक आणि वेळप्रसंगी डॅनिश भाषेत चालणार नाही हे नक्की. संघर्ष होण्याचे प्रसंग वाढतील एवढेच, या भाषिक बाल्कनी करणामुळे घडेल. प्रत्यक्षात काय घडते आहे ते पहा- दक्षिणेकडच्या सर्व स्लाव एथनिकांचे ऐक्य साधण्यासाठी, सध्याच्या क्रोट राष्ट्रवाद्यांच्या वाड-वडीलांनी सर्बो-क्रोट ही भाषा तयार केली. या सर्बो-क्रोट मधून क्रोट राष्ट्रवाद्यांनी आपली स्वत:ची अशी भाषा निर्माण केली आहे. हे ते जर करतात, तर मग कोणासही ते करता येईल. अमेरिकेच्या राज्यघटनेत राज्यापासून धर्माची अगदी पक्केपणे फारकत करण्यात आलेली आहे. त्याच धर्तीवर भाषेची जोवर राज्यापासून फारकत होत नाही, तोवर भाषा हे एका सर्वसामान्यपणे कृत्रिमपणे सातत्याने चालणाऱ्या नागरी संर्घाचं मूळ राहाणारच आहे.

बेबेले मनोऱ्याचे आपण स्मरण ठेवावे. मानव जातीच्या कपाळी भाषिक संघर्ष कायम रहावा अशी ईश्वराने योजना केल्या कारणाने तो बेबलेचा मनोरा बांधून पुरा झाला नाही.

---

# समाज आणि विज्ञान

## विज्ञानाचे मूळ

– नाना जोशी

**जग हे माझ्या इच्छेपासून अगदी स्वतंत्र आहे.**

**– लुडविग विटेगनस्टाईन**

अनुभवजन्य विज्ञानाला मानवी जीवनात खरोखरीची सार्वत्रिकता प्राप्त झालेली आहे असे प्रतिपादन या पूर्वीच्या लेखातून करण्यात आलेले आहे. आता हा विचार आणखी पूढे नेण्याचा प्रयत्न करण्यात येणार आहे. 'विज्ञान' ही गोष्ट केवळ मानव या प्राणी-जाती पुरतीच सिमित नाही. बहुतेक पक्षी आणि सस्तन प्राणी यांच्या जीवनातही एक मध्यवर्ती सूत्र या स्वरूपात विज्ञानाला स्थान आहे. मानवी जीवनाच्या बाबतीत जे कांही अगदी मूलभूत स्वरूपाचे आहे, त्याची अगदी कमालीची सुसूत्र अशा मांडणीची निर्मिती म्हणजे विज्ञान अशी पाश्चिमात्य जगतात याबाबतची समजूत आहे. जगात एकंदरीत नियमितपणे घडणाऱ्या ज्या गोष्टी आहेत, त्याबद्दल ज्ञान करून घेणे (मानवी जीवनात अगदी मुलभूत अशा ज्या गोष्टी आहेत, त्यांचा त्यात समावेश आहे) आणि भविष्यात काय घडेल याचे काहीसे अचूक भाकीत करावयाचे, आणि मग त्यानंतर योग्य क्षणी त्या भाकीताला अनुरूप होईल अशा प्रकारे कृती करावयाची या गोष्टी या जगात तगून रहाण्यासाठी अगदी मूलभूत आहेत. एखादी घटना घडेपर्यंत आणि ती घडल्यानंतरच त्याला प्रतिसाद देण्यासाठी जो सजीव प्राणी थांबून रहातो, तो प्राणी फार काळ तगून न रहाण्याची प्रवृत्ती प्रकट करतो. याचे कारण असे आहे की या प्राण्यांची परिस्थितीकी (ECOLOGICAL) वस्त्रे त्यांच्या शरीरावरून उतरलेली असताना, त्यांना एखाद्या जीवघेण्या प्रसंगाला कधी फारच लवकर तर कधी कालांतराने सामोरे जावे लागते. भविष्यात काय घडेल याची अटकळ बांधता येत नसल्याकारणाने असे होणे स्वाभाविक आहे.

या जगासंबधी ज्ञान करून घेण्याबाबत एखाद्या प्राण्याचा जो मगदूर असतो त्याला आधार दोन प्रक्रियांचा. जगात घडणाऱ्या घटनांचे वा गोष्टींचे वर्गीकरण करणे आणि त्यानंतर 'कारण-परिणाम' (CAUSAL) या स्वरूपाची अनुमाने बसविणे या त्या दोन प्रक्रिया होत. यातली पहिली जी वर्गीकरणाची प्रक्रिया आहे त्यापासून पुढील ज्ञानाची प्राप्ती होते. या जगात नियमितपणे आढळणाऱ्या ज्या गोष्टी आहेत वा घटना आहेत, त्यांची नोंद घेणे,

आणि अशी नोंद घेतल्यानंतर, एका मालिकेत सुसूत्रपणे व तर्कशुद्ध पद्धतीने त्या संघटीत करणे ही दुसरी जी प्रक्रिया आहे, तीलाही एक महत्त्वाचे असे कार्य पार पाडावयाचे असते. या प्रक्रियेच्या मदतीने आपणास आपल्या स्मृतीत माहितीचा साठा करता येतो. तसेच ज्या घटना घडतात, आणि ज्यांचे आपण प्रत्यक्षात निरिक्षण करून त्यासंबधी काही परिकल्पना बसवितो किंवा प्रत्यक्षात घडलेल्या ज्या घटनांच्या तपशीलाचा आपणास विसर पडलेला असतो, अशा घटनांची या परिकल्पनांच्या मदतीने, पुन्हा एकदा बांधणी करता येते. त्याजबरोबर भविष्य काळात जी घटीते होण्याचा संभव आहे त्यांची वाटचाल कशी असेल, याची अटकळ व रचना, या परिकल्पनांच्या मदतीने करता येते. पहिल्या प्रक्रियेच्या अनुषंगाने बसविलेल्या सर्वसामान्य अशा सूत्राचा आधार जर आपणाकडे नसेल, तर अशी रचना करणे आपणास फारच कठीण गेले असते. एखाद्या घटनांच्या मालिकेत 'कारण-परिणाम' ही शृंखला कशा प्रकारची असेल, याबद्दल जर परिकल्पना बसविलेली असली, तर त्या मागून येणाऱ्या 'कारण-परिणामां'ची जी साखळी येते तिची तर्कशुद्ध बांधणी आपणास करता येते. त्या योगे आपणास एक अवस्था पार करून, दुसऱ्या एका अवस्थेत जाणे, अशी झेप घेणारी जी अनुमाने असतात, त्यांची अटकळ बांधण्याच्या कामात मदत होते. थोडक्यात आपणापुढे एक प्रश्न खडा होतो? तो म्हणजे मानवाव्यतिरिक्त इतर जे सजीव प्राणी आहेत. ते या प्रकारचा मुलभूत स्वरूपाचा वैज्ञानिक मगदूर (कुवत) दाखवितात का?

**निसर्गाचे स्वत:चेच असे वैज्ञानिक**

मनुष्य प्राण्या व्यतिरीक्त इतर प्राण्यांनाही मानसिक अवस्था असतात, यावर विश्वास ठेवण्यास वैज्ञानिक तयार नसत. ही परिस्थिती इ. स. १९२० सालापासून जवळ जवळ इ. स. १९८० सालपर्यंत कायम होती. मनुष्य-प्राणी एखादी गोष्ट करताना ज्या प्रमाणे 'विचार' करतो, तसा इतर प्राण्यांना करता येत नाही अशी वैज्ञानिकांची ठाम समजूत होती. हे प्राणी वागणूकी संबधात साधेच नियम आत्मसात करतात, असा युक्तिवाद केला जात असे. उदा. अमूक अमूक परिस्थिती असली; तर त्यापासून दु:खदायक/आनंददायक प्रेरणा मिळेल एवढेच त्यांना समजत असे. परंतु अशा प्रकारच्या दोन वेगळ्या गोष्टी, विशिष्ट परिस्थिती, व एक विशिष्ट संवेदना या एकत्र *का* आलेल्या आहेत, हे प्राण्यांना बहुधा समजत नसावे. त्यांना फक्त एवढेच समजत असे की, अमूक परिस्थिती आली की दु:ख/आनंद हा कोठच्या ना कोठच्या गुढ कारणाने निर्माण होतो. थोडक्यात आपल्या अवती-भोवतीच्या पर्यावरणात दिसून येणाऱ्या खाणाखूणाना कोणत्या प्रकारचा प्रतिसाद द्यावयाचा,अशा प्रकारचे वागणूकी बाबतचे नियम ते आत्मसात करतात असे मानले जात असे. तथापी गेल्या दहा पंधरा वर्षात उपलब्ध झालेल्या पुराव्यावरून असे सुचित होते की, या प्राण्यांनाही सर्वसामान्य स्वरूपाची सूत्रे, आणि कारण-परिणाम ही साखळी अंर्तभूत असणाऱ्या साध्यासुध्या परिकल्पना बसविता येतात.



अनुक्रमणिका

कबूतरांना अमूर्त संकल्पना तयार करण्याची .कुवत असते का? हे ठरविण्यासाठी शास्त्रज्ञ रिचर्ड हेरन स्टाईन यांनी कबुतरांवर विस्तृत स्वरूपाची प्रयोग मालिका केली. या प्रयोगाचे संकल्पचित्र (DESIGN) तसे साधे व सोपे आहे. कबुतरांसमोर दोन छोटे पडदे ठेवण्यात येतात. त्यावर चित्रे प्रक्षेपित केली जातात. त्या दोन पडद्यांपैकी एकावर चोच मारली, तर कबुतराला अन्न पुरवठा होतो. दुसऱ्यावर चोच मारली, तर काहीच प्राप्त होत नाही. प्रत्येक वेळा ज्या पडद्यावर चोच मारल्याने अन्नपुरवठा होतो त्याच पडद्यावर एक विशिष्ट संकल्पना असलेले चित्र, प्रक्षेपित करण्यात येते. दुसऱ्या पडद्यावर एक सर्वस्वी वेगळी गोष्ट दाखविणारे चित्र प्रक्षेपित करण्यात येते. अन्नपुरवठा ज्या पडद्यापासून होतो आणि नो दुसरा पडदा हे कोठचीही योजना मनात न ठेवता एक सारखे बदलण्यात येतात. कधी संकल्पना असलेला पडदा पहिल्यांदा, कधी दुसरा पहिल्यांदा, या बदलामागे कोठचेही सूत्र नसते. कबुतरांनी चुकीचा प्रतिसाद कोणता हे नकळत वा आपोआप शिकू नये, हे तसे करण्यामागचा हेतू असतो. उजव्या बाजूच्या पडद्यावर चित्र असो वा नसो त्यावर चोच मारण्यास शिकावयाचे. त्यांना दोन पडद्यापैकी फक्त एकाचीच निवड करावयाची आहे. म्हणूनच पडदे कसेही बदलले तरी योग्य पडद्याची निवड पन्नास टक्के वेळा ते कबुतर करील अशी आपली अपेक्षा असणार. या पेक्षा ही निवड पन्नास टक्क्यापेक्षा चांगलीच अधिक वेळा जर कबुतराने करावयाची असेल, तर मग कबुतराला पडद्यावर प्रक्षेपित केली जाणारी संकल्पना शिकून घ्यावी लागेल. थोडक्यात कोणत्या पडद्याची निवड करावयाची या संबंधी योग्य सूत्र बसविण्यास त्याला शिकावे लागेल.

वृक्ष (वृक्षमयता) ही संकल्पना, त्या प्रक्षेपित केलेल्या संकल्पनातील एक उदाहरण. याच प्रकारच्या दुसऱ्याही संकल्पना प्रक्षेपित केल्या जातात. कबुतराला ज्या वेळी या प्रयोगाचे प्रशिक्षण देण्यात येते, त्यावेळी 'वृक्ष' ही संकल्पना व्यक्त करणाऱ्या चित्रात वेगवेगळ्या प्रकारच्या झाडांचा अंतर्भाव केला जातो. उदा. आकाशातून घेतलेल्या जंगलांची छायाचित्रे त्यात असतील; अगदी जवळून घेतलेल्या जंगलांची छायाचित्रे असतील; उन्हाळ्यातील झाडांची छायाचित्रे असतील इत्यादी. या झाडे असलेल्या चित्रांच्याबरोबरच, ज्यात 'झाडे नाहीत' अशाही काही गोष्टी असलेली छायाचित्रे दाखविण्यात येतात. उदा. लाकडी कुंपण, लाकडाची घरे, वीजेचे खांब, आणि ध्वज उभारणीचे दांडे. वृक्ष दाखविणाऱ्या पडद्यावर सामान्यपणे नेहमीच टोच मारण्याचा प्रतिसाद देण्यास कबुतर शिकले आणि त्याच्यावर त्याबाबत भरवसा ठेवता येईल अशी खात्री झाली, की त्या कबुतराची आणखी एक परिक्षा घेतली जाते. त्या कबुतराने पूर्वी कधीही पाहिलेली नाहीत अशी चित्रे दाखविली जातात. परंतु या चित्रातून त्याने पूर्वी पाहिलेली संकल्पना वेगवेगळ्या प्रकारे दाखविलेली असते या अशा प्रकारच्या परिक्षा पास होण्यात, या कबुतरांनी दाखविलेली अचुकता (योग्य पडद्यावर टोच मारणे) फारच लक्षवेधी अशी आहे. कबुतरे हे कसे करू शकतात? याबद्दल वाद जरुर आहे.

पण सर्वसमान्य स्वरूपाची सूत्रे या कबुतरांना बसविता येतात आणि हरघडीच्या व्यवहारात ही सूत्रे एक अमूर्त संकल्पना या स्वरूपात काम करतील. हा मुद्दा अगदी स्पष्ट आहे. हे विधान करताना एका गोष्टीचा नक्कीच विसर पडलेला नाही. एखाद्या शब्द कोशात दाखल करून घेण्यासाठी 'वृक्ष' या संकल्पनेची नेमकी व्याख्या करण्यासाठी कोणी बसतो व व्याख्या तयार करतो. ही व्याख्या नजरेसमोर ठेऊन, त्या संकल्पनेतील महत्त्वाची व मुलभूत लक्षणे ध्यानात घेऊन नवी 'झाडे' ओळखून त्याची यादी तयार होते. त्या सारखे या शिक्षित कबुतराचे वागणे नाही हे उघड आहे. परंतु आपल्याला अधिक परिचित दैनंदिन जीवनात वागताना, आपण जे काही करतो, त्याचप्रमाणे ती शिक्षित कबुतरे बहुधा करीत असावीत. उदा. 'आंबा' हे एक प्रकारचे झाड आहे असे जेव्हा कोणी ठासून म्हणतात, तेव्हा त्यांना काय म्हणायचे आहे हे आपणास ताबडतोब समजते.

हे सर्व प्रयोग कबुतर या प्राण्यावर करण्यात आले होते, हा त्या प्रयोगाबाबतचा लक्षणीय मुद्दा आहे. पक्षांच्या जगतात, कबुतरे हा प्राणी सर्वसामान्यपणे वरच्या श्रेणीची बुद्धीमत्ता असलेला पक्षी मानण्यात येत नाही. कबुतरांसारखा पक्षी जर इतक्या वरच्या पातळीवरच्या कृती करतो, तर अधिक प्रगत असे *प्रकृष्ट* (PRIMATES उदा. वानर. प्रायमेटस नावाने ओळखल्या जाणाऱ्या सस्तन प्राणांची प्रमुख लक्षणे येणे प्रमाणे. (१) केस (२) समोर रोखलेली दृष्टी (३) सपाट नखे (४) विरुद्ध दिशेचे आंगठे) यासारख्या प्राणी जातीने कितीतरी वरच्या दर्जाची कामगिरी केली तर त्याबद्दल आश्चर्य वाटता नये. बुद्धीच्या दृष्टीनेही जी गुंतागुंतीची कामे आहेत ती प्रकृष्ट हे अधिक चांगल्या प्रकारे करतील अशी अपेक्षा असते. एखादा अमूर्त नियम शिकण्याबाबत एखाद्या प्राण्याची कुवत किती आहे हे अजमाविण्यासाठी मानसशास्त्रज्ञानी काही प्रमाणीत कसोट्या तयार केलेल्या आहेत. त्यापैकी एक कसोटी अशी आहे की, एखाद्या प्राण्याने जो नियम शिकून घेतला आहे, त्याच्या मदतीने त्याला सर्वसामान्य असे सूत्र बसविता येते की नाही हे पहाणे. (उदा. पारितोषक म्हणून अन्न मिळावयाचे असेल तर 'अ' प्रकारच्या चित्राखालच्या खटका दाबवयाचा, 'ब' प्रकारच्या चित्राखालचा दाबावयाचा नाही) पण याच सारखी सर्वसामान्यपणे दुसऱ्या प्रकारची उदाहरणे असतात; त्याच्यावद्दल तो असे सर्वसामान्य सूत्र तयार करतो की नाही, हा त्या कसोटीतला महत्त्वाचा भाग आहे. मानसशास्त्रज्ञ, *तेतसुरो मातसुझावा* आणि त्यांच्या सहकाऱ्यांनी कबुतरांबाबतचे संशोधन थोडे आणखी पुढे नेले आहे. त्यांनी असे दाखवून दिले आहे की, 'मानव' ही संकल्पना (बिगर-मानव या संकल्पनेशी तुलना करता) कबुतरे अगदी सहज शिकतात. इतकेच नव्हे, या नंतर आपल्या प्रतिसादातून, त्यांनी तयार केलेल्या सर्वसामान्य सूत्राचे रूपांतर या संकल्पनेच्या साध्यासुध्या परिवर्तनातही करतात. उदा. फार दूरवरच्या अंतरावरचा 'मानव' या प्राण्याचा चेहरा, (बिगर मानव या प्राण्याच्या चेहऱ्याशी तुलना करता) ते ओळखतात. तथापी हा शिकून घेतलेला प्रतिसाद हा इतर प्रकारच्या

परिवर्तनांना लागू करण्यात त्यांना अपयश येते. (उदा. दूर अगदी जवळून दिसणारा मानवाचा चेहरा ते ओळखतात पण 'मानवा'चा दूरवरचा चेहरा त्यांना ओळखता येत नाही) तसेच अशाच प्रकारच्या दुसऱ्या प्रकारची तुलनाही करता येत नाहीत. (उदा. माकडे/बिगर माकडे, कबुतरे/बिगर कबुतरे) माकडांना यातले पहिल्या प्रकारच्या सूत्राचे परिवर्तन करावयास तितकेसे जमत नाही; परंतु त्यांनी एकदा शिकून घेतलेला प्रतिसादाचे परिवर्तन दुसऱ्या प्रकारात करणे त्यांना सुलभ जाते. माकडाची दृष्टी ही तितकीशी तीक्ष्ण नाही हे त्या मागचे कारण असेल. कबुतरे आणि माकडे यांच्या शिकून घेण्यात व प्रतिसादात हा जो फरक आहे, त्याचे आणखी एक कारण संभवते. काही विशिष्ट लक्षणे लक्षात घेऊन, आपणाकडे येणाऱ्या ज्या प्रेरणा आहेत, त्यात कबुतराना फरक करता येतो. या उलट माकडे त्या त्या प्रेरणांची काय सर्वसामान्य लक्षणे आहेत हे ओळखावयास शिकत असावेत. हे असे का घडते वा आहे, याबद्दल सध्यातरी अजिबात स्पष्टता नाही. या दोन्ही जातीच्या प्राण्यांचे जीवन ढंग वेगळे आहेत. बाहेरच्या जगाविषयी माहिती जमा करण्याबाबत या दोन प्राण्यांची जी कुशलता आहे, त्यावर हे दोन प्रकारचे जीवनढंग, वेगवेगळ्या प्रकारच्या मागण्या करीत असतील.

दुसरे उदाहरण प्राईमेटस-माकड या प्राणी जातीतील आहे. गेली काही दशके, खास करून चिंपाझीना कृत्रिम भाषा शिकविण्यासाठी कितीतरी प्रचंड प्रमाणात प्रयत्न करण्यात येत आहेत, अगदी अलीकडच्या काळात एखाद्या प्राण्याच्या मानसिक जगाचा शोध लावण्यासाठी एक अवजार या स्वरूपात भाषेचा उपयोग होतो या गृहीत कल्पनेवर, हे संशोधन प्रामुख्याने केंद्रीत झालेले आहे. चिंपाझीवर या बाबतचे जे प्रयोग सध्या चालू आहेत. त्यातील फार मोठा भाग, एका विशिष्ट प्रकारच्या संशोधनाने व्यापला आहे. जीवशास्त्राज्ञ *मातसुझावा* (MATSUZAWA) यांनी चिंपाझी रंग ओळखतात का? या बाबतच्या संशोधनावर भर दिला. या संशोधनातून असे सुचित झाले होते की मानव हा प्राणी या अवती-भोवतीच्या जगाकडे ज्या प्रकारे पहातो, जवळ जवळ त्याच प्रकारे चिंपाझीही या जगाकडे खरोखरीच पहातात. निदान आपण ज्या प्रमाणे, ज्या प्रकारचे शब्द, निरनिराळे रंग ओळखण्याकरता वापरतो तशाच प्रकारचे शब्द, तशाच प्रकारे वापरण्यास चिंपाझीन शिकवता येते, असे त्या संशोधनाने सुचित केले आहे. एका विशिष्ट खूणेच्या (शब्दाच्या) मदतीने, एखादा विशिष्ट रंग ओळखण्याचे शिक्षण मातसुझावा यांनी चिंपाझीना प्रथम दिले. त्यासाठी इंद्रधनुष्यातल्या रंगमालीकेला साजेश्या वेगवेगळ्या तरंग यामांच्या (WAVE LENGTHS) तालिका वापरण्यात आल्या. चिंपाझीनी एकदा हे काय ते शिकून घेतल्यानंतर, त्यांना दुसऱ्या एका कसोटीसाठी शिक्षण देण्यात आले. यासाठी सर्व रंग असलेल्या तालिकांचा वापर करण्यात आला होता. *मातसुझावा* यांनी हा प्रयोग सिद्ध करण्यासाठी पुढीलप्रमाणे कृती केली. प्रथम त्यांनी चिंपाझीना 'भाषा' शिकवून तयार केले.

चिंपाझीना रंग-वर्णमालेतील (COLOURED SPECTRUM) प्रत्येक रंगा करता शब्द शिकविण्यात आला होता.चिंपाझीचे 'शब्द'ही अशाच एका बिंदूपाशी केंद्रित झालेले असतात, एकदा चिंपाझीनी हे 'शब्द' शिकून घेतल्यानंतर, सर्व रंग आणि त्यांच्या सर्व रंग छटा असलेल्या तालिकांचा वापर करून *मातसुझावा* यांनी त्या चिंपाझीची परिक्षा घेतली. या अशा प्रकारे भाषा शिकलेल्या चिंपाझीनी, या रंग-वर्णमालेतील रंगा करीता वापरलेल्या शब्दांचा एक आलेख तयार केला. रंगांचा निर्देश .करण्यासाठी जे शब्द वापरण्यात आले होते, त्यात एक लक्षणियता होती. मानवाने या रंग-रंगछटासाठी जे शब्द वापरले असते, व त्यांचा जर आलेख तयार करण्यात आला असता, तर तो आलेख आणि चिंपाझीनी वापरलेल्या 'शब्दांचा' आलेख फारच मिळता-जुळता होता. मानवशास्त्रज्ञ बर्लीन आणि के (KAYE) यांनी काही वर्षापूर्वी प्रयोग केले होते. त्या प्रयोगात त्यांनी मानव रंग व रंग छटासाठी वापरत असलेल्या शब्दांचा आलेख तयार केला होता. चिंपाझींचा आलेख, त्या आलेखाशी अगदी तंतोतंत जुळणारा होता.

माणसे, दोन रंग छटातील एकाचा निर्देश करण्यासाठी त्या रंगछटादर्शक बाबत शब्दाची निवड काही एका विशिष्ट योजनेनुसार करतात असे नाही. तथापी चिंपाझी ज्या शब्दाचा त्या रंगछटेशी अजिबात संबंध नाही अशा शब्दाची निवड करीत नाहीत. रंगाबद्दल शब्द वापरताना, सर्वच मानवी संस्कृतीत आढळून येणारी ही अत्यंत लक्षवेधी अशी गोष्ट आहे. *बर्लीन आणि के* यांनी केलेल्या मूळ संशोधनात, त्यांनी एक गोष्ट दाखवून दिली होती. ती म्हणजे भिन्न भिन्न संस्कृतीत विशिष्ट रंगछटेचे वर्णन करण्यासाठी जे शब्द वापरले जातात, ते शब्द रंग-वर्णमालेतील एकाच विशिष्ट बिंदूपाशी एकत्र आलेले दिसतात. तथापी काही भाषात काही विशिष्ट रंगा करीता शब्दच उपलब्ध नाहीत. उदा. दक्षिण भारतातील एका भाषेत जांभळा आणि हिरवा यांच्यासाठी वेगवेगळे शब्द नाहीत. त्याचप्रमाणे पश्चिम आफ्रिकेतील अनेक भाषात निळा आणि हिरवा यात फरक केला जात नाही. किसवाहिली गावाच्या पूर्व आफ्रिकेतील एका भाषेत तांबडा पिंगट, मातट रंगासाठी एकच शब्द वापरला जातो. मानवशास्त्रज्ञांनी या संशोधनाच्या अनुषंगाने अनेक वेळा असे प्रतिपादन केले आहे की वेगवेगळ्या संस्कृती या जगाकडे भिन्नभिन्न दृष्टीकोनातून पहातात. या विधानात दुर्दैवाची गोष्ट ही आहे की, रंगाचे जे भौतिकशास्त्र आहे त्याबद्दल या अशा मानवशास्त्रज्ञांना काहीच ज्ञान नसल्याकारणाने त्याची परिणती या अशा प्रकारचे निष्कर्ष काढण्यात होते. या सर्वच उदाहरणात एकच मुद्दा महत्त्वाचा आहे. तो म्हणजे या ठिकाणी *प्रस्तुत असलेले हे रंग, हे सारे रंग-वर्णमालिकेत एकमेकाच्या शेजारी असलेले रंग आहेत.* उदा. तांबडा हा पिंगट वा मातट रंगाच्या अगदी लगत आहे. जांभळा हा हिरव्याच्या अगदी जवळ, आणि हिरवा हा निळ्या रंगाजवळ, कोणत्याही संस्कृतीतील लोकांपैकी एक जणही काळा आणि हिरवा, किंवा तांबडा आणि जांभळा यात कधीही गल्लत करीत नाही.

बाहेरच्या जगातील वस्तुस्थिती तुकड्या तुकड्यांची नसते, ती सलग असते. परंतु आपण वापरत असलेल्या भाषेमुळे, आपणही त्या सलगतेचे तुकड्या तुकड्यात विभाजन करून, त्या वस्तुस्थितीतील गोष्टींचे वर्गीकरण करतो. काही संस्कृतीत विशिष्ट रंगासाठी शब्द नसतात, ही वस्तुस्थिती या विशिष्ट परिस्थितीचा परिणाम आहे. परस्परांशी संपर्क साधण्यास उपयुक्त असणाऱ्या 'भाषा' या साधनाचे कितीही गुणगान झाले असले तरी स्वाभाविक व नैसर्गिक जगताशी संपर्क साधण्याच्या दृष्टीने भाषा हे आश्चर्य करावे इतके कमकुवत साधत आहे. ही वस्तुस्थिती आहे. जगात घडणारी घटीते सलग आहेत, अशा स्वरूपात त्या विषयी चर्चा करणे केवळ अशक्य आहे, असे आपणास आढळून आले आहे. असे असल्याकारणाने आपण त्या सलगतेचे वेगवेगळ्या व अलग अशा भिन्न वर्गात विभाजन करतो. एखाद्या सलगतेवर ही अशी वर्गीकरणे जेव्हा लादली जातात तेव्हा एक गोष्ट घडते. ती म्हणजे या वर्गीकरणातील वर्गांना अलग करणाऱ्या सीमारेषा जवळ कसलेही नियम लागू पडत नाहीत. हे असे घडणे अटळ आहे. याचा अर्थ असा आहे की, आपण ज्यास 'हिरवा' या नावाने संबोधू, त्यास दुसऱ्या एखाद्या भाषेत 'निळा' म्हणून संबोधले जाण्याची शक्यता आहे. प्रत्यक्षात वस्तुस्थिती अशी असेल की, या दोन अगदी 'शुद्ध' रंगाच्या सीमारेषेवर आपण ज्याचे वर्णन करीत आहोत तो रंग असतो. आपणा दोघातही- (दोन वेगवेगळ्या संस्कृतीतील व्यक्तितही) हिरवा हा 'हिरवाच' आहे. निळा हा 'निळाच' आहे; याबद्दल एकवाक्यता असते. पण या दोन रंगाच्या सीमारेषावर जी रंगछटांची मालिका आहे, त्याचे वर्णन करताना मतभेदास सुरुवात होते. आपण वेगवेगळ्या रंगाचे वेगळेपण ओळखण्याकरीता, जी यंत्रणा तयार केलेली आहे, तिचा केवळ हा परिणाम आहे.

जगातील गोष्टींचे वा घटीतांचे वर्गीकरण करण्याबाबतची माकडांची कुवत आणखी एका प्रयोग मालिकेच्या द्वारा आपणास ज्ञात झाली आहे. *व्हरेना डास्सर* (VARENA DASSER) या बाईनी माकाक (MACAQUE) जातीच्या माकडावर हे प्रयोग केले होते. त्यांना दाखविण्यात आलेल्या दोन गोष्टीत फरक करण्याची कामगिरी *डास्सर* यांच्या सहकाऱ्यांवर सोपविण्यात आली होती. या प्रयोगात या माकडांना दोन छायाचित्रे दाखविण्यात येत. एक त्याच्या नातेवाईकाचे तर दुसरे त्याच जातीच्या माकडाचे पण त्याच्याशी नातेसंबंध नसलेल्या माकडाचे असे. जवळच्या नातेवाईकाचे चित्र आपल्या समोर आले की माकडाने खटका दाबून आपली पसंमी व्यक्त करावयाची होती. नातेसंबंध नसलेल्या माकडाचे छायाचित्र समोर आले की त्याने खटका दाबावयाचा नव्हता. ही कामगिरी यशस्वीरित्या पार पाडण्याचे शिक्षण एकदा या माकडांना मिळाल्यानंतर, याच कामगिरी सारखी दुसरी अधिक गुंतागुंतीची कामगिरी बाबत त्यांची परिक्षा घेण्यासाठी आणखी दुसरे प्रयोग करण्यात आले. पण प्रयोगात जे माकड प्रयोगादाखल होते, त्याच्या गटात न येणाऱ्या, पण त्याच जातीतील दुसऱ्या एका गटातील माकडांची छायाचित्रे दाखविण्यात आली. या नंतर या प्रयोगादाखल असलेल्या

माकडाने, त्या छायाचित्रात असलेल्या आपले नातेवाईक ओळखावयाचे होते. नातेसंबंध असलेल्या व नसलेल्या माकडांमध्ये यात फरक करून, त्यांना ओळखण्याची बिकट कामगिरी पार पाडावयाची होती प्रयोगादाखल असलेल्या माकडाने ही कामगिरी यशस्वीरित्या पार पाडली. याचा अर्थ एकच होता. तो म्हणजे 'माझा भाऊ लक्ष्मण आणि मी याच्यात जे नातेसंबंध आहेत, तसेच जनु आणि सखाराम यांच्यात आहेत.' अशा प्रकारचे निर्णय प्रयोगादाखल असलेल्या त्या माकडाला घेता येत होते. या प्रयोगात 'नातेसंबंध ओळखणे' हा मुद्दा अनुस्युत आहे. ही माकडे (GENETIC) जनन-विज्ञान शास्त्राच्या परिभाषेनुसार त्याबद्दल विचार करीत नाहीत, हे तर अगदी स्पष्ट आहे. एकतर जनन-विज्ञान शास्त्रातील सिद्धांताची माहिती त्यांना असणे शक्य नाही. याच कारणामुळे त्यांना चुलतभाऊ व पुतण्या यांच्यात फरक करणे शक्य होणार नाही, हे उघड आहे. त्या ऐवजी ते दुसऱ्याच एका प्रकारचे मापदंड ते वापरीत असावेत. उदा. 'जनु हा सखारामाबरोबर वाढला आहे' अथवा 'मारामारीच्या प्रसंगी 'जनु' हा 'सखारामाचा' वारंवार सहकारी असतो.' आपल्या सामाजिक गटातील प्रत्येक व्यक्तिची विभागणी माकडे आणि वांदर (APES) असे वर्गीकरण करून, अथवा अशा प्रकारे (TYPES) ती प्रयोगादाखल माकडे करीत असवीत असे दिसते. काही वेळा हे वर्गीकरण अथवा प्रकार हे अधिक अमूर्त संकल्पनावर आधारीत असावेत. *डास्सर* यांचे सहकारी *हान्स झिग्ग* (HANS SIGG) यांनी आपल्या संशोधनाकरवी आणखी एक वेगळीच गोष्ट दाखवून दिली. एका प्रयोग मालिकेद्वारा त्यांनी असे सिद्ध केले की 'प्रभुत्व गाजवून घेणारा- प्रभुत्व गाजविणारा' या अशा प्रकारचे नातेसबंबंध माकडांना समजतात.

येथे नमूद केलेल्या या संशोधनातील निष्कर्षांना *डेव्हीड प्रेमाक* (PREMACK) यांनी केलेल्या प्रयोगाद्वारे अधिक बळकटी आलेली आहे. *डेव्हिड प्रेमाक* यांनी केलेला प्रयोग येणे प्रमाणे. विशिष्ट शब्द आणि संकल्पना यांचे दर्शक वा खूण म्हणून विशिष्ट आकाराच्या प्लास्टीकच्या तबकड्या या प्रयोगात वापरण्यात आल्या होत्या. प्रयोगादाखल चिंपाझीना ही खूणांची 'भाषा' वापरण्याबाबत शिक्षण देण्यात आले होते. ही भाषा वापरण्याच्या कामात एकदा हे चिंपाझी चांगलेच वाकबगार झाल्यानंतर त्यांना त्यांनी पूर्वी घेतले असतील तसे अगर वेगळ्या प्रकारचे निर्णय घेण्यास सांगण्यात आले. हे 'निर्णय' पुढील प्रकारचे होते. त्यांना काही वस्तु (अगर त्या वस्तूंची छायाचित्रे दाखविण्यात आली होती. या पैकी ज्या वस्तुंचा परस्परांशी एकाच प्रकारचा संबंध आहे अशा वस्तू ओळखावयाच्या होत्या, उदा. त्यांना कात्री आणि कागद यांच्या 'खुणा' म्हणून वापरण्यात आलेल्या, तबकड्या दाखविण्यात आल्या होत्या. (या दोन्ही वस्तूत एक कार्यात्मक (FUNCTIONAL) संबंध आहे) या नंतर त्यांना डबा उघडण्यासाठी वापरण्यात येणाऱ्या हत्यार या वस्तूंचे छायाचित्र दाखविण्यात आले. त्यानंतर या कार्यात्मक संबंधाशी निगडीत असलेल्या वस्तूंची एक मालिका दाखविण्यात आली. उदा. डबा, दोरा, अगर पेपर वेट : या उदाहरणात युक्तिवाद

करण्याची जी प्रक्रिया अनुस्यूत आहे, तीच प्रक्रिया चिंपाझीच्या बौद्धिक चाचण्यातही अंतर्भूत आहे. 'कात्री कागद कापण्यासाठी, मग डबा उघडण्याचे हत्यार ..... ? प्रेमाक यांच्या प्रयोगास चिंपाझीनी योग्य व अचूक प्रतिसाद दिला. त्यावरून त्यांनी असे दाखवून दिले की 'अमक्याशी संबंधीत' आहे अशा प्रकारचे अमूर्त संबंध, त्यांना आपल्याशीच युक्तिवाद करून ठरविता येतात.

जगातील गोष्टींचे विभाजन वेगवेगळ्या वर्गात करावयास शिकणे हे काम तसे फारच जुजबी आहे असे भासेल. परंतु हरघडीच्या जीवनात आणि विज्ञानात ते मुलभूत अशा महत्त्वाचे आहे. हे काम करूनच आपणास सर्वसमान्य स्वरूपाची सूत्रे रचता येतात. तथापि आपण पाहिलेच आहे की विज्ञान म्हणजे केवळ विगमन पद्धतीने (INDUCTIVE) सूत्र रचना करणे. अठराव्या आणि एकोणिसाव्या शतकातील अनेक तत्वज्ञांची तशी समजूत होती, की अशी सूत्र रचना विज्ञानाने करावयाचीच असते. पण त्याजबरोबर अनुभवजन्य सर्वसमान्य सूत्रांचे स्पष्टीकरणही घ्यावयाचे असते. या सर्व प्रक्रियेत मुलभूत महत्त्वाची एक गोष्ट आहे. 'य' हा नेहमीच 'क्ष' नंतर येतो याचे 'कारण' नेमके करणे म्हणजे एक 'कारण-परिणाम' या स्वरूपाचा संबंध प्रस्थापित करणे ही ती गोष्ट होय. विवेचनाच्या या ठिकाणी आपण एक प्रश्न उपस्थित केला पाहिजे, जगातील दोन घटनांचा अनुभव प्राणी घेतात, त्यांच्यातील संबंधाचे वर्णन करताना, 'कारण-परिणाम' अशा प्रकारच्या विचार पद्धतीचा वापर प्राणी करतात याला काही पुरावा आहे का?

*टोनी डिकीनसन* या मानसशास्त्रज्ञानी Contemporary Animal Learning Theory (प्राणी कसे शिकतात याबद्दलचा प्रचलित सिद्धांत) या नावाचा ग्रंथ लिहिला आहे. त्यांनी त्यात असे दाखवून दिले आहे की प्राणी आपल्या अनुभवाबद्दलचा माहितीचा साठा दोन प्रकारे करतात. आजवरच्या परंपरागत वर्तनवादी सिद्धांतानुसार, प्रत्यक्ष वर्तनातून ज्या काही सूचना मिळतील त्यानुसारच त्यांना माहितीचा साठा करता येतो. उदा. 'क्ष' आले तर 'य'. परंतु अगदी अलीकडे काही मानसशास्त्रज्ञानी 'विशुद्ध ज्ञानवादी' (COGNITIVE) अगर मनोवादी (MENTALISTIC) दृष्टीकोन स्वीकारण्यास वा मान्य करण्यास सुरुवात केली आहे. या जगात घडणाऱ्या घटनासंबंधी प्राणी स्वत:शीच युक्तिवाद करतात असे या दृष्टीकोनात गृहीत धरलेले आहे. या दुसऱ्या प्रकारच्या दृष्टीकोनानुसार प्राणी माहितीचा साठा पुढील प्रमाणे करतात. 'कारण-परिणाम' दर्शविणाऱ्या परिकल्पनांच्या स्वरूपात प्राण्यांना या जगासंबंधीच्या माहितीचा साठा करता येत असला पाहिजे. उदा. जर 'क्ष' घडले, तर त्या पाठोपाठ 'ज्ञ' घडेल, त्याचप्रमाणे 'य' ही घडेल. या दोन दृष्टीकोनातील फरक अत्यंत महत्वाचा (CRUCIAL) आहे. याचे कारण असे आहे की या दुसऱ्या दृष्टीकोनात प्राणी 'निष्कर्षाकडे उडी घेण्यासाठी' तर्कशास्त्राच्या नियमांचा वापर करतो. असे करण्यासाठी दोन वेगळ्या प्रकारच्या संचात असलेला सुसंवाद (CORRELATION) वापरून आणखी, एक

वेगळाच निष्कर्ष काढण्याचे काम तो करतो. आता हे कसे होते यासाठी स्पष्टीकरणाची आवश्यकता आहे.

परस्परांशी संबंध दाखविणारी दोन वेगवेगळी उदाहरणे घेऊ या. उदा. 'अ' घडले की 'ब', 'ब' घडले की 'क', समजा एखाद्या प्राण्याला या दोन वेगळ्या प्रश्नांची सोडवणूक करण्याबाबत शिक्षण देण्यात आलेले आहे. त्याला असें शिकविण्यात आले आहे की 'अ' घडले की 'ब' मग त्यानंतर 'क्ष' वर्तणूक करून प्रतिसाद घ्यावयाचा. 'ब' घडले की 'क' मग त्यानंतर 'य' वर्तणूक करून प्रतिसाद घ्यावयाचा, या माहितीचा साठा तो प्राणी 'वर्तणूकी संबंधी सुचना' या स्वरूपात करतो. असे झाले म्हणजे मग हा प्राणी एकमेकांशी संबंध नसलेले असे वर्तणुकीचे दोन नियम शिकतो.' 'अ' घडले की 'क्ष' वर्तणूक, आणि 'क घडले की 'य' वर्तणूक. या ठिकाणी या दोन वर्तणूकीना जोडणारा समान घटक नसल्याकारणाने 'अ' घडले की 'य' वर्तणूक करावयाची असा निष्कर्ष काढता येत नाही. तथापि हिच माहिती एक परिकल्पना या स्वरूपात साठविलेली असली, तर मग घटना का घडतात या संबंधीची कारणे दाखविणारी विधाने शिकली की भागते. उदा. उष्णतेजवळ गेल्यानंतर शरीरास इजा पोचतो. हे कारण एकदा माहित झाले म्हणजे मग उष्णता कशा पासून आली आहे हे लक्षात ठेवावे लागत नाही. अ घडले की पाठोपाठ 'ब' येणार म्हणून 'क्ष' वर्तणूक, जर ब घडले तर क म्हणूनच 'वर्तणूक'. या वरून असा निष्कर्ष काढता येतो की जर 'अ' तर मग 'ब' आणि मग क, म्हणून 'य' वर्तणूक.

या बाहेरच्या जगाविषयी प्राणी कशा प्रकारे विचार करतात, या संबंधी आपल्याकडे दोन परिकल्पना आहेत. एखाद्या विशिष्ट प्रश्नाची सोडवणूक करण्याबाबतच्या प्राण्यांच्या कुवतीबद्दल दोन वेगळी भाकीते त्यापासून प्राप्त होतात. या दोन भाकीतातले एक शक्य असले, तर मग दुसरे शक्य कोटीतले असणार नाही, अशा स्वरूपाची ती भाकीते आहेत. एका परिकल्पनेद्वारा असे सांगितले जाते की, प्राण्याकडे 'ज्ञानाचा साठा' 'एक परीकल्पना' या स्वरूपात असेल, तर मग तर्कशास्त्र व बुद्धी यांचा वापर करून एखाद्या प्रश्नाची या प्राण्यांना अचूकपणे सोडवणूक करता येते. या उलट दुसऱ्या परिकल्पनेद्वारा असे सुचित केले जाते की 'ज्ञानाचा साठा' हा 'वर्तणुकीबाबतचे नियम' या स्वरूपात असेल, तर प्राण्यांना प्रश्नांची सोडवणूक करता येणार नाही.

नेमका हाच प्रश्न नजरेसमोर ठेऊन, विशिष्ट शिक्षण दिलेल्या उंदरांची याबाबत परीक्षा घेण्यात आली. *हालँड* व *स्ट्रोब* या दोन शास्त्रज्ञांनी या संबंधी काही प्रयोग केले. ते येणे प्रमाणे होते. विजेचा दिवा प्रकाशमान होई, त्या पाठोपाठ घसरगुंडीवरून अन्न खाली येई. या दोन घटनातील संबंधाबाबत उंदरांना शिक्षण देण्यात आले होते. यानंतर या दोन शास्त्रज्ञांनी त्याच प्रकारचे अन्न एका पिंजऱ्यात ठेवले. त्याचवेळी या शिक्षित उंदरांना अन्नावर वांछा नसणे या प्रकारची भावना निर्माण होणारे एक इंजेक्शन देण्यात आले होते. म्हणजे अन्न



अनुक्रमणिका

खायला जावे, तर त्याबद्दल शिसारी येते. अन्न खाण्याची इच्छा नसते. हे होत असताना विजेचा दिवा प्रकाशमान होत नाही. एवंच एका नव्या परिस्थितीला त्यांना सामोरे जावे लागते. 'वर्तणूकीचा अनुक्रम' या स्वरूपात या शिक्षित उंदरांनी ज्ञानाचा साठा केला असल्यास, त्या वर्तणूकीबाबत दोन प्रकारच्या संचाचे शिक्षण या ज्ञानात अनुस्यूत असते. उदा. (एक) विजेचा दिवा प्रकाशमान झाला की घसरगुंडीकडे जा कारण अन्न लगेच समोर येणार आहे. आणि (दोन) हे अन्न पाहिलेस तर मग ते खाऊ नका. या दोन संचांना जोडणारा समान असा दुवा या ठिकाणी नाही. असे असल्याकारणाने अन्न घेऊन येणारी घसरगुंडी आणि शिसारी येणे यात काय संबंध आहे, याबाबत निष्कर्ष काढता येत नाही. हे होण्याचेही एक कारण आहे. ते म्हणजे या ठिकाणी जो दुवा उपलब्ध आहे, तो दुवा समान नाही, या ठिकाणी वर्तणुकीबाबत सुचन नाही. (उदा. तू जेव्हा घसरगुंडीशी जाशील तेव्हा अन्न आलेले असेल) की जे त्या उंदरांना शिकून घेता येईल. याचा अर्थ असा होतो की वर्तनवादींचे प्रतिपादन बरोबर असेल, तर मग या शिक्षित उंदरांची पुन्हा जेव्हा परिक्षा घेण्यात येईल, त्यावेळी त्यांना प्रकाश दिसला की ते ताबडतोब घसरगुंडीकडे धाव घेतील. याचे कारण अन्न खाल्यानंतर येणारी शिसारी आणि प्रविजेच्या दिव्याचा प्रकाश यांच्यात संबंध प्रस्थापित करण्याबाबत त्यांना अपयश आलेले असेल. या उलट निर्लेप ज्ञानवादी (COGNITIVIST) हे 'ज्ञानाचा साठा' प्राणी कसा करतात, या विषयी जे सांगत आहेत ते जर बरोबर असले, तर मग हे शिक्षित उंदीर अन्न घेऊन येणाऱ्या त्या घसरगुंडीकडे धाव घेणार नाहीत. याचे कारण, या दोन वेगवेगळ्या कारण-परिणाम दर्शविणाऱ्या परिकल्पनांच्या आधारे निष्कर्ष त्यांना काढता येतो. ही एक प्रकारची झेपच आहे ती त्यांना घेता येणे शक्य होते. 'प्रकाश दिसला की अन्न समोर येते' आणि 'अन्न खाल्यानंतर शिसारी उत्पन्न होते' या दोन वेगळ्या परिकल्पनावरून ते निष्कर्ष काढतात की 'प्रकाश दिसला ... की तुला शिसारी येईल, तेव्हा त्या अन्न घेऊन येणाऱ्या घसरगुंडीपासून दूर रहा.

*हालँड* आणि *स्ट्रोब* यांनी केलेल्या प्रयोगांचे वर्णन पुढील प्रमाणे करता येईल. प्रथम उंदरांना दोन्ही प्रयोगांचे शिक्षण देण्यात आले. (१) प्रकाश दिसला की अन्न घेऊन येणाऱ्या घसरगुंडीकडे धाव घ्यावयाची. (२) यानंतर अन्न पिंजऱ्यात ठेवण्यात आले होते. पण ते अन्न खाल्ल्याबरोबर त्यांना शिसारी येईल. (हे होण्यासाठी त्यांना लिथियम क्लोराईडचे इंजेक्शन देण्यात आले होते. या इंजेक्शनचे या परिणामा व्यतिरिक्त दुसरे कसलेही परिणाम होत नाहीत) या दोन प्रयोगांचे शिक्षण दिलेल्या उंदरांची मागाहून परीक्षा घेण्यात आली. या प्रयोगाचे निष्कर्ष चांगलेच स्पष्ट होते. त्याबद्दल दुमत झाले नसते. फक्त पहिल्या प्रयोगाचे शिक्षण ज्या उंदरांना मिळालेले होते, त्यांच्याशी तुलना करता, या दोन्ही प्रयोगांचे शिक्षण मिळालेल्या उंदरांची वर्तणूक वेगळी होती. प्रकाश दिसला की घसरगुंडीतून येणाऱ्या अन्नाकडे धाव घ्यावयाची ही जी प्रतिक्रिया होती तिचे प्रमाण चांगलेच कमी होते. या उलट फक्त



अनुक्रमणिका

पहिल्या प्रयोगाचेच शिक्षण ज्या उंदरांना मिळालेले होते, ते उंदीर प्रकाश दिसला की अन्न घेऊन येणाऱ्या घसरगुंडीकडे पूर्वी इतक्याच वेळा धाव घेताना आढळले. परंतु दोन्ही प्रयोगांचे शिक्षण मिळालेले उंदीर पूर्वीपेक्षा कितीतरी कमी वेळा धाव घेत. यावरून असे दिसते की 'कारण-परिणाम' व्यक्त करणाऱ्या एका साध्या कल्पनेच्या मदतीने निदान हे उंदीर ज्ञानाचा साठा करीत होते. आपण मानव वापरतो, त्या इतक्या त्या कारण-परिणाम व्यक्त करणाऱ्या परीकल्पना तरल (SOPHISTICATE) नव्हत्या हे नि:संशय, आपणास त्या परिकल्पना एखाद्या भाषेत व्यक्त करता येणार नाहीत हेही खरे आहे. परंतु या दोन्ही प्रयोगांचे शिक्षण घेतलेले उंदीर, हे कोठच्या ना कोठच्या प्रकारचा कारण-परिणाम या स्वरूपाचा युक्तिवाद (REASONIG) वापरीत होते, हे अगदी स्पष्ट आहे. आपण ज्याप्रमाणे एखाद्या भाषेतील वाक्यांचा अर्थ लावतो. वा त्यावर भाष्य करतो. तेच हे शिक्षित उंदीर वापरत असलेल्या युक्तिवादाबद्दल बोलता येईल. तो युक्तिवाद हा एखादी भाषा जशी दुसऱ्या भाषे संबंधीची भाषा (META LANGUAGE) असते. (उदा. प्रतिकांचे तर्कशास्त्र SYMBOLIC LOGIC) तसाच हा प्रकार आहे.

आपण या संदर्भात एक गोष्ट लक्षात घेणे महत्त्वाचे आहे. ती म्हणजे हे शिक्षित उंदीर ज्या प्रकारचा 'कारण-परिणाम' व्यक्त करणारी परीकल्पना वापरतात असे दिसत; ती परिकल्पना साध्या सुसंवादी (CORRELATION) स्वरूपातही असेल. उदा. 'क्ष' पाठोपाठ 'य' यासाठी मनात कोणत्याही प्रकारचे स्पष्टीकरण (वा सिद्धांत) असण्याची आवश्यकता नाही. उदा. क्ष च्या पाठोपाठ 'य' हा नेहमी ठेवलेलाच. असे का होते? या संबंधीचे स्पष्टीकरण मनात असण्याचे कारण नाही. अठराव्या शतकातील स्कॉट तत्वज्ञ डेव्हिड ह्यूम यांनी 'कारण' म्हणजे काय या संबंधी दिलेल्या व आता अभिजात ठरलेल्या त्या शब्दाच्या व्याख्येशी या शिक्षित उंदिरांची कृती मिळती-जुळती आहे. आपण जेव्हा 'क्ष' मुळे 'य' होते असे जेव्हा म्हणतो. तेव्हा आपण नेमके काय सांगत असतो; अथवा आपल्या म्हणण्याचा अर्थ काय असतो? अशी पृच्छा डेव्हिड ह्यूम यांनी केलेली आहे. त्यानंतर त्यांनी असे सुचविले होते की, आपण तसे म्हणून वस्तुत: असे सांगत असतो की 'क्ष' हा स्थल व काळ लक्षात घेता, 'य' शी अगदी घनिष्टपणे संलग्न आहे. सर्वच 'कारण -परिणाम' दर्शविणारी विधाने (यात विज्ञानातील विधानेही समाविष्ट आहेत) ही याच स्वरूपाची असतात, असे ह्यूम यांचे प्रतिपादन होते. त्यांनी ते अत्यंत समर्थपणे व कमालीची सुसूत्र पद्धतीने मांडले होते.

तत्वज्ञ ह्यूम यांचा जो युक्तिवाद आहे. त्यावर दोन भिन्न अशा मार्गांनी आपणास भाष्य करता येईल. (१) दोन विशिष्ट घटितामध्ये जे सुसंवादीत्व (CORRELATION) आहे, त्या विषयी ती 'अ' चे 'कारण' ब या स्वरूपाची साधी सरळ वक्तव्ये आहेत असे आपणास म्हणता येईल. उदा. बिलायर्डच्या चेंडूला लकटणारी काठी त्या चेंडूच्या दिशेने नेऊन त्याला

टेकवली म्हणजे मग तो चेंडू हालचाल करतो. (परंतु तो तशी हालचाल का करतो याबद्दल मला काहीच माहीत नसते) (२) ही चेंडू लकटणारी काठी जेव्हा चेंडूवर आदळते. तेव्हा चेंडूला उर्जेची प्राप्ती होते या कारणामुळे तो चेंडू हालचाल करतो. परंतु या काठीने चेंडूला प्रत्यक्ष स्पर्श केला नाही, ती काठी आणि चेंडू, स्थळ आणि काळ या दोन्ही बाबतीत अगदी घनिष्टपणे जवळ असते तरीही– तो चेंडू हालत नाही. थोडक्यात पहिल्या भाष्यात आपणास जे सुसंवादीत्व आहे त्याचे फक्त ज्ञान आहे. दुसऱ्या भाष्यात जे सुसंवादीत्व आहे, तसेच नेमके त्याच स्वरूपात ते का असते याचे स्पष्टीकरण आपण देत आहोत. या पूर्वी पाकक्रिया विज्ञान आणि स्पष्टीकरण विज्ञान यात जो फरक केला होता, तसाच या दोन उदाहरणातही फरक अर्थातच आहे. त्यापेक्षा जास्त कमी त्यात काहीही नाही.

प्रकाश दिसतो आणि मागाहून त्या पाठोपाठ शिसारीची भावना निर्माण होते, यात कारण-परिणामात्मक असे जे संबंध आहे त्याच्या प्रकृतीविषयी हे शिक्षित उंदीर कशी कल्पना करतात याबद्दल विवेचनाच्या या ठिकाणी आपणास काहीच सांगता येणार नाही. परंतु पाकक्रिया विज्ञानात गणना करून घेण्यासाठी प्रकाश दिसणे आणि शिसारी येणे या दोन घटीतात जे कालात्मक सुसंवादीत्व आहे. त्याची जाण शिक्षित उंदरांना असते एवढे म्हटले तरी पुरेसे आहे. अर्थात एक शक्यता वादातीत आहे. ती म्हणजे या सुसंवादी संबंधाविषयी या शिक्षित उंदीरापाशी कोठच्या ना कोठच्या प्रकारचे स्पष्टीकरण असते. सरतेशेवटी एखादा प्राणी ज्या काही कृती करतो, त्याचा तो प्राणी ज्यावर कृती करीत असतो (OBJECT) त्याच्यावर काहीतरी परिणाम होतोच. त्या परिणामाविषयी त्या प्राण्याचा जो अनुभव असेल त्याविषयी 'आणखी दुसरे एखादे संयुक्तिक असे भाष्य असणे कठीचण आहे'. वीजांचा आणि ढगांचा गडगडाट झाला की त्याच्या पाठोपाठ पाऊस पडणार याची तो गडगडाट ही निशाणी आहे हे त्या शिक्षित उंदीराना समजणारही नाही. परंतु समजा त्याने आपल्या पंजाने चेंडूला स्पर्श केल्यानंतर तो चेंडू घरंगळत दूर गेला. म्हणून ज्या अर्थी तो चेंडू दूर घरंगळत गेला याचे कारण त्याच्या पंज्याने स्पर्श केला हे आहे. आपण त्या चेंडूला स्पर्श करणे आणि तो चेंडू घरंगळत दूर जाणे. यातील सुसंवादाला त्या उंदीराला नक्कीच समजले असले पाहिजे. या घटना क्रमात अनुस्यूत असलेल्या लक्षणियतेपासून त्याला काही शिकताच आले नाही तर? अनंत अडचणी व अडथळ्यांनी पुरेपूर भरलेल्या या वास्तव जगताला उंदराला तगून रहाणे कसे शक्य होते, हे शोधून काढण्यास काहीही मार्ग उपलब्ध नाही. तथापि 'स्पष्टीकरण विज्ञानात' एका अटीची आवश्यकता असते. दोन घटीता मधिल स्थळ-कालात्मक सुसंवादीत्वाबरोबरच कोणते तरी परिकल्पनात्मक स्पष्टीकरण मिळते-जुळते असणे ही ती अट होय. ही अट पुरी झाली, म्हणजे मग, विचारांती असलेल्या गोष्टीची गणना अगदी बिनतोडपणे 'स्पष्टीकरण विज्ञान' या विभागात करण्यात येते. जे स्पष्टीकरण उपलब्ध होईल ते न्यूटनप्रणीत पदार्थ विज्ञानासारखेच (अथवा तत्सम) असावयास पाहिजे

असे नाही. समजा या शिक्षित उंदराचा असा विश्वास वा श्रद्धा असली की तो बिलीयर्डचा चेंडू हा वस्तुत: त्याच्या सारखाच एक प्राणी आहे, तो हिरव्या बेझ कापडाच्या जगातच रहातो, आणि काठी सारख्या दुसऱ्या एका दुष्ट प्राण्यापासून पळ काढतो. असे जरी यदाकदाचित वस्तुत: असते, तरी त्या घटनामालिकेची गणना स्पष्टीकरण विज्ञानातच करावी लागेल. या उंदराची या जगासंबंधीची जी जाण आहे. ती विशेष करून अगदी तरल आहे. (किंवा त्याचा विश्वास/श्रद्धा ही खरोखरच बरोबर आहे) असा दावा आपण करण्याची काहीच गरज नाही. हा अशा प्रकारचा दावा करणे, हे स्पष्टीकरण विज्ञान याचा बाजूला वा त्याच्या विरुद्ध पक्षाला बळकटी आणीत नाही. उंदिराला तो उंदिर असल्याकारणाने जी माहिती मिळविण्यापसून वंचित केले आहे, ही माहिती त्याला असती तर त्याला अधिक गुंतागुंतीचे वास्तव कल्पिता आले असते वा अधिक गुंतागुंतीचे सिद्धांत रचता आले असते. परंतु अशा प्रकारची माहिती मानव या प्राण्यास असते. तो आपणा मानवांचा खास हक्क आहे. परंतु आपण एका गोष्टीबाबत काळजी घेण्याची आवश्यकता जरुर आहे. कारण परिणामत्कता या पद्धतीने विचार करण्याची आपली क्षमता, आणि विशिष्ट प्रकारची कारण-परिणामत्मकता सामावून घेणारी परिकल्पना निर्माण करण्याची आपली ताकद, या दोहोंत आपण गल्लत कधीही करता कामा नये. असे जर आपण करण्यात अयशस्वी झालो, तर मग आपणास ठोसपणे असे सांगावे लागेल, की न्यूटन हा वैज्ञानिकच नव्हता. याचे कारण न्यूटनाचा गुरुत्वाकर्षणाबाबतचा सिद्धांत काही विशिष्ट कळीच्या ठिकाणी चुकीचा ठरला होता.

उंदरासारख्या प्राण्यांना 'कारण-परिणाम' असे स्वाभाविक संबंध शिकून घेणे शक्य आहे असे म्हणता येईल. हेच वेगळ्या शब्दात सांगावयाचे झाल्यास कारण-परिणाम संबंधातील काही विशिष्ट प्रकारच्या संबंधाबद्दल आपण मानव ज्या प्रकारचे निष्कर्ष काढतो तसेच निष्कर्ष इतर प्राण्यांनाही काढता येतात. मायकेल डोमजॅम (MICHAEL DOMJAM) आणि नॅन्सी विल्सन (NANCY WILSON) या दोन मानसशास्त्रज्ञांनी एक प्रयोग मालिका केली होती. या प्रयोगांचया द्वारा जो पुरावा उपलब्ध झाला आहे, त्यावरून असे सुचित होते की हे जग कसे काम करते याबद्दल उंदरांच्याही काही साध्या अपेक्षा (सिद्धांत) जरुर असतात. त्यांच्या या अपेक्षा (वा सिद्धांत), त्यांना या जगाचा जो अनुभव असतो. त्यावर आधारीत असतात. पाश्चिमात्य देशातील शेतकरी आपल्या मेंढ्या वा गाई भरकटून दुसऱ्या कोणाच्या शेतात जाऊ नयेत म्हणून विज खेळविलेली कुंपणे वापरतात. एखाद्या मेंढीने वा गाईने ते कुंपण ओलांडण्याचा प्रयत्न केला. तर त्या जनावराला विजेचा सौम्यसा झटका मिळतो. तशाच प्रकारचे विजेचे झटके या प्रयोगात समाविष्ट करण्यात आलेल्या उंदरांना देण्यात आले होते. सॅकरीनयुक्त द्रव पदार्थाबरोबर शिसारी ही भावना उत्पन्न होई. अथवा बझर वाजल्याबरोबर विजेचा सौम्यसा झटका मिळे. प्रयोग झाले त्यावेळी यात अदल बदलही



अनुक्रमणिका

करण्यात आला होता. (उदा. बझर वाजल्या बरोबर शिसारी ही भावना, तयार होणे) या प्रयोग मालिके अंती असे आढळून आले की सॅकरीन घातलेल्या पाण्याच्या सेवना बरोबर शिसारी ही भावना तयार होते, हे जाणणे उंदरांना फारच लक्षात येईल इतके सोपे जाते. तसेच बझर वाजला की विजेचा सौम्यसा झटका मिळणार हेही जाणणे त्यांना तितकेच सोपे जाते. परंतु बझर वाजणे आणि शिसारीची भावना निर्माण होणे अथवा सॅकरीन युक्त पेयाबरोबर विजेचा सौम्यसा झटका यांच्यातले संबंध जाणणे त्यांना अजिबात सोपे जात नाही. एखाद्या विशिष्ट प्रकारचे अन्न वा पेय यांचे सेवन केल्यानंतर आपण आजारास आमंत्रण देतो या बाबत मानव या प्राण्याला विस्तृत असा अनुभव असतो. तसाच तो उंदरानाही असतो. खास करून प्रयोग शाळेत जे उंदीर बाळगलेले असतात. त्यांना बझर वाजला की आपणास सौम्यसा विजेचा झटका मिळणार या बाबतचा अनुभव त्या उंदरांना तितकाच विस्तृत असतो. याचे कारण प्रयोग शाळातून वापरण्यात येणारी ती एक सर्वसामान्य पद्धती आहे. या उंदरांना आपल्या अनुभवाबाहेरच्या अनुभवांची जोडा-जोडी (बझर-शिसारी) शिकून घेणे अधिक कठीण जाते. या अशा अपरिचित अनुभवाशी संलग्न असलेल्या कारण-परिणाम संबंधातील दुवे ओळखणे हे अधिक कठण काम आहे असे या प्रयोगावरून दिसते. प्रख्यात *डिटेक्टिव्ह शॅरॉलॉक* होम्सप्रमाणे ते संभाव्य अशा कारण-परिणाम संबंधाकडे पहिल्या प्रथम लक्ष देतात. या संभाव्य वाटणाऱ्या संबंधातून आपणास समाधानकारक उत्तरे मिळत नाहीत हे आढळल्यानंतर, ते मग असंभाव्य वाटणारे असे जे कारण-परिणाम आहेत, त्याकडे आपला मोर्चा वळवितात. या सर्वातून असे सुचित होते की, जीवशास्त्राबद्दल या उंदरापाशी एक कोणतातरी सिद्धांत असतो.

या ठिकाणी आपण आणखी एका गोष्टीबद्दल काळजी घेणे आवश्यक आहे. ती म्हणजे या प्रयोगात, व त्यातून निघालेल्या निष्कर्षात स्पष्टीकरणांचे अनेक थर अनुस्यूत आहेत. आपण त्या थरात गल्लत करता कामा नये. उंदीरापाशी एखादा सिद्धांत आहे याचा अर्थ असा नव्हे की आपणा मानवापाशी जो जीवशास्त्र विषयक सिद्धांत आहे, अगदी तसाच त्या उंदीरापाशी आहे, या विधानाचा अर्थ तसा नसून, त्याचा अर्थ एवढाच आहे की त्या उंदीरापाशी मानवाकडे जसे व ज्या प्रकारचे सर्वसामान्य सिद्धांत असतात तसेच त्या उंदीरापाशीही असतात. उदा. सूर्य रोज उगवतो, तो तसा का उगवतो याबद्दल स्पष्टीकरण असते. परंतु दोन भिन्न संस्कृती अगदी तंतोतंत एकच स्पष्टीकरण निर्माण करीत नाहीत. तशी आपली अपेक्षाही नसते. म्हणूनच दोन वेगवेगळ्या जातीच्या प्राण्यांकडून वेगळी अपेक्षा करण्याचे काहीच कारण नाही. दोन वेगवेगळ्या जातीचे प्राणी एकाच घटितासाठी दोन भिन्न सिद्धांत वा स्पष्टीकरणे तयार करतील. दोन भिन्न जातीचे प्राणी व दोन भिन्न संस्कृती एखादे विशिष्ट घटीत समजावून सांगण्यासाठी एखाद्या स्पष्टीकरणापाशी जरुर येऊन ठेपतात. परंतु त्या प्रत्येकाचे स्पष्टीकरण, त्या प्रत्येकाला त्या घटीताविषयी जो अनुभव असतो त्यावर काही

प्रमाणात अवलंबुन असते. तसेच त्या घटीताचे महत्त्व त्यांना किती वाटते यावरही काही प्रमाणात ते अवलंबुन असते. हेच वेगळ्या शब्दात सांगावयाचे झाल्यास त्या घटीताविषयी शोध घेण्यासाठी एखादा प्राणी किती प्रयत्न करणार आहे, यावर ते स्पष्टीकरण अवलंबून असते. शिवाय त्या प्राण्यांचे निर्लेप ज्ञान मिळविण्याबाबत (COGNITIVE) कौशल्य किती आहे. याचाही वाटा त्या स्पष्टीकरणात असतो. जनन-विज्ञान शास्त्रानुसार (GENETICS) दोन प्राण्यांत जनुकीय फरक नक्की केला जातो त्यावर अथवा सांस्कृतिक भिन्नतेतून ते जे काही शिकतात त्यावर ते स्पष्टीकरण अवलंबुन नसते. परंतु प्राणी मात्राशी असलेल्या तंत्रवैज्ञानिक कौशल्यावर ते अवलंबून असते. एवंच नैसर्गिक जगताचा शोध घेण्यासाठी आपणापाशी (अथवा प्राणी मात्रापाशी) ज्या प्रकारचे तंत्रविज्ञान आहे त्यावर, आणि ज्या तऱ्हेच्या स्पष्टीकरणाची आपण (अथवा प्राणीमात्र) मनिषा बाळगून असतो, त्यावरही ते अवलंबून असते.

**स्वाभाविक वैज्ञानिक – या स्वरूपात बालके**

बालकांच्या या बाबतची कुवत किती असते, असा प्रश्न उपस्थित करून आपणास हे विवेचन थोडेसे आणखी जवळ आणता येईल. लहान बालके ही कोठच्याही अर्थाने प्रशिक्षित वैज्ञानिक नाहीत. विशेषत: शाळेत प्रवेश घेण्याचे ज्यांचे वय झालेले नाही, अशा मुलांच्या वर्तणुकीचा अभ्यास केल्यानंतर आपणास या गोष्टीबाबत ज्ञान होईल. वयात आलेली माणसे बालकांवर एखाद्या विशिष्ट सांस्कृतिक आकृतिबंधाचा संस्कार करतात. पण तसे करण्यास त्यांना अवसर मिळण्या अगोदरच्या काळातील मानवाच्या स्वाभाविक कुवतीबद्दल त्या बालकांच्या वर्तणुकीद्वारा आपणास बरेचसे सांगितले जाईल.

बालके शिकतात हे अर्थातच फारच स्पष्ट आहे. हे जाणूनच बालकांनी शिकावे यासाठी योग्य पर्यावरण त्यांच्या अवती-भोवती निर्माण केले जाते. यासाठी आपण फारच मोठ्या प्रमाणात वेळ व पैसा खर्च करतो. परंतु या सर्वांमुळे अशी समजुत निर्माण होते की बालके ही स्पंज सारखी आहेत. संस्कृतीने जे ज्ञान आखून व नेमून दिले आहे, ती ते बालके शोषून घेतात. ज्ञान, श्रद्धा आणि समजुती ग्रहण करण्याबाबतची बालकांची कार्यक्षमता ही आता सर्वमान्य आहे. परंतु त्यामुळे गोष्टींचे स्पष्टीकरण मिळण्याबाबत आणि प्रश्नांची सोडवणूक करण्याबाबत बालकांच्या ठिकाणी तितकीच लक्षणीय अशी जी कार्यक्षमता असते, त्यापासून आपण अगदी सहजच विचलीत होतो.

बालकांना एकमेकांच्या मनाविषयी ज्ञान कसे होते; या संबंधात अगदी अलीकडच्या काळात मानसशास्त्रज्ञ खास करून दिलचस्पी दाखवित आहेत. एकमेकांच्या मनाविषयी याचा अर्थ निर्जिव जगतातून ते सजीव जगतात कसे संक्रमण करतात, आपण जे पहात आहोत, ते आपल्या टप्प्यात आहे, त्यातील काही वस्तूंना ज्ञानेंद्रियामार्फत जग बघण्याची ताकद आहे, या वस्तूंना इतर वस्तूंना चालना देता येते या बाबतचे ज्ञान. याबाबतचे ज्ञान बालकाला

एकदा झाले म्हणजे मग एका कितीतरी अधिक तरल आणि सर्वस्वी भिन्न अशा अस्तित्वाच्या अवस्थेत ते प्रवेश करते. एकदा या अवस्थेत आल्यानंतर बालकांना अशी जाणीव होते की स्तुती करून इतरांना आपलेसे करता येते आणि वेळप्रसंगी आपल्या हितासाठी इतरांनी वर्तणुक कशी असावी हेही ठरविता येते. हे सारे, आपल्या कक्षेबाहेरच्या अथवा त्याच्याकडे नसणाऱ्या गोष्टी प्राप्त व्हाव्यात यासाठी हा उद्योग ती बालके करतात.

*पॉल हॅरीस* या मानसशास्त्रज्ञाने येणेप्रमाणे प्रतिपादन केले आहे. लहान बालके, आपल्या आयुष्याची सुरुवात एखादे नेमके उद्दिष्ट नसलेल्या चौकटीत (DEFAULT SETTINGS) करतात. परंतु असे असले तरीही ती चौकट बाहेरच्या जगताबद्दल अटकळ बांधण्याच्या कामात त्यांना आपोआपच मदत करते. बालके आपल्या पर्यावरणासंबंधी जसजसे जास्त जास्त शिकत जातात, तसतसे प्रथम बतावणी करणे, आणि मागाहून इतरांची मानसिक अवस्था काय आहेत हे जाणून, त्यांची वर्गवारी करणे, या संबंधीची त्यांची कुवत विकसित होते. हा विकास काही टप्प्यांच्या मालिकेद्वारा होतो. बतावणी करणे आणि इतरांची मानसिक अवस्था जाणणे, यासंबंधी त्यांना काही सांगण्याची आवश्यकता नसते. आपल्या स्वत:च्या मानसिक अनुभवाची तुलना, इतर व्यक्तिंच्या वर्तणुकीबरोबर ही बालके करतात. या संबंधात त्यांना जे भावते, त्यातून ती अधिक अधिक गुंतागुंत होत जाणाऱ्या आदर्शांच्या मालिकांची निर्मिती करतात.

बाहुल्यांकडे पाहण्याचा मुलांचा दृष्टीकोन, हे या संक्रमणावस्थांच्या मालिकेचे उदाहरण आहे. सुरुवातीला बालकाचे लक्ष निष्क्रियपणे स्विकारणारी एक वस्तू या स्वरूपाची वागणूक त्या बाहुल्यांना मिळते. थोड्याच कालावधीनंतर आपल्या खेळात सहभागी होणारा एक क्रियाशील सदस्य या स्वरूपात बालके त्या बाहुल्यांना वागवू लागतात. उदा. बाहुलीने चहापानाचा कार्यक्रम आयोजित केलेला असेल तर त्यावेळी बालक कपात चहा ओतण्याचे काम करते. कळसूत्री बाहुल्यांचे नाटक 'पंच ॲन्ड ज्यूडी शो' हे या संबंधातील आणखी एक उदाहरण. नाट्यगृहाच्या सीमेबाहेर आपण शवपेटी फेकून देणार आहोत अशी धमकी पंच देतो; त्यावेळी बालके अगदी आनंदाने चित्कारतात. याचे कारण त्यांना हे माहित असते की पंचाची पाठ फिरताच ज्यूडीने त्या शवपेटीतून अगोदरच सुटका करून घेतलेली आहे; पण ज्यूडी ही अजून त्या शवपेटीतच आहे अशी त्या पंचची समजुत आहे, हे त्यांच्या आनंदाचे कारण आहे. (पंच कसा फसला !) अनेक दिवस गेल्यानंतर या बालकांना अशी जाणीव होते की बाहुल्या या इतर लोकांसारखी वर्तणुक करीत नाहीत. या अवस्थेनंतर ती बाहुल्या आणि इतर लोक त्यांची निर्लेप ज्ञान (COGNITIVE) मिळविण्याबाबत जी कुवत आहे त्यात फरक करून त्यानुसार वागतात. एवंच *हॅरीस* यांचे प्रतिपादन थोडक्यात असे आहे. या जगाच्या प्रकृतीबाबत, बालकांच्या मनात, एकाच वेळी अनेक मालिक सैरावैरा

धावत असतात. एका विशिष्ट अवस्थेत, आपणाकडे कोणत्या गोष्टी करण्याची कुवत आहे, यासंबंधी त्यांच्या मनात निश्चित अशी श्रद्धा असते. परंतु त्या गोष्टींसंबंधी त्यांचे ज्ञान जसे वाढत जाते तसतशी त्या श्रद्धा व समजुतीत सुधारणा करण्यात येते. हेच वेगळ्या शब्दात सांगावयाचे झाल्यास, बालके अनुभवातून शिकतात हे खरे. परंतु आपल्या तपासाच्या कामात मार्गदर्शक म्हणून आपल्या मनात अगोदरच घर करून असलेल्या अनुभवपूर्व संकल्पनाच्या (PRE- CONCEPTION) संचाचा वापर ती करतात.

बालके आणि वैज्ञानिक या दोघांतील या बाबतीतील समांतरतेकडे *हॅरीस* हे विशेष करून आपले लक्ष वेधतात. उदा. मुले उदाहरणांचा वापर करतात. ही उदाहरणे बालकांच्या आपल्या स्वत:च्या वाढत्या ज्ञानावर आधारलेली असतात. *हॅरीस* हे आपले लक्ष विशेष करून मुले या उदाहरणांचा वापर कसा करतात यावर केंद्रीत करतात एखाद्या शास्त्रज्ञासारखीच ही वागणूक आहे हा भाग *हॅरीस* अधोरेखित करतात (उदा. एका नव्या घटीतासंबंधी प्रथम, एक परिकल्पना बसवून सुरवात करावयाची) बालकांची सुरवातीची उदाहरणे ही त्यांच्या अंतर्गत विश्वातूनच आलेली असतात. या उदाहरणात अनुस्युत असलेल्या वस्तु वा गोष्टी प्रत्यक्षात कशा वागतात याच्याशी त्या परिकल्पनानी केलेली भाकीते ताडून पाहिली जातात. असे करून मग जो पुरावा उपलबध होईल त्याच्या प्रकाशात हळूहळू ती बालसे आपल्या परिकल्पना अधिक टोकदार व निर्दोष करतात.

बालके ज्यावेळी भाषा शिकतात, त्यावेळी या प्रक्रियेचा अधिक करून प्रत्यय येतो. वडील माणसे जे शब्द वापरतात त्यापेक्षा अधिक बंदिस्त (Narrower) अगर विस्तृत अशा शब्दांचा अर्थ बालके प्रथम कां शिकतात? या प्रश्नाबाबत मानसशास्त्रज्ञात मतैक्य नाही. हे खरे आहे. परंतु दुसऱ्या एका बाबतीत मतैक्य आहे. ती बाब म्हणजे. एखाद्या शब्दाचा जो बरोबर व योग्य अर्थ आहे, त्यावरच बालके येऊन ठेवतात. योग्य व बरोबर याचा या ठिकाणी एका विशिष्ट अर्थ आहे. वडीलधारी माणसे आपल्या भाषा वर्तुळात तो शब्द जेव्हा वापरतात, तेव्हा त्यांचा जो अर्थ विस्तृतपणे स्वीकारला जातो तो अर्थ बरोबर व योग्य आहे असे समजले जाते. अशा या योग्य अर्थावर येऊन ठेवण्याकरीता बालके परिकल्पनाची (शब्दाच्यां व्याख्यांची) तपासणी या प्रक्रियेचा वापर करतात. प्रत्यक्षात त्याचे असे असते की, बालक एखादा शब्द ज्या संदर्भात प्रथम वापरला जाताना ऐकते त्यावरून त्या शब्दाला विशिष्ट अर्थ आहे असा निष्कर्ष ते बालक सुरवातीला काढते. तोच शब्द दुसऱ्या एका नव्या संदर्भात वापरला गेल्याचे ऐकल्यानंतर, ते त्या शब्दाच्या आपल्या मुळातील व्याख्येत (परिकल्पनेत) बदल करते. ती व्याख्या अधिक टोकदार व निर्दोष करते. असे करून ज्यात अप्रस्तुत असे सुचन असेल ते वगळण्यात येते. ही सारी प्रक्रिया बालक आणखी एका ठिकाणी करते. बालकाने एखादा शब्द चुकीच्या पद्धतीने वापरलेला असेल आणि त्याच्या वडीलधाऱ्या माणसानी त्याची चूक दुरुस्त केलेली असेल, तर त्या शब्दाच्या मूळ व्याखेची (परिकल्पनेची) तपासणी होऊन ती अधिक निर्दोष करण्यात येते.



अनुक्रमणिका

एखाद्या शब्दाचा शेवट कसा होतो? (उदा. एखाद्या भाषेतील क्रियापदांचा भूतकाळ कसा व्यक्त केला जाते? त्याचे बरोबर रूप कोणते?) हे ज्या प्रकारे बाले शिकतात त्यावरून परिकल्पना तपासणी या प्रक्रियेचा फारच चांगला प्रत्यय येतो. तो या संदर्भातला भक्कम पुरावा आहे. मानसशास्त्रज्ञ *इव्ह क्लार्क* यांनी बालके एखादी भाषा आपलीशी कशी करतात. याविषयी सखोल व विस्तृत अशी पहाणी केलेली आहे. त्यानी असे प्रतिपादन केले आहे की, सुरवातीला एखादा आदर्श पुढे ठेऊन त्यानुसार घोकंपट्टी करून तयार झालेले इतर आदर्श सुरवातीला ती वापरतात हे खरे आहे. परंतु कालांतराने क्रियापदाचा भूतकाळ सर्वसामान्यपणे तयार करण्याचा एखादा सर्व सामान्य नियम ही बालके लवकरच शिकतात. हे जे या प्रकारचे नियम आहेत ते हे जग कसे काम करते, या विषयीच्या परिकल्पनासंबधी असतात. निदान त्यांचा हेतू व उद्दिष्ट तरी तसे असते.

या ठिकाणी एका मुद्याकडे खास करून लक्ष पुरविणे अगत्याचे आहे. *मानसशास्त्रज्ञ हा बालकाकडे कोणता गुण आहे हे सांगत आहे. बालकाच्या मनात प्रत्यक्षात काय आहे हे तो सांगत नाही.* मागे येऊन गेलेल्या उंदराच्या उदाहरणासारखेच हे उदाहरण आहे. उंदीर 'स्वत:शी असे म्हणत नाही की' बझर वाजला याचा अर्थ घसरगुंडीवरून अन्नखाली येईल. बालकांचेही तसेच असते. एक प्रकारची श्रद्धेय प्रतिमा (Icon) अथवा दुसऱ्या एखाद्या बिगर शब्द-ध्वनीच्या स्वरूपात या बाबतचा एखादा नियम बालकाच्या मनात बहुधा वास्तव्य करून असावा ते कांहीही असो आपणास त्याचे स्वरूप पुरेश्या शब्दात व्यक्त करता येईल. एका भाषेतून दुसऱ्या एखाद्या भाषेत करण्यात आलेले ते एका प्रकारचे भाषांतर आहे; असे त्याचे स्वरूप आहे.

बालके भाषा ज्या प्रकारे शिकतात. त्याचे दुसरेही काही पैलू आहेत. ते पैलू या अगोदर वर्णन केलेल्या उंदरावरच्या काही प्रयोगांची आठवण करून देणारे आहेत. बालके एका विशिष्ट प्रकारचे शब्द त्या मानाने अधिक सहजपणे शिकतात, याबद्दलचा पुरावा उपलबध आहे. उदा. बालकाना ज्या प्रकारच्या वस्तुंचा चांगला परिचय असतो. (उदा. खेळणी) त्या विषयींचे शब्द ती सहजपणे शिकतात. परंतु त्या गोष्टी नैसर्गिक वस्तु या स्वरूपात प्रकट होत नाहीत (उदा. रावण, दत्तगुरू, नरसिंह) अशा वस्तुंचे शब्द ती सहजपणे शिकत नाहीत. या पुराव्यावरून एका गोष्टीचे सुचन होत असावे. ती म्हणजे मुलाना ज्या गोष्टींचा / वस्तुंचा परिचय आहे, त्यांच्यासारख्याच असलेल्या दुसऱ्या वस्तुंची वर्गवारी करणे, त्यांच्याबद्दलचे शब्द, हे मुले स्वाभाविकपणे शिकतात, असे तरी असावे, अथवा त्यांच्याकडे उपजतच अशी यंत्रणा असावी की त्यायोगे या जगाबद्दलचे ज्ञान मिळविण्याच्या कामात त्याना तिचा स्वाभाविकपणे एक आधार म्हणून उपयोग होत असावा ही यंत्रणा त्यांना उपलब्ध असल्याकारणाने, या जगाची जी काही विशिष्ट प्रकृती आहे, त्याकडे लक्ष पुरविण्यासाठी त्यांची मानसिकता अगोदरच तयार झालेली असते. यापैकी कोठचा भाग बरोबर आहे, यंत्रणा की सारख्या वस्तुंचे शब्द शिकणे त्या मुद्याची तड लागलेली नाही– नव्हे ती लागण्याच्या

जवळपास ही वैज्ञानिक पोचलेले नाही हे खरे आहे. परंतु बालकांवर भाषेने परिणाम करण्याच्या कितीतरी अगोदर बालके विशिष्ट प्रकारच्या सुचनाकडे अगदी स्वाभाविकपणे लक्ष देतात, हेही तितकेच खरे आहे.

इंग्लिश मातृभाषा असणाऱ्या बालकांवर प्रयोग केल्यानंतर पुढील गोष्टी आढळून आल्या. बालके जगाकडे ज्या प्रकारे पाहातात, त्यात कर्त्यासंबधीची (AGENT) कल्पना, ही त्या पाहाण्याचा अंगभूत असा भाग आहे. बालके भाषेचा प्रथम वापर करू लागतात. त्यावेळी ती अगदी स्वाभाविकपणे क्रियापदाअगोदर कर्त्याचे स्थान ठेवतात. कर्त्याच्या लिंगवचनानुसार काही भाषातील क्रियापदांचे शेवट बदलतात. तसे इंग्रजी भाषेचे नाही. इंग्रजीसारख्या भाषातून कर्ता हा 'एकटाच' असतो. वाक्यातील त्याच्या स्थानावरून तो ठरतो. *रार्बटसन आणि सुकी* (Suci) या संशोधकानी बालकांवर काही प्रयोग केले होते. या प्रयोगात अठरा महिने वयाची बालकेही अंर्तभूत होती. या बालकाना चित्रपटाचा एक छोटासा भाग दाखविण्यात आला. कर्ता, क्रिया– ज्या कशावर क्रिया केली जाते ते. हे सारे या अनुक्रमाने, या चित्रपटाच्या तुकड्यात अंर्तभूत होते. असे आढळून आले की, साऱ्या बालकांचे लक्ष त्या तुकड्यातील कर्त्यावरच सातत्याने केंद्रीत होत होते. आपल्याशिवाय अन्य व्यक्तीच्या मनाची अवस्था काय असेल या संबधी निष्कर्ष काढण्याची कुवत, यास आपण 'मनाविषयीचा सिद्धांत' असे मानूया. *रार्बटसन, आणि सुकी* यांच्या प्रयोगाद्वारे हा 'मनाविषयीचा सिद्धांत' बालके कशा प्रकारे आपलासा करतात, त्याचे काही प्रमाणात सुचन होते. उदा. केवळ आठ महिने वयाचे बालक, जेव्हा एखाद्या चित्रात 'कर्ता' ही एखादी व्यक्ती असेल तर त्या चित्राकडे हे बालके अधिक काळ टक लावून पाहातात. समजा हा कर्ता निर्जिव असेल (वाऱ्याने झाडे हलणे) तर त्या चित्राकडे ही बालके फारच कमी वेळ टक लावून पाहातात.

*ॲलन लेस्ली* यांनी आणखी एका प्रकारची प्रयोग मालिका या संदर्भात सिद्ध केली होती. या जगातील घटनाविषयी भाष्य करताना, त्यांचा अर्थ लावताना. अगदी तरुण मुले कारण-परिणाम या संबधातच, त्या घटनाकडे पाहातात असा पुरावा त्या प्रयोग मालिकेतून उपलब्ध झालेला आहे. या प्रयोगासाठी पुढील प्रकारची चौकट वापरण्यात आली होती. या लहान बालकाना एखादी घटना अंर्तभूत असलेल्या चित्रपटाचे छोटे छोटे तुकडे दाखविण्यात आले. *लेस्लीनी* या प्रयोगाअंती पुढील गोष्ट आढळून आली. अगदी साडेचार महिन्यांची बालके देखील ज्या चित्रपटांच्या तुकड्यातील वस्तुत : 'स्वाभाविक' असे कारण-परिणाम दाखविणारा तुकडा असला, तर त्या तुकड्याबाबत ती बालके अधिक संवेदनाक्षम असतात. (एका हिरव्या वीटेला, तांबड्या वीटेने, ठोकर दिल्यानंतर हिरवी वीट हालते वा पुढे सरकते हे 'स्वाभाविक' संबधाचे एक उदाहरण) परंतु हे कारण-परिणाम सबंध अस्वाभविक असले तर ती बालक तितकीशी संवेदनाक्षम नसतात. (तांबडी वीट हिरव्या वीटेजवळ येऊन तिला ठोकर न देता; सहा सेंटिमीटर अंतरावर थांबते. असे असले तरी ती हिरवी वीट पुढे सरकली तर ते अस्वाभाविक संबधाचे उदाहरण) संवेदनाक्षमता ही बालक त्या चित्राकडे

किती काळपर्यंत पाहाते यावरून ठरविण्यात येते. आरंभीला प्रथम 'स्वाभाविक' मागाहून अस्वाभाविक असा अनुक्रम ठेऊन प्रयोग करण्यात आले होते. ही बालके सहा महिने वयाची झाल्यानंतर हा अनुक्रम बदलण्यात आला म्हणजे तांबडी वीट, व मागाहून हिरवी वीट या क्रमाने चित्रपटाचे तुकडे दाखविण्यात आले. या प्रयोगात असे आढळून आलेली ही बालके स्वाभाविक परिणाम संबधाबद्दल पूर्वीपेक्षाही अधिक दिलचस्पी (interest) दाखवित होती. अस्वाभाविक संबधाबद्दलच्या त्यांच्या प्रतिक्रियेत फरक पडला नव्हता. हिरवी वीट, आणि तांबडी वीट यांचे अनुक्रम बदलले होते हे खरे. परंतु त्यांचा स्थळ-काल यांची रचना यात फरक पडला नव्हता, म्हणजे एका रंगाची वीट एका विशिष्ट कालावधीनंतर दुसऱ्या एका वीटेवर आदळत होती, अथवा एका विशिष्ट अतंरावर थांबत होती. एकाच ठिकाणी आणि एकाच विशिष्ट वेळी या घटना घडल्या होत्या इत्यादी. या प्रयोगातून असे सुचित होते की बालके, 'स्वाभाविक' आणि अस्वाभाविक यातून प्राप्त होणाऱ्या दोन प्रेरणांच्यात असलेली स्थानिक सलगता पाहाता नव्हते, तर त्यापेक्षा अधिक काहीतरी पाहात होते.

या प्रयोगांच्याबाबत *लेस्ली* यांनी पुढील प्रतिपादन केलेले आहे. या प्रयोगातून निष्पन्न झालेल्या निष्कर्षांनी प्रख्यात तत्वज्ञ ह्यूम यांच्या त्या ऐतिहासिक प्रतिपादनाला सुरूंग लागलेला आहे. तत्वज्ञ ह्यूम यांनी असा दावा केला होता की, दोन वस्तु, घटीते आणि घटना यांपैकी दोन एकाच वेळी वारंवार पाहाण्याचा एकसारखा अनुभव आपण घेतो. या सातत्याने येणाऱ्या अनुभवाला पायाभूत मानून आपण एक सर्वसाधारण सूत्र बसवितो. 'कारण-परिणाम' या संबधाबाबतचा आपला जो दृष्टीकोन आहे, तो या सर्वसाधारण सूत्रावर आधारीत आहे. याऐवजी *लेस्ली* यांच्या प्रयोगातून निघणाऱ्या निष्कर्षातून वेगळेच सुचन होते ते म्हणजे, कारण-परिणामात्मक असे जे संबध असतात. (उदा. एका वस्तुने दुसरी वस्तु हालते वा पुढे सरकते) ते प्रत्यक्षपणे दृग्गोच्चर होतात; या प्रतिपादनास पुष्टी मिळते. हेच वेगळ्या शब्दात सांगावयाचे झाल्यास आपण या प्रकारचे संयोग (उदा. एका वस्तूने दुसरी ढकलणे व ती दुसरी स्थानभ्रष्ट होणे) जेव्हा पाहातो, तेव्हा आपण स्वाभाविकताच, या संयोगाचा अर्थ 'कारण-परिणाम' या स्वरूपात वाचण्याची प्रवृत्ती प्रकट करतो. *लेस्ली* यांनी याहीपुढे जाऊनही प्रतिपादन केलेले आहे. ते म्हणतात, या अशा स्वरूपाचे स्थल-कालात्मक असे जे संयोग असतात, त्याबाबत विशेषकरून अगदी लहान बालके फारच संवेदनाक्षम असतात (विशेषत: आपल्या वयाच्या पहिल्या काही वर्षापर्यंत). ही जी या प्रकारची संवेदनाक्षमता आहे, ती कालांतराने विकसित होणारी कारण-परिणात्मकता समजावून घेण्याच्या दृष्टीने पायाभूत ठरते. या संबधात आणखीही प्रयोग झालेले आहेत. या संशोधनाने असे दाखवून दिले आहे की 'कारण-परिणात्मकता' या विषयीच्या अत्यंत तरल अशा (उदा. शब्द) कल्पनांचा वापर करण्यास बालके, तीन वर्षाची होईपर्यंत, केव्हाच सुरवात झाली होती; साध्या-सुध्या यांत्रिक स्वरूपाची क्रिया-प्रतिक्रिया समजावून घेण्याचा, प्रयत्न ती बालके करू लागल्यानंतर हे घडते.



अनुक्रमणिका

आणखी एका प्रकारे प्रतिपादन करता येईल. उदा. कवेळ चार महिन्याच्या बालकालाही कारण-परिणामात्मकता या संबधाविषयी शिकून घेण्यासाठी भरपूरवेळ उपलब्ध असतो. तसेच त्यांची काळजी घेणाऱ्या ज्या व्यक्ती असतात त्यांच्या करवीही त्याना हे शिकून घेता येते. कारण-परिणामत्मकतेचे भान मुळात कसे निर्माण होते, या संबधात निसर्ग की संगोपन (Nature v/s Nurture) यासारख्या वांझोट्या वादात गुंतून पडल्याने फारच अल्प असे पदरात पडेल. हे भान कसे निर्माण होते? हे बालकाला उपजतच असते की संगोपनाच्या काळात त्याला शिकविण्यात येते? अथवा या दोन्ही गोष्टींच्या मिश्रणातून ते निर्माण होते. असे म्हणणे अधिक सयुक्तिक ठरेल- या प्रश्नांची उत्तरे आपण ज्या मुख्य मुद्याची चर्चा करीत आहोत त्या दृष्टीने विचारात घेण्याजोगी नाही. आपला मुख्य मुद्दा असा आहे की बालके बोलावयास शिकण्याअगोदर कितीतरी दिवस... ती अगदी लहान असल्यापासून त्यांना कारण- परिणामात्मकतेबद्दल खरोखरीच जाण असते. हेच वेगळ्या शब्दात सांगावयाचे झाल्यास ही बालके ज्या समाजात जन्मास आलेली असतात, त्या समाजाच्या सांस्कृतिक अशा पूर्व-समजूतींचा त्यांच्यावर परिणाम होण्याअगोदर या जगातील घटनांचा अर्थ लावण्यास त्या बालकांनी सुरवात केलेली असते.

*लेस्ली* यांनी आपले प्रतिपादन आणखीही पुढे नेले आहे. त्यांनी असे सुचविले आहे की या बालकाच्या विकासाच्या वाटचालीत. हे कारण-परिणात्मकतेच भान, हा एक महत्त्वाचा घटक असतो याच्या मदतीने बालकाला एक प्रकारचा मोठा आधार प्राप्त होतो. या आधारमुळे या अवती-भोवतीच्या जगात पुरेशी सुसुत्रता आहे असे त्या बालकाला आपोआप समजू लागते, व या जगातील खऱ्याखुऱ्या गुंत्याचा अर्थ लावण्याची जागा प्राप्त होण्यास सुरवात होते. *लेस्ली* पुढीलप्रमाणे आणखीही प्रतिपादन करतात. स्वाभाविक कारण-परिणामात्मकता ही कल्पनाच अशी आहे की, तिच्यात पुढील गोष्टी अनुस्युतच आहेत. (१) वयाच्या पहिल्या दोन किंवा तीन वर्षाच्या आत बालक एक प्रकारची कुवत विकसित करते. (२) यामुळे ज्या वस्तु वा गोष्टी प्रत्यक्षात अस्तित्वात नसतात. त्यांच्याशी आपण खेळ करीत आहोत अशी बतावणी करण्याची ताकद, त्या विकसित झालेल्या कुवतीत अंतर्भूत असते.

**काम चलाऊ नियम (Rules of Thumb) शिकणे.**

प्राण्यांनी स्वत:च्या वापरासाठी काही नियम केलेले असतात. तसेच पर्यावरणातही असे काही घटक असतात, की त्यामुळे प्राण्याच्या वागणूकीस आकार येतो; असा निष्कर्ष वैज्ञानिकांनी काढलेली आहे. या दोहोत फरक कसा करावा हे जीवशास्त्रज्ञांनी शिकून घेतले आहे. या स्वरूपात प्राण्यांचे जे स्वत:चे विश्व आहे, त्याबाहेर वैज्ञानिक उभे असतात. असे असल्याकारणाने प्राणी जे काही करतात, त्याचे दूरवरच्या भविष्यकाळात कार्यात्मक (Functional) असे जे परिणाम होतील त्यांना वैज्ञानिकांना दाद देता येते आणि म्हणूनच

उत्क्रांतीवादी शक्ती हा प्राणी कशा घडवितात, हे वैज्ञानिकांना ठरविता येते. एखाद्या प्राण्याला स्वत:ला जे काही करता येत नाही, याचे कारण एकतर हेतूपूर्तीसाठी अथवा हेतूने दिलेली प्रेरणा याच पातळीवर अधिक करून प्राणी वावरत असतात. गतकाळातील अनुभव आणि हेतूनी दिलेली प्रेरणा या दोहोंचा मिलाफ करून त्याच्यावर आधारित असे साधे-सुधे नियम तयार करून त्यांचा वापर प्राणी करतात. समजा एखाद्या प्राण्याला भूक लागली, तर मग अन्नाची प्राप्ती कशी व कोठे होणार हे त्याला माहीत असते. जीवशास्त्रज्ञ या अशा वागणुकीला 'कामचलाऊ नियम' म्हणून संबोधितात.

अनुभवातून शिकण्याच्या प्रक्रियेत, आपल्या वर्तुणकीला मार्गदर्शक म्हणून काही साधे नियम प्राणी विकसित करतो. हे नियम एखाद्या सर्वसाधारण सूत्रावर आधारीत असतात. आपण मानव प्राणीही अनेक वेळा तेच करतो. उदा. आपण आगीत हात घातला, तर हात भाजतो हे एकदा ठाऊक झाल्यानंतर, आगीत घालावयाचा नाही असे आपण शिकतो. अशा रितीने आपण एक साधा (काही वेळा तसे करणे हे दु:खदायक का असेना) नियम शिकतो; आणि भविष्यकाळात आपल्या वागणूकीसाठी त्याचा मार्गदर्शक म्हणून वापर करतो.

आपण पुन्हा एकदा तो मधवाटाड्या पक्षी आणि बोरान जमातीचे गोपालक याजकडे वळू या. या दोघांची व आपली भेट गेल्या लेखात झालेली आहे. त्यावेळी आपण त्यांचा विचार एका वेगळ्याच संदर्भात केला होता. एक परंपरावादी जमातीतील मनुष्य एक निसर्ग-वैज्ञानिक या स्वरूपात कसा वावरतो? तो ज्या नैसर्गिक जगतात वास्तव्य करून असतो, तेथे त्याची वर्तणूक काय असते? त्या जगताच्या चालचालणूकीचा आपल्या स्वत:च्या फायद्यासाठी तो कसा घ्यायचा हे त्यास कसे शिकता येते? हे आपण त्या लेखात पाहिले आहे. आपण त्या लेखात वर्णिलेले सारे घटीत उलटे करून त्याचा विचार करू या. मानवा व्यक्तिरिक्त इतर प्राण्यांच्या एक वैज्ञानिक या स्वरूपात वागण्याच्या क्षमतेबद्दल, तो मध-वाटाड्या पक्षी आपणास काय सांगतो?

आता हे शक्य आहे की मध-वाटाड्या पक्षी बोरान जमातीच्या लोकांना मार्गदर्शक करण्याचे कौशल्य मनुष्य प्राण्यापासूनही शिकला असेल. या जमातीचे लोक, मध-वाटाड्या पक्षाच्या या वर्तणुकीचा फायदा सतराशे सालापासून घेत आहेत. या संबंधात भरपूर पुरावा उपलब्ध आहे. याशिवाय आणखी एक वेगळे व संयुक्तिक असे स्पष्टीकरणेही आहे. मानवा व्यक्तिरिक्त इतर प्राण्यांची वागणूक या मध-वाटाड्या पक्षाने पाहिली होती. तिच्या आधाराने त्याने एक सर्वसामान्य सूत्र 'तयार' केले. मग त्याने ते मानव प्राण्याला लावून त्याचा वापर करून अनुभव घेतला असावा. हे स्पष्टीकरण एका घटनेवरून सुचित होते. रॅटेल (RATEL) या नावांचा सस्तन प्राणी आहे. तो मासे खातो व रात्रीच्या वेळी संचार करतो. जमीन पोखरून तिच्या आत घर करून राहतो. यास दक्षिण आफ्रिकेत HONEY BADGER हनी – बॅजर असेही नाव आहे. मध-वाटाड्या पक्षी या रॅटेल प्राण्याला मध-माशांची पोळी कोठे आहेत, त्याबद्दल मार्गदर्शन करतो. सर्व आफ्रिका खंडात, मध-वाटाड्या पक्षी हे अशा प्रकारचे





अनुक्रमणिका

मार्गदर्शन करण्याबाबत प्रसिद्ध आहे. मनुष्य प्राण्याला आपल्याकडे आकृष्ट करून, मग त्याना मार्गदर्शन करावयाचे, असा नियम मध-वाटाड्या पक्षाने बसविलेला आहे. रॅटेल या प्राण्याबाबतची त्यांची वागणूक अगदी तंतोतंत तशीच असते. मध-माश्यांच्या पोळ्याला धाड घालणे, त्या पोळ्यातील मध खाऊन तेथे इतर खाण्याजोग्या ज्या वस्तु असतील त्या खाऊन ह्या फस्त करणे, हा या रॅटेल प्राण्याचा आवडता उद्योग आहे. त्याची जाड कातडी आणि त्यावरचे दाट केस त्यामुळे मध-माशात्याला चावल्या तरी, त्याला काहीही इजा पोहोचत नाही. उत्क्रांतीच्या वाटचालीत त्या प्राण्याने ही जाड कातडी व त्यावरचे दाट केस आपलेसे केले असावेत. म्हणूनच त्याला मध– माशांच्या पोळ्यावर धाड घालून, ते स्वत:ला खाण्यासाठी खुले करता येतो. मध-वाटाड्या पक्षाचा 'वाटा' म्हणून हा रॅटेल हेतु:परस्पर काही मध बहुतकरून मागे ठेवत नसावा. परंतु त्याची खाण्याची पद्धतच इतकी गैरशिस्त आहे की, काही मध मागे राहातोच. आपल्या मार्गदर्शनासाठी पुरेसा मोबदला मिळालेला आहे असे मध-वाटाड्या पक्षाला त्यामुळे वाटते.

मध-वाटाड्या पक्षी जेव्हा एखाद्या माणसाला मध-माशांच्या पोळ्याकडे घेऊन जाण्यासाठी मार्गदर्शन करतो. तेव्हा तो मनुष्य ज्याप्रमाणे मध-वाटाड्याच्या मार्गदर्शनास प्रतिसाद देईल त्यानुसार अगदी तपशीलात जाऊन, तो पक्षी आपल्या वागणुकीत व मार्गदर्शनात फारच बारकाव्याने बदल करतो. हे सारे ज्या प्रकारे हा पक्षी करतो ते सारेच मोठे लक्षवेधी असते. मध-वाटाड्या पक्षी तो ज्यास मार्गदर्शन करीत असतो. त्या माणसाच्या वर्तणुकीचा फारच तपशीलात जाऊन तपासणी करतो असे आयझॅक (ISACK) आणि रेयर (REYER) या पक्षीतज्ज्ञांना आढळून आले होते. प्रथम मध-वाटाड्या पक्षी त्या मधाच्या पोळ्याच्या दिशेने उडत जाऊन, माणसाची वाट बघत एके ठिकाणी थांबतो. यदाकदाचित् तो माणूस त्या ठिकाणी आला नाही, तर त्याला आणण्यासाठी तो पक्षी माघारी जातो. अशा रितीने तो माणूस मजलदरमजल करीत त्या मध-वाटाड्या पक्षाच्या मार्गदर्शनाखाली मधाच्या पोळ्याशी येऊन ठेपतो. एकदा का तो मनुष्य मधाच्या पोळ्याजवळ आला की पक्षाच्या वागणुकीत लगेच फरक पडतो. मग तो वेगळ्याच प्रकारचा आवाज काढतो. (पक्षी-तज्ज्ञ यास 'दर्शक' ओरडणे म्हणतात) यानंतर मात्र या पक्षाच्या पाठोपाठ येणाऱ्या माणसाने दिलेले हाकारे वा केलेल्या आवाजाना तो पक्षी कमी कमी प्रतिसाद देऊ लागतो. एकदा का तो मनुष्य मधाच्या पोवळ्याच्या अगदी जवळ आला की मग तो मनुष्य थांबण्यापूर्वी तो पक्षी थोडेसे अंतर उडू उडत उडत पुढे जाईल आणि सरतेशेवटी तो मनुष्य त्या मधाच्या पोळ्याशीच येईपर्यंत त्या मधाच्या पोळ्याला घिरट्या घालीत बसेल.

याहीपेक्षा बोरान जमातीतील मध-गोळा करणाऱ्या गोपालकांनी सांगितलेली माहिती ही कदाचित् अधिक लक्षवेधी व मनोरंजक ठरावी. हे मधाचे पोळे किती दूर आहे, याबाबतीत हा मध-वाटाड्या पक्षी बारोन लोकाना काही वेळा चक्क फसवितो. प्रत्यक्षात ते अंतर जितके असते, त्यापेक्षा ते कितीतरी कमी आहे असे भासवितात. त्याचे असे आहे की बोरान

जमातीतील लोक फारतर दोन किलोमीटर अंतर चालून जाण्यास तयार असतात. याचे कारण आपल्या जनावरांचे कळप, त्याना काही संरक्षण नाही अशा अवस्थेत अधिक काळ सोडून जाण्याची बोरान माणसाची तयारी नसते. मधाचे पोळे २ किलोमीटर अंतरापेक्षा कमी अंतरावर आहे असे तो पक्षी भासवितो. बोरान जमातीने सांगितलेली ही माहिती किती बरोबर आहे याचा पडताळा *आयझॅक* व *रेयर* या पक्षी तज्ज्ञांनी घेतलेला नाही. परंतु या जमातीने या संदर्भात सांगितलेली इतर सर्व माहिती पडताळून पहाता ती अचूक अशीच होती हे पुराव्यानिशी सिद्ध झाल्याकारणाने, बोरान जमात हा मध-वाटाड्या पक्षी फसवणूक कशी करतो याबाबत जे काही सांगत होते, ते बरोबरच आहे असे त्याना वाटते.

बोरान जमातीचा हा मध-वाटाड्या पक्षांच्या वर्तणुकीबद्दलचा जो दावा आहे. त्याचे आणखी एक स्पष्टीकरणे देता येईल. एका विशिष्ट मर्यादेपलीकडचे अंतर किती याचा अंदाज घेण्याच्या बाबतीत हे पक्षी वाकबगार नाहीत, असा युक्तिवाद या स्पष्टीकरणद्वारे करता येईल. तथापि हे स्पष्टीकरण बरोबर आहे असे मानले, तर मग आणखी एका वस्तुस्थितीचे स्पष्टीकरण देणे आपणास भाग पडेल. बोरान जमातीचे लोक हे अमूक अंतरापर्यंतच आपल्या मागोमाग येतील, हा अंदाज बांधण्याबाबत हे मध-वाटाड्या कसे काय कुशल आहेत? अर्थात हे पक्षी लांब पल्ल्याचा अंदाज घेण्याबाबत, फारच अकार्यक्षम आहेत असे जर मानणार असलो, तरच या प्रश्नाचा शोध घेणे प्रस्तुत ठरेल. थोडक्यात दोन किलोमीटर अंतरच त्या पक्षाला जोखता येते. त्या पलीकडचे नाही असे हे प्रतिपादन आहे. फक्त दोन किलोमीटर अंतर जोखणे आणि त्या पलीकडचे न जोखता येणे, हा अर्थातच तसा फारच क्वचित आढळणारा योगायोग ठरावा इतके ते अशक्य कोटीतले आहे. याउलट बोरान जमातीचे लोक हे या मध-वाटाड्या पक्षांविषयी सांगतात की दोन किलोमीटर पलीकडचे अंतर असले, तर हे पक्षी बुद्धीपुरस्सर ते अंतर कमी आहे असे भासवितात. ते जर खरे मानले, तर मग पुढील निष्कर्ष काढावा लागतो. मधाची पोळी जर दोन किलोमीटर अंतरापेक्षा जास्त अंतरावर असली, तर मग आपण ज्यास मार्गदर्शन करीत आहोत, तो मनुष्य आपल्या पाठोपाठ येणे असंभवनीय याचे कारण ती मधाची पोळी त्या माणसाच्या इच्छेपेक्षा तशी दूर अंतरावर आहेत. या कारणास्तव त्याची काही ना काही क्लुप्ती वापरून फसवणूक करावयास हवी.

या सर्व माहितीत आणखी एक सुचन आहे. स्वत:शिवाय दुसऱ्या एखाद्या प्राण्याच्या वर्तणुकीबाबत, हा मध-वाटाड्या विलक्षण संवेदनाक्षम आहे. परंतु अनेक प्रगत प्राण्यांच्या ताकदी बाहरेचे हे कर्तृत्व नाही हे तितकेच खरे. डोरोथी चेनी (DOROTHY CHENEY) आणि रॉबर्ट सेफार्थ (ROBER SAYFARTH) या दोन शास्त्रज्ञानी प्रयोगांच्या एका चांगल्याच मोठ्या मालिकेद्वारा ही गोष्ट दाखवून दिलेली आहे. त्यांनी हे प्रयोग माकडांच्या VERVET व्हेरव्हट या जातीवर केले होते. हे प्रयोग रानात, म्हणजे त्या माकडांच्या रहात्या जागेत व परिचित वातावरणात करण्यात आले होते; थोडक्यात प्रयोगशाळेत केलेले ते प्रयोग

नव्हते. या शास्त्रज्ञानी या प्रयोगाद्वारे असे दाखवून दिले की, व्हेरव्हट माकडे ही फारच चांगली प्राणी-वर्तन-शास्त्रज्ञ (ETHOLOGIST) आहेत. म्हणजे दुसऱ्या प्राण्यांची वर्तणूक पाहून, त्या दुसऱ्या प्राण्यांचे हेतू काय असतील, हेही माकडे फारच चांगल्या प्रकारे जाणतात. प्राण्यांना 'जर असे. . . . तर मग' अशा प्रकारचे साधे निष्कर्ष काढता येतात. याबद्दलचा पुरावा या शास्त्रज्ञानी केलेल्या प्रयोगातून उपलब्ध झालेला आहे. या प्रयोगाद्वारे *राबर्ट सेफार्थ* आणि *डोरोथी चेनी* यांनी दाखवून दिलेले आहे. दुसऱ्या प्राण्यांच्या गतकालातील वर्तणुकीबाबतच्या अनुभवातून मिळालेल्या माहितीचा उपयोग या माकडाना करता येतो. सहकार्य करण्यासाठी उत्तम सहकारी निवडण्यासाठी या माहितीचा उपयोग ती माकडे करतात. तसेच आपल्या जातीतील जी अन्य माकडे आहेत त्यांना फसविण्यासाठी, आणि त्यांच्यापासून लाभ उठविण्यासाठीही या माहितीचा उपयोग ही माकडे करतात.

नैसर्गिक-विज्ञान याच्याशी संदर्भ असलेले आणखी एक उदाहरण चिंपाझींचे. चिंपाझी औषधी वनस्पतींचा वापर करतात. निसर्गातील वनस्पतीपासून अनेक गोष्ट उपलब्ध होतात. त्यातील काहींचा उपयोग औषध म्हणून करता येतो. चिंपाझी या औषधी वनस्पतींचा वापर भरपूर करतात. या संदर्भात अनेक उदाहरणे उपलब्ध आहेत व ती भरपूर पुराव्यासकट ग्रंथबद्धही झालेली आहेत. उदा. माईक हुफ्फमान (MIKE HUFFMAN) आणि महम्मदी सेईफू (MAHAMMEDI SEIFU) या दोघानी केलेल्या निरीक्षणात त्यांना पुढील गोष्ट आढळून आली. तांझानिया या आफ्रिकेतील देशातील महाले माऊंट नॅशनल पार्क या ठिकाणचे चिंपाझी काही वेळा VERNONIA व्हेरनोनिया या नावांच्या झुडपाचा (हे झुडूप पूर्व आफ्रिकेत सर्वच आढळते) पानांची देठे व दांडे चावतात व चघळतात. परंतु चघळून झाल्यानंतर चोथा थंकून टाकतात. या देठातून व दांड्यातून मिळणारा रस हा चांगला कडू असतो. इतका कडू की तो गिळणे अशक्य. पूर्व आफ्रिका या विभागातील लोक या झुडपाचा उपयोग आतड्याच्या रोगासाठी (INTESTINAL DISOROEA) आणि खास करून जंत झाले असता, त्याना निपटण्यासाठी करतात. एकदा या झाडाचा पाला व देठे खाल्ली की हे जंत बाहेर फेकले जातात व पुन्हा होत नाहीत असा त्यांचा अनुभव आहे. या झुडपापासून मिळणारा रस हा उपकारक आहे, याचा शोध चिंपाझीना लागलेला नाही असे समजा गृहित धरले, तर मग या झाडांच्या पानांची देठे व दांडे बराच काळ चघळून ती न गिळता, त्याचा चोथा चिंपाझी बाहेर थंकून टाकतात, या कृतीचा अर्थ लावणे कठीण आहे.

याच धर्तीवर तोशिसादा निशिदा (TOSHISADA NISHIDA) आणि (PAUL NEWTON) पॉल न्यूटन यांनीही पुढील गोष्टी नोंदविल्या आहेत. यांपैकी *पॉल न्यूटन* हे डॉक्टर (वैद्यक) आहेत. शिवाय ते व्यवसायाने खास करून प्रायमेटस या विभागातील प्राणीशास्त्रज्ञ आहेत. आसपिलीआ (ASPILIA) नावाची एक वनस्पती आहे. तिची पाने चिंपाझी आपल्या ओठांच्या खालच्या बाजूला तोंडात ठेवून, ती चघळून, घोळवितात असे काही वेळ केल्यानंतर जो चोथा तोंडात राहतो. तो थुंकून बाहेर फेकतात. ही वनस्पतीसुद्धा

आफ्रिकेतील स्थानिक लोक आतड्याच्या रोगासाठी वापरतात. *निशिदा* व *न्यूटन* यानी असेही निदर्शनास आणून दिले आहे की, हिरड्यांचा पृष्ठभाग या वनस्पतीचा रस शोषून घेण्याचे काम विशेष करून चांगल्या प्रकारे करतो. हिरड्या करवी हे औषध अन्य ठिकाणी न जाता थेट रक्तवाहिन्यात प्रवेश करते. असे केल्याने पोटातील पाचक रसांपासून या वनस्पतीच्या रसात असलेल्या औषधी द्रव्याना इजा पोहोचत नाही. ही वनस्पती औषधी द्रव्ये प्रथम पोटात जाती, तर या द्रव्यांचा पोटातील पाचक रसानी नाश केला असता.

परंतु वनस्पतीचे औषधी गुण जाणून त्यांचा वापर करणारा चिंपाझी हा एकटाच प्राणी नाही. इतर जातीच्या माकडानाही विशिष्ट अन्नपदार्थ आणि आपले आरोग्य यात असलेले सुसंवादीत्व माहिती असते, याची नोंद घेतली गेली आहे. उदा. आफ्रिकेतील इथोपिया या भागातील सिमेन नावाच्या डोंगरात (SIMEN MOUNTAINS) गेलाडा या बबून जातीची माकडे राहतात. या माकडाना विशिष्ट प्रकारचे अन्न अधिक पसंत असते. उदा. GRASS LEAVES गवताची पाने. हे अन्न वर्षातील काही महिने मिळण्याबाबत अडचण असते. उन्हाळ्याच्या दिवसात गवतात असलेल्या द्रव पदार्थांचे बाष्पीभवन झाल्याकारणाने गवत सुकून जाते. हे सुकलेले गवत खाल्यास ते पचवयास कठीण असते. *प्रा. डनबार* या प्राणिशास्त्रज्ञांना संशोधन करताना असे आढळून आले की उन्हाळ्याच्या या गेलाडा माकडाना बद्धकोष्ट होतो. या रोगापासून या माकडाना चांगलाच त्रास होतो. परंतु उन्हाळ्याच्या शेवटी शेवटी रानटी गुलाब बहरास येऊन, या गुलाबाच्या झाडाना फळेही येतात. या फळाना इंग्रजी रोझहिप (ROSEHIP) हे नाव आहे. ही फळे मिळविण्यासाठी ही माकडे आपआपसात झगडतात, त्याबद्दल स्पर्धा करतात आणि अशा प्रकारे ती एकदा हस्तगत केल्यानंतर, ती प्रचंड प्रमाणात खाऊन फस्त करतात. स्थानिक लोकांबरोबर ही फळे मिळवताना, त्याना स्पर्धा करावी लागते. या माकडानी ही फळे खायला सुरुवात केल्यानंतर त्यांना बद्धकोष्टतेपासून होणारा त्रास नाहीसा होतो. फळांचा हा मोसम होऊन गेल्यानंतर सुमारे महिना भराने पाऊस पडतो, व त्यानंतर गवत पुन्हा हिरवेगार व लुसलुशीत होते. पण मध्यंतरीच्या काळात सुकलेल्या गवतावरच या माकडाना गुजराण करणे भाग असते. परंतु ही फळे त्यानी खाल्लेली असल्याकारणाने, त्याना बद्धकोष्टतेचा त्रास होत नाही. रोझहिप्स या फळात 'क' हे जीवनसत्व फार मोठ्या प्रमाणात आहे आणि हे जीवनसत्व बुद्धकोष्टतेतून मुक्तता करून देण्याच्या कामात फारच परिणामकारक आहे.

आणखी एक उदाहरण – हे देखील पुन्हा एकदा उंदीर या प्राण्यासंबंधी आहे. या जगाच्या वागणुकीत नेहमी नियमितपणे घडणाऱ्या अनेक गोष्टी आहेत. सरतेशेवटी या नियमितपणासंबंधी माहिती प्राप्त करून घेण्याच्या एखाद्या प्राण्याच्या क्षमतेवरच त्याचे जीवन अवलंबून असते. याचे कारण असे आहे की, माहिती आधारभूत धरून, त्याला सर्वसाधारण असे वागणूकीचे काम चलाऊ नियम बसविता येतात. या नियमांच्या मदतीने भविष्यकाळात काय होईल याचे त्यामानाने अचूक असे भाकीत, त्याला वर्तविता येते. नेमक्या याच मुद्याचा





अनुक्रमणिका

पडताळा पहाण्यासाठी टोनी डीकिनसन (TONI DIKINSON) आणि त्यांचे सहकारी यानी एक प्रयोग मालिका सिद्ध केली होती. या प्रयोगांचे वर्णन येणेप्रमाणे. एक T (टि) आकाराचा व्यूह. हा व्यूह पार करून गेले की, मग अन्नाच्या रूपाने बक्षिसाची प्राप्ती होणार असते. या व्यूहःत तशी गुंतागुंत अजिबात नसते. उंदीराने डावीकडे जायचे की उजवीकडे जायचे हेच ठरवावयाचे असते. याबाबतच्या एका साध्या कामचलाऊ नियमाचे शिक्षण या उंदीराना देण्यात आले होते. हा प्रश्न सोडविण्याबाबत उंदराला जे शिक्षण देण्यात येते. त्या शिक्षणाचा काळ वाढविला वा कमी केला, तर त्याचा परिणाम काय होतो, हे जाणून घेण्यात हा प्रयोग करणाऱ्यांना अधिक दिलचस्पी होती. उंदीरांच्या दोन गटाना या प्रश्नाची सोडवणूक करण्याबाबत, वेगवेगळया कालावधीचे शिक्षण देण्यात आले होते. एका गटाला जितका काळ शिक्षण देण्यात आले होते, त्यापेक्षा अधिक काळ दुसऱ्या गटाला शिक्षण देण्यात आले. मग या दोन्ही गटांची, ज्या कामचलाऊ नियमांचे त्याना शिक्षण देण्यात आले होते. तो नियम उलटा करून त्यांची परीक्षा घेण्यात आली. उदा. उजव्या बाजुला की मग अन्नप्राप्ती हा नियम शिकविण्यात आला असला, तर अता डाव्या बाजुला वळले की, मग अन्नप्राप्ती होणार होती. प्रयोगांनी असे आढळून आले की, ज्या गटाला या प्रश्नाची सोडवणूक करण्याबाबत कमी काळ शिक्षण मिळाले होते. त्या गटाने जास्त काळ शिक्षण ज्या गटाला मिळाले होते. त्या गटापेक्षा अधिक झटकन प्रतिसाद दिला. त्याला या नव्या परिस्थितीने तो बदललेला कामचलाऊ नियम झटकन आत्मसात करता आला.

*डीकीनसन* यानी या प्रयोगाबाबत येणेप्रमाणे प्रतिपादन केलेले आहे. त्यांच्या मते ही जी तफावत आढळून आली व या प्रयोगात मिळालेल्या इतर माहितीद्वारा एकच संभाव्य व संयुक्तिक असा निष्कर्ष उपलब्ध आहे. या उंदीरासमोर जेव्हा एका नवा प्रश्न आला, तेव्हा त्याना या प्रश्नासंबंधी विचार करणे प्राप्त होते. परंतु या प्रश्नाला योग्य असा प्रतिसाद कोणता हे एकदा त्यानी शिकून घेतल्यानंतर, त्या प्रतिसादाचा एक कामचलाऊ नियम बनतो. कालांतराने या नियमाचे रूपांतर अशा सवयीत होते की, त्याबाबत त्याना विचार करावा लागत नाही. प्रश्नाला सामोरे जावे लागले की, त्याला योग्य असा प्रतिसाद ते आपोआपच देतात. थोडक्यात या प्रश्नाची सोडवणूक करण्यासाठी योग्य प्रतिसाद काय हे आठवण्याच्या कामात, त्याना वेळ व्यर्थ घालवावा लागत नाही. परंतु एकदा हा नियम शिकल्यानंतर व तो फार काळ घोटून घेतल्यानंतर, त्याचे रूपांतर अशा एका ठोकळेबाज सवयीत झाले म्हणजे मग या सवयीचा त्याग करणे हे कितीतरी अधिक कठीण होऊन बसते.

या प्रतिपादनावरून, तुलनात्मकदृष्ट्या विचार करीता या अशाच परिस्थितीत मानव या प्राण्याच्या बाबतीत जे काय घडते ते फारसे वेगळे नसते. या संबंधात अनेक समांतर अशी उदहारणे दाखविता येतील हे स्पष्ट आहे. आपण मोटार गाडी चालविण्यास शिकतो. तेव्हा सुरुवातीला आपण जे काही करीत असतो, त्यावर आपणास फार मोठ्या प्रमाणावर लक्ष केंद्रित करावे लागते. तथापि कोणत्या वेळी कशा प्रकारचे वर्तन करावयाचे हे काही

कालावधीनंतर अगदी सवयीचे होते. याचा अर्थ आपण त्याबद्दल काहीच विचार न करता, ते वर्तन आपोआपच करतो. आपले लक्ष आपण काय करीत आहोत यावर केंद्रित झालेले नसते. उदा. आपण एकीकडे संभाषण करीत असताना गाडी चालवितो. कधी आकाशवाणीवरचे कार्यक्रम ऐकतो. वेळप्रसंगी आजुबाजूची वनराजी पाहतो. हे एकीकडे करीत असताना गाडी योग्य प्रकारे हाकीत असतो. परंतु या नेहमीच्या सवयीत जर का मोठा बदल झाला. तर मग आपण जी काही हालचाल करणार असतो, त्यातील प्रत्येक हालचाल करण्यासाठी आपणास फारच काळजीपूर्वक विचार करणे भाग पडते. (उदा. भारतीय मनुष्य अमेरिकेत गाडी चालवू लागला की त्याला हा अनुभव येतो. भारतात वहाने डाव्या बाजूने जातात. अमेरिकेत ती उजव्या बाजूने जातात. या नव्या परिस्थितीशी जुळवून घेताना त्याला प्रतिसाद देणे प्रथम कठीण जाते) आपोआप– एक सवय– यासारखे गाडी चालविणे हा जो भाग असतो, त्यावर आपणास इत:पर भिस्त ठेवता येत नाही.

विज्ञान म्हणजे काय? विज्ञानाची प्रकृती म्हणजे काय? त्याची वैशिष्टें कोणती हे आपण प्रथम पाहिले. त्यानंतर फक्त पाश्चिमात्य समाजातच विज्ञान शक्य आहे आणि तेथेच ते बहरते असे नाही. 'विज्ञान पूर्व' मानवी समजातील दैनंदिन जीवनातही आपणास ते आढळते याची आपण नोंद घेतली. यानंतर या लेखात मानवाव्यक्तिरिक्त इतर प्राण्यातही ही वैशिष्टें आढळतात, असे दाखवून मूळ विवेचन आणखी थोडे पुढे नेलेले आहे. हे करीत असताना 'पाकक्रिया विज्ञाना'वरच खास करून भर देण्यात आलेला आहे. विज्ञानात ज्या मुलभूत प्रक्रिया अंतर्भूत आहेत त्या एखाद्या विशिष्ट संस्कृतीतेच वैशिष्ट आहे, अगर त्या विशिष्ट संस्कृतीतच त्या आढळून आल्यानंतर ती एक जगावेगळी गोष्ट आहे असे मानण्याचे कारण नाही. याउलट विज्ञान ही सर्वच प्रगत प्राणीसृष्टीची प्रकृती आहे व ती विश्वात्मक आहे.

सर्व सजीव प्राण्यांच्या जीवनात अनुभवजन्य विज्ञान हे काही प्रमाणात अंगभूत असा भाग आहे, असे येथवरच्या प्रतिपादनाचे सार आहे. 'अनुभवजन्य' विज्ञानाच्या अनुरोधाने वागण्याची क्षमता असली म्हणजे मग या जगात कितीतरी अधिक परिणामकारकतेने वावरणे प्राण्याना शक्य होते. सर्वसामान्यपणे, आपणास भाकीते वर्तविता येत नाहीत अशा परिस्थितीत निर्माण होणाऱ्या प्रश्नांना ठोकळेबाजपणे प्रतिसाद न देता लवचिकपणे तो देता येण्याची क्षमता, अनुभवजन्य विज्ञानापासून प्राप्त होते. एवंच विज्ञान म्हणजे आपणा सर्वांनाच ज्याचा खरोखरीच चांगला परिचय आहे ती शिक्षण घेण्याची साधी प्रक्रिया. 'विज्ञान' ही प्रक्रिया आहे. तिच्यात काही विशिष्ट सिद्धांत अंतर्भूत आहेत. विज्ञान या प्रक्रियेचा वापर करून काही व्यक्तिनी काढलेले निष्कर्ष हे विशिष्ट सिद्धांत होत आणि विज्ञानाची प्रकृती म्हणजे या साऱ्या गोष्टी अशी समजून करून घेणे चुकीचे आहे. अशी गल्लत केली की मानव या प्राण्याव्यक्तिरिक्त इतर प्राणी अगर पाश्चिमात्य संस्कृती सोडून इतर संस्कृती या प्रक्रियेत सामील नसतात, असे प्रतिपादन करण्यात त्याचा परिणाम होतो.

पण विज्ञान ही प्रक्रिया इतकी यशस्वी ठरण्याचे कारण?

---






अनुक्रमणिका

# विज्ञान – तंत्रविज्ञान – आहार

## आपल्या आहारातील बदल

– सौ. सुमती जोशी

विसावे शतक संपत आले आहे. एकविसाव्या शतकाची नांदी सुरू झाली आहे. विसाव्या शतकाला निरोप देताना अनेक ज्ञानशाखांतील तज्ज्ञ त्या संपूर्ण शतकाचा विविध अंगांनी आढावा घेण्याचा प्रयत्न करतील. पण प्रस्तुत लेखांत विसाव्या शतकाच्या प्रारंभी भारतीयांचा आहार कसा होता, कालानुक्रमे त्यात कोणते बदल झाले आणि या बदलाची कारणमीमांसा काय होती इत्यादी गोष्टींचा विचार केला आहे. मागील शतकातील इतिहासाचा आढावा घेऊन मानवाच्या आहारात कसकशी स्थित्यंतरे होत गेली हे अभ्यासणे हा प्रस्तुत लेखाचा उद्देश आहे.

समाजाचा इतिहास कसा घडतो याबद्दल इतिहासकारांनी आपली मते मांडली आहेत. त्यातील काही प्रमुख इतिहासकारांची मते आता पाहू. इतिहासाचार्य विश्वनाथ काशिनाथ राजवाडे यांनी इतिहास या विषयाबद्दलच्या मूलभूत संकल्पना स्पष्ट केल्या आहेत. "कोणत्याही राष्ट्राचा इतिहास लिहिताना तेथील धर्म, नीती, विद्या, समाज, व्यापार, कृषी, कलाकौशल्य, कायदेकानून इत्यादी अनेक गोष्टींचा कालानुक्रमे सप्रमाण विचार करावा लागतो. इतिहासात स्थल, काल आणि व्यक्ती या त्रयींची सांगड घालावी लागते." असे त्यांचे मत होते. विविध बौद्धिक स्तरातील अनेक व्यक्ती संघटित होऊन समाज तयार होतो. अत्युच्च बौद्धिक पातळी असणाऱ्या व्यक्ती प्रत्येक समाजात अल्पसंख्य असतात. सर्वसाधारणपणे अशा व्यक्ती आपल्या बौद्धिकतेला संशोधनाची अथवा कार्याची जोड देऊन काळाच्या पटलावर आपला ठसा उमटवतात. बहुजन समाजातील इतर अनेक व्यक्ती समाजाच्या जडणघडणीतील आपला खारीचा वाटा उचलीत असतात. म्हणूनच सामाजिक इतिहासात लोकोत्तर कार्य केलेल्या महान व्यक्तींबरोबर खारीचा वाटा उचलणाऱ्या लहान व्यक्तींचाही समावेश करणे आवश्यक आहे.

अशाच प्रकारचे विचार आर. एच्. टॉनी (Tawney) (इ. स. १८८० ते १९६२) (लंडन स्कूल ऑफ इकॉनॉमिकस येथे प्राध्यापक) यांनीसुद्धा व्यक्त केले होते. ते म्हणतात, "राज्यातील सरकार समाजसांस्कृतिक जाळे विणत नाही. ते जाळे विणत असतात त्या समाजातील सामान्य नागरिक. राजा आणि प्रजा यांच्यामधील संबंधांच्या धाग्यांनी हे जाळे विणले जात नाही. तर त्याकरिता सामान्यजनांच्या निर्मितीक्षम कार्यशक्तीच्या अगणित नाजूक तंतुंची गरज असते."



अनुक्रमणिका

फ्रेंच इतिहासकार फर्नांद ब्रॉदेल (जन्म १९०२) याने १९५८ साली लिहिलेल्या एका ऐतिहासिक लघुनिबंधात 'हिस्टॉरिकल टाइम' या संकल्पनेचा अर्थ स्पष्ट केला आहे. कालानुक्रमे घडलेल्या घटनांच्या आधारे इतिहासलेखन करणे ही पारंपरिक पद्धत सर्वांनाच ठाऊक असते. पण ब्रॉदेलच्या मते या ठळक व सहज नजरेत भरणाऱ्या घटनांच्या खालून अनियंत्रित ऐतिहासिक कालाचा एक प्रवाह वाहत असतो. घटना या गजबजाट व झगमगाट निर्माण करणाऱ्या असल्या तरी हा प्रवाह शांत व अप्रकाशित असतो. म्हणून संपूर्ण वास्तवाचे आणि इतिहासाच्या जटिल घडामोडींचे दर्शन होण्याकरता इतिहासकाराला प्रदीर्घ कालखंडाचा विचार करणे आवश्यक ठरते. हा प्रदीर्घ कालावधी दहा वर्षे, वीस वर्षे, अर्धशतक किंवा संपूर्ण शतक व्यापणारा असेल. या काळाला ब्रॉदेलने 'हिस्टॉरिकल टाइम' असे म्हटले आहे. काळ ही आपल्यावर नियंत्रण ठेवणारी, आपला विविधरंगी वैयक्तिक काळ आपल्यापासून दूर घेऊन जाणारी अशी एक बाह्यशक्ती आहे. सामाजिक आणि सांस्कृतिक बदल अतिशय संथ गतीने होत असतात. म्हणून अशा बदलांचा विचार करताना प्रदीर्घ कालावधीचा सम्यक विचार करणे आवश्यक आहे. भारतीयांच्या आहारातील बदल अभ्यासताना आपणही या लेखात ब्रॉदेलच्या 'हिस्टॉरिकल टाइम' या संकल्पनेचा आधार घेणार आहोत.

माणसे इतिहास घडवतात, त्याची त्यांना स्वत:ला जाणीवही नसते. माणसाचे शास्त्रीय नाव 'होमो सॅपियन्स' – होमो म्हणजे माणूस आणि सॅपियन म्हणजे बुध्दिमान ! इतर प्राण्यांशी तुलना करता होमो सॅपियन्सना त्यांच्या शरीराच्या आकाराच्या तुलनेत खूप मोठ्या आकाराचा आणि प्रचंड बुध्दिमत्तेचे द्योतक असलेला मेंदू लाभला. होमो सॅपियन्सला जगण्याकरता काही करणे आवश्यक होते. आपल्याला लाभलेली बुद्धिमत्ता आणि भौगोलिक परिस्थिती या दोन्हीच्या मिलाफातून माणूस आपल्याला लागेल ते व शक्य असेल ते अन्न जमिनीतून निर्माण करू लागला. अन्न, वस्त्र, निवारा या मानवाच्या प्राथमिक गरजांपैकी 'आहार' ही सर्वात महत्त्वाची. कारण त्या आहारावरच मानवाची शारीरिक आणि काही प्रमाणात बौद्धिक वाढ अवलंबून असते. मानवाचा आहार कसकसा बदलत गेला यावरूनसुद्धा त्याचा इतिहास समजतो.

कोणत्याही देशातील माणसांचा आहार तेथे कोणत्या गोष्टी उपलब्ध आहेत यावर अवलंबून असतो. ही उपलब्धता दोन प्रकारची असते. सभोवतालच्या परिसरातील हवामान, जमिनीचा कस, पाऊसपाणी इत्यादी भौगोलिक परिस्थितीनुसार तेथे जे निर्माण होते, त्या अन्नपदार्थाचा तेथील रहिवाशांच्या आहारात सहजच समावेश होतो. उदा. एखाद्या प्रदेशात जी धान्ये, कडधान्ये, भाज्या, फळे, कंद निर्माण होतात, त्यापासून माणसे कल्पकतेने चविष्ट खाद्यपदार्थ तयार करतात. पण जी तृणधान्ये, कडधान्ये, भाज्या, फळे त्या प्रदेशात निर्माण होत नाहीत, त्या सर्व वस्तू इतर प्रदेशातून आयात करता येतात. असे आयात केलेले अन्नघटक जर सहजी मिळण्याची व्यवस्था झाली तर माणसे ते पदार्थ आपल्या आहारात





अनुक्रमणिका

अवश्य अंतर्भूत करतात. परंतु दळणवळणाची साधने जोपर्यंत निर्माण झाली नव्हती तोपर्यंत बाहेरून फारसे काही खाद्यपदार्थ येण्याची शक्यताच नव्हती. त्यामुळे पंचक्रोशीत अथवा नजिकच्या प्रदेशात जे निर्माण होई त्यावरच तेथील माणसांचा आहार ठरत असे.

जमिनीतून निर्माण होणाऱ्या अन्नालासुद्धा ऋतुकालाच्या मर्यादा असतात. कोणत्या ऋतूत कोणते खाद्यघटक आपल्या भूमीत निर्माण होतात, हे अनुभवाने माणसांना ठाऊक असे. त्या घटकांपासून माणसे आपल्या रुचीप्रमाणे खाद्यपदार्थ बनवू लागली. त्यासाठी भाजणे, उकडणे, शिजवणे, तळणे, खारवणे, पाकवणे, वाळवणे यांसारख्या अनंत पद्धतींचा शोध माणसांनी आपल्या अनुभवाच्या व बुध्दिमत्तेच्या जोरावर लावला. 'विविधता' हा मानवी मनाचा स्थायीभाव असल्यामुळे त्याच मूळ खाद्य घटकांचा उपयोग करून आपल्या आवडीनुसार मानवाने स्वादिष्ट खाद्यपदार्थांच्या निर्मितीस सुरुवात केली. पदार्थ शिजवण्याच्या नुसत्या पद्धतीत बदल केला तरी पदार्थाची चव बदलते हे अनुभवाने माणसाच्या लक्षात आले. वांगे शिजवून त्याची भाजी वेगळी लागते आणि तेच वांगे भाजले तर त्याची चव बदलते !

कित्येक ठिकाणी काही भाज्या-फळे यासारख्या नाशिवंत पदार्थाचे अमाप उत्पादन होई. यापैकी काही हिस्सा वापरला गेला तरी गरजेपेक्षा अधिक प्रमाणात असलेली फळे आणि भाज्या टिकवण्याची गरज निर्माण झाली. तेव्हा हे पदार्थ टिकविण्याच्या विविध पद्धती मानवाने विकसित केल्या. मीठ, साखर, मसाल्याचे पदार्थ यात पदार्थ टिकविण्याचा गुणधर्म आहे हे अनुभवाने मानवाच्या लक्षात आले. म्हणून फळांचे मुरांबे करण्यात येऊ लागले. काही भाज्या मीठ आणि सौरशक्तीचा उपयोग करून राखल्या जाऊ लागल्या. सुगीच्या दिवसात केलेले असे टिकाऊ पदार्थ अन्नघटकांच्या टंचाईच्या काळात हुकमी एक्क्यासारखे उपयोगी ठरू लागले !

मानवाचा आहार ठरविणाऱ्या उपलब्धता आणि रुची या दोन घटकांना 'अनुभव' या तिसऱ्या घटकाची महत्त्वाची साथ असते. विविध खाद्यघटकांपासून भिन्न भिन्न रुचीचे व स्वादाचे अनेक खाद्यपदार्थ तयार केले तरी कोणते पदार्थ खाल्ल्यामुळे आपल्याला बरे वाटते, कोणत्या पदार्थांमुळे आपली प्रकृती सुदृढ राहाण्यास मदत होते, उन्हाळा, पावसाळा आणि हिवाळा या ऋतुमानात कोणता आहार आपल्या प्रकृतीला मानवतो हे अनुभवाच्या आधारावर माणूस ठरवतो. कोणते पदार्थ खाल्ल्यानंतर आपल्याला अस्वस्थ वाटते, कोणते पदार्थ आपल्याला सोसत नाहीत याबद्दलचे ठोकताळे प्रत्येक माणूस आपल्या मनाशी निश्चित करीत असतो. असे अनुभवजन्य ज्ञान अनेक पिढ्यांत संक्रमित होत असते. स्वानुभवाबरोबर दुसऱ्याच्या अनुभवातूनही माणसे शिकत असतात. एखाद्या प्रदेशात परक्यांचे राज्य आले तर हे राज्यकर्ते आपला आहार, राहणीमान आणि सांस्कृतिक पद्धती एतद्देशीय समाजात रुजवतात आणि साहजिकच तेथील रहिवासी राज्यकर्त्यांचे अनुकरण करतात. यामुळे एतद्देशीयांच्या आहारात बदल होतो. याउलट एखाद्या देशातील राज्यकर्ते युद्धाच्या निमित्ताने



अनुक्रमणिका

दूरदेशी जातात. तसेच व्यापाराच्या निमित्ताने व्यापारी देशोदेशी जातात आणि तेथील नवनवीन खाद्यपदार्थांचा शोध घेऊन ते आपल्याबरोबर मायदेशी आणतात. यामुळेसुद्धा माणसांच्या आहारात बदल होत राहतात. अशा तऱ्हेने उपलब्धता, रूची आणि अनुभव या त्रयीवर माणसाचा आहार ठरत असतो.

विज्ञानाचा विकास हा मानवी बुद्धिमत्तेच्या विकासाचा एक भाग आहे. संशोधक नवनवीन प्रयोग करतात. त्याचे अवलोकन करून निष्कर्ष काढतात आणि मग ते निष्कर्ष वैज्ञानिक सिद्धान्त अथवा सूत्ररूपात मांडतात. कित्येक वेळा अशा सिद्धान्तामुळे मानवांनी अनुभवांनी बांधलेले ठोकताळे किती बिनचूक होते याची खात्री पटते. हे स्पष्ट करण्यासाठी एक उदाहरण घेऊ.

आपला देश उष्णकटिबंधात येतो. या हवामानात, विशेषत: दक्षिण भारतात लवंग, मिरी, दालचिनी, वेलची, मोहरी, हळद, तिखट, जिरे, शहाजीरे, तमालपत्र, आले, लसूण यांसारख्या अनेक मसाल्याच्या पदार्थांचे उदंड उत्पादन होते. साहजिकच भारतीय खाद्यपदार्थात या मसाल्याच्या पदार्थांचा सढळ हाताने वापर केला जातो. या मूळ मसाल्याच्या पदार्थांचे विविध प्रमाणात एकत्रिकरण करून अगणित प्रकारचे मसाले भारतीयांनी तयार केले आणि आपल्या रूचीनुसार विशिष्ट मसाले वापरून चविष्ट, खमंग, चटपटीत खाद्यपदार्थ तयार करू लागले. मसाल्याच्या पदार्थांमुळे पदार्थ अधिक रुचकर होतात हे अनुभवाने माणसाला समजले होते. 'मसाल्याच्या पदार्थामुळे खाद्यपदार्थ नासत नाहीत, उलट ते अधिक काळ चांगल्या स्थितीत राहतात' हा मसाल्यांचा आणखी एक उपयोग माणसाच्या लक्षात आला होता. म्हणून पदार्थ टिकवण्यासाठीच मसाल्याच्या पदार्थांचा वापर वर्षानुवर्षे होत आला आहे. उन्हाळ्यात पदार्थ लवकर खराब होतात कारण खाद्यपदार्थ नासवणारे जिवाणू आणि कवके (Fungi) याच्या वाढीसाठी हे तापमान अनुकूल ठरते. जिवाणू आणि कवकांच्या वेगाने होणाऱ्या वाढीमुळे पदार्थ खराब होतात हे शास्त्रीय कारण विज्ञानाच्या अभ्यासामुळे आता समजले असले तरी मानवाने आपल्या बुद्धिमत्तेच्या आणि अनुभवाच्या जोरावर हे आडाखे बसवले होते.

विज्ञानात आता रेणवीय स्तरावर संशोधन चालू आहे. अमेरिकेतील कॉर्नेवेल युनिव्हर्सिटीत जेनिफर बिलिग आणि पॉल शेरमन यांनी एक शोधनिबंध जीवशास्त्रावरील त्रैमासिकात नुकताच प्रसिद्ध केला. प्रत्यक्ष प्रयोग करून या उभय शास्त्रज्ञांनी काढलेले निष्कर्ष मसाल्याच्या पदार्थांच्या उपयोगांवर प्रकाशझोत टाकणारे आहेत. मसाल्याच्या वनस्पती अत्यंत प्रभावी प्रतिजैविक रसायने निर्माण करतात. या प्रतिजैविक रसायनांमुळे खाद्यपदार्थ नासवणाऱ्या कित्येक जिवाणू आणि कवकांचा नाश होतो, तर काही जिवाणू आणि कवकांची वाढ रोखली जाते. कांदा, लसूण आणि मिरची या तीन मसाल्यांमुळे निर्माण होणाऱ्या प्रतिजैविक रसायनांमुळे ७५ ते १०० टक्के जिवाणूंच्या वाढीवर मर्यादा पडतात असे निष्कर्ष अन्नपदार्थांवर संशोधन करणाऱ्या सूक्ष्मजंतुजीवशास्त्रज्ञांनी काढले आहेत.

म्हणूनच लोकांनी आपल्या पाककृतीत मसाल्याच्या पदार्थांचा सढळ हाताने वापर करावा असा सल्ला वैज्ञानिक देत आहेत. अशा तऱ्हेने वैज्ञानिक संशोधनाने भारतीयांच्या अनुभवजन्य ठोकताळ्यांवर शिक्कामोर्तब केले आहे.

विसाव्या शतकाच्या पूर्वार्धात आपल्यावर ब्रिटिशांचा अम्मल होता. साहजिकच राज्यकर्त्यांच्या खाण्यापिण्याच्या सवयी, त्यांचा पोषाख, रीतीरिवाज, विचारपद्धती यांसारख्या अनेक गोष्टींचा भारतीय समाजमनावर कळत नकळत परिणाम होत गेला. जेत्यांची संस्कृती चोरपावलांनी आपल्याकडे आली; आणि आपल्या संस्कृतीचा एक भाग बनली. जेत्यांच्या भूमीत विज्ञानाची प्रगती झालेली होती. नवनवीन शोध लागले होते. अत्याधुनिक तंत्रविज्ञान तेथे निर्माण झाले. इंग्लंडमधील लोकांच्या आहारात बदल घडवून आणण्यास ज्ञानविज्ञानातील ही प्रगती कारणीभूत ठरलेली आहे. तीच ज्ञानगंगा भारताकडे आली. विसाव्या शतकातील भारतीयांच्या बदलाचे रहस्य या ज्ञानगंगेत आहे. म्हणूनच भारतीयांच्या आहारातील बदल पाहण्यापूर्वी इंग्रजांच्या आहारात विसाव्या शतकाच्या पहिल्या अर्धशतकात काय बदल झाले हे पाहणे उचित होईल.

इंग्रजांच्या आहारातील बदल पाहण्याचे आणखी एक महत्त्वाचे कारण आहे. इंग्लंडच्या समाज सांस्कृतिक इतिहासात इंग्रजांच्या आहाराविषयीच्या नोंदी अगदी बारीकसारीक तपशीलासकट केलेल्या आढळतात. पाश्चात्त्यांच्या अनेक अनुकरणीय गुणांपैकी हा महत्त्वाचा गुण. सर्वसामान्य नागरिक आणि फारसे शिक्षण न घेतलेल्या गृहिणीसुद्धा रोजनिशी लिहीत. याचे उत्तम उदाहरण म्हणजे सुप्रसिद्ध विज्ञानलेखक एच्. जी. वेल्सची आई ! त्याची आई एका श्रीमंत घरी दाई म्हणून काम करीत असे. ती नियमाने रोजनिशी लिहीत असे. या रोजनिशीमुळेच एच्. जी. वेल्सच्या बालपणातील अस्पष्ट स्मृतींना उजाळा मिळाला आणि तत्कालीन सत्य परिस्थिती विश्वसनीय स्वरूपात आपल्या 'Experiments in Autobiography' या आत्मचरित्रात गुंफता आली. अशाच प्रकारच्या नोंदी सर्व स्तरातील इंग्रजांनी केल्यामुळे आपल्याला इंग्रजांच्या आहारातील बदलाचा आलेख काढणे शक्य होते. याउलट भारतीय इतिहासात आहाराविषयांच्या पद्धतशीर नोंदी कोठेही आढळत नाहीत. त्यामुळे विसाव्या शतकातील भारतीयांच्या आहाराविषयीचा लेखी पुरावा सापडत नाही.

विसाव्या शतकाच्या प्रारंभी इंग्रजांचा आहार कसा होता हे अभ्यासण्यासाठी आपल्याला इंग्रजांनी केलेल्या नोंदी उपयुक्त ठरतात. वेगवेगळ्या सांपत्तिक स्तरातील अनेक कुटुंबांच्या संपूर्ण आठवड्याच्या आहाराचे वेळापत्रकच तत्कालीन समाज इतिहासकारांनी लिहिलेले आढळते. सर्वसामान्य नागरिकांच्या आहारात न्याहरीच्या वेळी ब्रेड, बटर, अंडी, चहा किंवा दूध असे. अर्थात हा चहासुद्धा इंग्रजांचे भारताशी व्यापारी संबंध प्रस्थापित झाल्यानंतर इंग्लंडमध्ये पोचला. दुपारच्या जेवणात बटाटे, ब्रेड, बटर, चीज, कधीकधी सॅलडच्या स्वरूपात भाज्या. सांपत्तिक स्थितीनुसार थोडे मांस याचा समावेश असे. कित्येक कुटुंबात फक्त घरातील कर्त्या पुरुषालाच मास मिळत असे, इतरांच्या वाट्याला ते येत नसे. रात्रीच्या

जेवणात याच खाद्यपदार्थांची पुनरावृत्ती होई. बार्ली, राय या तृणधान्यांपासून गृहिणी स्वत: घरी ब्रेड तयार करीत. गहू व राय यांच्या मिश्र पीठाला मस्लीन म्हणत. कधी कधी या मस्लीनचा ब्रेड तयार करण्यात येई. इंग्लंडमधील चर्च ही फक्त प्रार्थनागृहे नसत. त्याभोवतीच्या मोकळ्या जागेत भाज्या आणि फळांची लागवड करीत. अर्थात हे उत्पादन फारच थोड्या प्रमाणावर होत असल्यामुळे सामान्य जनतेच्या आहारात त्याचे प्रमाण अत्यल्प असे. अती शीत हवामानामुळे हिवाळ्याचे ३-४ महिने इंग्लंडमध्ये काहीच निर्माण होत नसे. हिवाळ्यात चाऱ्याच्या अभावी दूध आणि दुग्धजन्य पदार्थांचेही दुर्भिक्ष असे. वाहतुकीची अद्ययावत साधने नसल्यामुळे दूरवरून हा माल आयात करणे शक्य नव्हते. एकंदरीत विसाव्या शतकाच्या प्रारंभी सामान्य ब्रिटिश नागरिकाचा आहार 'चौरस व समतोल' नव्हता. फळे व भाज्या यांचा कमी प्रमाणातील वापर आणि हिवाळ्यात त्यांचा संपूर्ण अभाव यामुळे जीवनावश्यक व्हिटॅमिन्स आणि क्षार यांचे आहारातील प्रमाण नगण्य असे. साहजिकच सामान्य नागरिकांची प्रतिकारशक्ती पार लयाला जाई. परिणामत: इंग्रजांना कोणत्याही रोगजंतुंचे संक्रामण झटकन होई. हिवाळ्याअखेर इंग्लंडमध्ये अनेकदा साथीच्या रोगांचा प्रादुर्भाव होई. अे व्हिटॅमिनच्या अभावामुळे रातांधळेपणा, इतर डोळ्यांचे रोग झालेली अनेक माणसे दृष्टीस पडत. रिकेट्सने (मुडदूस) ग्रस्त झालेली अनेक लहान मुले इंग्लंडमध्ये आढळत. अनेक नागरिक 'स्कर्व्ही' या रोगाला बळी पडत. 'सी' व्हिटॅमिनच्या अभावामुळे होणारा हा रोग इंग्रजांच्या दृष्टीने फार चिंतेचा विषय होता. महिनोन्महिने सागरी सफरी करणाऱ्या इंग्रज खलाशांना रोज ताज्या भाज्या आणि फळे कोठून मिळणार? अशा खलाशांच्या रक्तवाहिन्या कमकुवत होऊन त्यातून रक्तस्राव होऊ लागे. कित्येकदा स्कर्व्हीमुळे होणारा हा रक्तस्राव प्राणघातक ठरत असे. इंग्लंडमध्ये 'स्कर्व्हीला' 'खलाशांचा रोग' असे म्हणत. या रोगावर मात करण्यासाठी इंग्रजांनी आपल्या आहारात अनेक बदल करून पाहिले. आंबट संत्री किंवा लिंबापासून तयार केलेले 'लिमी' हे सरबत दररोज घेतले तर माणसांचा या रोगापासून बचाव होतो असे अनुभवाने लोकांच्या लक्षात आले. याच अनुभवजन्य ज्ञानाच्या आधारे उत्तर ध्रुव पादाक्रान्त करावयास निघालेल्या कॅप्टन कुकने आपल्या मदतनीसांचा स्कर्व्हीपासून बचाव केला.

विसाव्या शतकात युरोपमध्ये विशेषत: इंग्लंडमध्ये विज्ञानाच्या सर्व शाखा उपशाखांमध्ये संशोधन चालू होते. हे संशोधन परस्परावलंबी तर होतेच पण ते मानवी जीवन व्यवहाराशीसुद्धा निगडित होते. या संशोधनामुळेच तेथे मानवी जीवनात स्वास्थ्य निर्माण करणारी आणि दैनंदिन जीवनात वापरण्याजोगी यंत्रे निर्माण झाली. इंग्लंडमध्ये विजेचा शोध लागला. ही वीज घराघरात पोहोचली. भौतिकशास्त्राने तयार केलेल्या विजेच्या शक्तीवर चालणाऱ्या पंपामुळेच विहीरींचे पाणी विनासायास काढता येऊ लागले. 'हायड्रॉलिक्स' या विज्ञानशाखेच्या विकासामुळे गॅल्व्हनाइज्ड पाइपमधून पाणी घराघरात पोचले. सांडपाण्यावर प्रक्रिया करून ते पाणी जवळपासच्या नदीत अथवा समुद्रात सोडण्यासाठी भुयारी गटारांची

व्यवस्था झाली. यामुळेच शहरे वसवता आली; आणि शहरांचा विकास झाला. लंडन शहरात इंग्रजांनी इ. स. १८७४ साली अंडरग्राउंड ड्रेनेज तयार केले. त्यानंतर अवघ्या दोन दशकांच्या कालावधीत स्वत:च्या सोईसाठी ही यंत्रणा इंग्रजांनी मुंबईत आणली. सार्वजनिक आरोग्य सुधारण्याच्या दृष्टीने ही घटना फार महत्त्वाची होती.

ट्रॅक्टरच्या निर्मितीमुळे शेतकऱ्याच्या श्रमशक्तीची बचत झाली. रसायनशास्त्रातील संशोधनामुळे कृत्रिम खते निर्माण झाली. जमिनीचा कस सुधारण्यासाठी ती सुलभपणे वापरण्यात येऊ लागली. वनस्पतीशास्त्रज्ञांनी पिकांवरील रोगजंतुंचा, कवकांचा अभ्यास केला. त्यांचा नायनाट करून पिकांचे रक्षण करण्यासाठी काय काळजी घ्यावी हे जैवरसायनशास्त्राने दाखवून दिले. त्यामुळे धान्य, भाज्या, फळे यांचे उत्पादन वाढले. हरितगृहांमुळे ऐन हिवाळ्यातही इंग्लंडमध्ये भाज्या व फळांची निर्मिती होऊ लागली. वैयक्तिक व सार्वजनिक स्वच्छतेचे महत्त्व विज्ञानाच्या प्रसारामुळे इंग्लिश समाजमनावर ठसवले गेले. त्याला लशीकरण आणि प्रतिजैविकांची जोड मिळाल्यामुळे इंग्रजांचे वैयक्तिक आणि सार्वजनिक आरोग्य सुधारले. दळणवळणाची अत्याधुनिक साधने निर्माण झाली. पक्के रस्ते, पूल, बोगदे यांच्या बांधणीमुळे वाहतूक गतिमान झाली. त्यामुळे भाज्या, फळांसारखा नाशिवंत माल आणि धान्य, कडधान्य, मसाले यांसारखा टिकाऊ माल इतर देशांतून इंग्लंडमध्ये सुलभपणे आयात करता येऊ लागला. विसाव्या शतकाच्या पहिल्या अर्धशतकात इंग्रजांच्या आहारात कोणते बदल झाले हे अभ्यासताना या सर्व बाबींचा विचार करणे अपरिहार्य असते. या सर्व गोष्टी प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे आहारात बदल घडवून आणण्यास कारणीभूत ठरतात.

विसाव्या शतकाच्या पूर्वार्धात पिष्टमय, नत्रयुक्त आणि स्निग्ध हे प्रमुख अन्नघटक माणसांना ठाऊक होते. परंतु व्हिटॅमिन्सविषयी मात्र पूर्ण अज्ञान होते. १९३५ च्या सुमारास इंग्लंडमध्ये फ्रेड्रीक हॉपकिन्स यांनी व्हिटॅमिन्सचा शोध लावला. "ज्या घटकांचा आहारात सूक्ष्म प्रमाणात समावेश केला नाही तर माणसे आजारी पडतात ते घटक म्हणजे व्हिटॅमिन्स" अशी सोपी सुटसुटीत व्याख्या प्रारंभी करण्यात आली. काही कालावधीनंतर व्हिटॅमिन्सचे ए. बी. सी. डी. ई. के इत्यादी पोटभेद शास्त्रज्ञांना समजले. ही व्हिटॅमिन्स कोणत्या खाद्यपदार्थात किती प्रमाणात असतात, त्यांचा आपल्याला काय उपयोग होतो आणि त्यांच्या अभावामुळे कोणते रोग होतात हे संशोधकांनी सिद्ध केले. एकंदरीत विसाव्या शतकाच्या चौथ्या दशकाने चौरस व समतोल आहाराची सूत्रे मानवजातीच्या हाती सुपूर्द केली. एकदा कारण समजल्यावर त्यावर इलाज करणेही सोपे झाले. माणसे जाणीवपूर्वक ताज्या भाज्या आणि फळे यांचा भरपूर वापर आपल्या आहारात करू लागली. अर्थात वर नमूद केलेल्या इतर अनेक वैज्ञानिक सुधारणांमुळे भाज्या-फळांची इंग्लंडमधील उपलब्धता वाढल्यामुळेच ते शक्य झाले !

आणखी एका पदार्थाने, इंग्रजांच्या आहारात बदल घडवून आणला. इंग्लंडमध्ये जे अनेक खाद्यपदार्थ आयात केले जातात त्यातला एक पदार्थ म्हणजे 'साखर'. ही साखर जेव्हा

भारतासारख्या देशातून खूप दूरवरून आयात केली जाई तेव्हा ती कमी प्रमाणात उपलब्ध होई. अर्थात तिचा भाव सामान्य नागरिकांना परवडण्यासारखा नव्हता. औषधांच्या अनुपानाच्या स्वरूपात युरोपमध्ये साखरेचा वापर होई. पण एकोणिसाव्या शतकात फ्रान्समध्ये बीटपासून साखर तयार होऊ लागली. जर्मनीने फ्रान्सचे अनुकरण केले. बीटपासून साखर तयार करणे हा सुद्धा रसायनशास्त्रातील संशोधनाचा एक भाग होता. तंत्रविज्ञानातील प्रगतीची जोड मिळाल्यामुळे मोठ्या प्रमाणावर कारखान्यात अशी साखर तयार होऊ लागली. साखर स्वस्त झाली. विसाव्या शतकात जॅम, जेली, कस्टर्ड, पुडिंग्ज, केक्स, पेस्ट्रीज कुकीज यांसारख्या पदार्थांची सर्वसामान्य नागरिकांच्या आहारात लयलूट होऊ लागली. एकंदरीत विसाव्या शतकाच्या पूर्वार्धात इंग्रजांच्या आहारात आमूलाग्र बदल झाले.

विसाव्या शतकाच्या पहिल्या अर्धशतकात राज्यकर्त्यांकडून आलेले हे ज्ञानविज्ञान आपल्या भूमीत रुजण्यास सुरुवात झाली. समाजातील ज्या स्तरात साक्षरतेचे खतपाणी घातले गेले तेथे ते विचार चांगलेच फोफावले. सुशिक्षितांनी विज्ञानाधिष्ठित विचारांचा स्वीकार केला. आहार, पोषाख, विचारपद्धती या सर्वांत हळूहळू बदल होण्यास सुरुवात झाली. हे बदल यथावकाश समाजातील सर्व स्तरात पोचले. ब्रॉदेलने म्हटल्याप्रमाणे सामाजिक बदल हे अगदी धीम्या गतीने होतात. हा विचार आहाराच्या बाबतीतसुद्धा लावता येतो कारण आहार हा एक समाज सांस्कृतिक भाग असतो. संथपणे होणाऱ्या या बदलाचे दृश्य परिणाम स्वातंत्र्योत्तर अर्धशतकात दिसू लागले. भारतातील सर्व राज्यात हे बदल कमीअधिक प्रमाणात घडून आले. गेल्या पन्नास वर्षांत झालेले बदल आपल्या डोळ्यांदेखत झालेले आहेत. या बदलांना वरील विवेचन कसे लागू पडते हे कोकणातल्या उदाहरणावरून दाखविता येते.

विसाव्या शतकाच्या पूर्वार्धात आपल्यावर इंग्रजांचा अम्मल होता. राजकीय पारतंत्र्याच्या काळात किंबहुना त्यापूर्वीसुद्धा आर्थिक दृष्ट्या कोकणी माणूस गरीब होता. वाहतुकीची अत्याधुनिक साधने विकसित झाली नव्हती. त्यामुळे बाहेरून 'शेतीमाल' कोकणात येण्याची शक्यताच नव्हती. अर्थातच कोकणातील खेड्यात किंवा पंचक्रोशीत जे शेतकीउत्पादन होई त्यावर कोकणवासियांचा आहार अवलंबून असे. या उपलब्ध पदार्थांवर विविध प्रक्रिया करून आपल्या रुचीनुसार अनेक खाद्यपदार्थ कोकणी माणूस बनवीत असे. आपला आहार ठरवताना कोकणी माणूस 'अनुभव' या अत्यंत महत्त्वाच्या घटकाची जोड देत असे.

कोकणी माणसाच्या आहारातील प्रमुख पदार्थ म्हणजे भात. न्याहारीला मऊ भात, मेतकूट, जेवताना आमटी भात आणि रात्रीच्या वेळेससुद्धा भातच ! याविषयीचा एक किस्सा प्रसिद्ध आहे. पाहुण्यांनी कोकणातील लहान मुलाला प्रश्न विचारला, "तू न्याहारीला काय खातोस?" "मऊ भात" तो मुलगा उत्तरला, त्यानंतरही दिवसभर तो मुलगा भातच जेवतो हे समजल्यावर पाहुण्यांनी पुन्हा प्रश्न केला, "अरे, सारखा भात जेवायचा तुला कंटाळा येत नाही का?" त्यावर त्या मुलांनी दिलेले उत्तर फार बोलके होते. तो म्हणाला, "कंटाळा आणि तोसुद्धा अन्नाचा ! कसं शक्य आहे ते?" कोकणातील गरिबी आणि इतर उत्पादनाचा

अभाव या उत्तरातून ध्वनीत होतो !

कोकणी माणसाच्या आहारात भाताच्या जोडीला, तांदुळापेक्षा स्वस्त असलेल्या नाचणी, पटणी (लालतांदूळ) याची भाकरी असे. पावसाळ्यात घरातील परसात पडवळ, तोंडली, शिराळी, घोसाळी, दुधी, तांबडा भोपळा यांसारख्या भाज्यांचे वेल मांडवावर चढवीत. त्यामुळे आहारात अधून मधून या भाज्यांचा समावेश असे. तसेच सांडपाण्यावर होणारे अळू प्रत्येक घरी असे. या भाज्या जेमतेम सहा महिने मिळत असत. 'कोकणात भरपूर पाऊस पडला तरी त्या पाण्याचे साठवण' करण्याची सुविधा नव्हती. धरणे, कालवे बांधले गेले नव्हते. त्यामुळे उन्हाळ्याचे चार महिने तेथे पाण्याचे दुर्भिक्ष असे. या काळात भाज्यांचे उत्पादन अजिबात होत नसे. अशा वेळी कडधान्यांच्या उसळी केल्या जात. वाल, पावटे, कुळीथ, चवळी ही कोकणातील प्रमुख कडधान्ये सुगीच्या दिवसात वाळवून भरून ठेवीत. विसाव्या शतकाच्या पहिल्या अर्धशतकात प्रेशर कुकर नव्हता. कडधान्य शिजवताना त्यात भरपूर पाणी घालून; कडधान्य शिजल्यावर हे पाणी वेगळे काढून त्यात चवीला ताक, मीठ, मिरची घालून 'कळण' तयार करीत. गरिबी आणि मर्यादित उपलब्धतेमुळे गृहिणी काटकसरीने तेवढ्याच धान्यातून दोन तोंडीलावणी तयार करीत. पडवळाच्या बिया, भोपळ्याच्या साली यांसारख्या 'टाकाऊ' पदार्थांपासून कल्पकतेने चविष्ट चटण्या करीत. काटकसर हा स्थायीभाव असल्यामुळे कोंड्याचा मांडा करणे कोकणवासियांच्या अंगवळणी पडले होते. उन्हाळ्यात भाज्या नसल्या तरी कैऱ्या आणि कोकम घरोघरी असत. कैरी अथवा ताज्या कोकमाचे सार उन्हाळ्यातील जेवणाची लज्जत वाढवीत. कोकणातील अनेक घरी शेवग्याच्या शेंगांचे झाड असे. पानागणिक येणाऱ्या शेंगा हे या झाडाचे वैशिष्ट्य. शेवग्याच्या शेंगा व पानामध्ये भरपूर प्रमाणात 'ए' व्हिटॅमिन असते. या शेंगांचे पिठले, आमटी, कढी, शेंगांची पीठ पेरून भाजी हे कोकणवासियांच्या आहारातील नित्याचे पदार्थ. उन्हाळ्यातील भाज्यांच्या दुर्भिक्ष्याला आणखी एक उपाय कोकणवासियांजवळ होता; तो म्हणजे फणस. फणसाची भारत हीच जन्मभूमी असल्यामुळे कोकणात घरोघरी फणसाची झाडे असत. कच्च्या फणसाची भरपूर नारळ घातलेली आणि खमखमीत फोडणी दिलेली भाजी म्हणजे कोकणी माणसाचे पक्वान्नच ! उन्हाळ्याचे दोन तीन महिने ही भाजी घराघरात पुन:पुन्हा करण्यात येई. शहरवासियांच्या सुखवस्तू घरातील मंडळींना एखादा पदार्थ वरचेवर झाला तर लगेच 'कंटाळा' येतो. पण विसाव्या शतकाच्या पूर्वार्धातील कोकणवासियांना अशी 'मिजास' बाळगण्याची चैन परवडण्यासारखी नव्हती.

उन्हाळ्यात सहजी उपलब्ध असलेले स्वस्त उत्पादन म्हणजे कच्च्या कैऱ्या. या कैऱ्यांचे गारवा देणारे पन्हे, उन्हाळ्याचा ताप सुसह्य करीत. साखर अथवा गूळ वापरून केलेले मुरांबे सुगीचे दिवस संपल्यावर उपयोगी ठरत. मोहरी, तिखट, हळद, हिंग, मेथी असे तऱ्हतऱ्हेचे मसाल्याचे पदार्थ वापरून केलेली विविध लोणची भाताला तोंडीलावणे म्हणून फारच उपयुक्त ठरत. याच्या जोडीला सांडगी मिरच्या, पोह्याचे पापड, चिकोड्या, फेण्या, डांगर

इत्यादी चविष्ट पदार्थांमुळे जेवणाची लज्जत वाढत असे !

माणूस हा उत्सवप्रिय प्राणी आहे. सणासुदीला गोडधोड करून सर्वांना खाऊ घालणे हे त्याचे प्रतीक आहे. तांदूळ आणि नारळ ही कोकणची प्रमुख उत्पादने असल्यामुळे सणासुदीला केल्या जाणाऱ्या पक्वान्नातही याच दोन पदार्थांचा सढळ हाताने वापर केलेला आढळतो. पानग्या, घावन घाटले, खांडवी, साखरभात, नारळीभात, करंज्या, मोदक, अळीव लाडू यासारखी पक्वान्ने म्हणजे उपलब्धता, रूची आणि अनुभव यावर आहार कसा अवलंबून असतो याचे द्योतक होता.

दूध हे 'पूर्णान्न' असले तरी विसाव्या शतकाच्या पूर्वार्धात त्या बाबतीत कोकणची स्थिती फारशी चांगली नव्हती. पावसाळ्यात अथवा थंडीत दुभती जनावरे बऱ्यापैकी दूध देत. पण उन्हाळ्यात पाण्याचे व चाऱ्याचे दुर्भिक्ष असल्यामुळे ही दुभती जनावरे आटत. दुधाच्या पुरवठ्याचे प्रमाण कमी होई. सर्वसामान्य कोकणी माणूस दुधदुभत्यापासून वंचित राही किंवा अपुऱ्या पुरवठ्यावर त्याला समाधान मानावे लागे.

विसाव्या शतकाच्या पूर्वार्धातील कोकणवासियांच्या आहाराचा हा आढावा मध्यमवर्गीय समाजाचे प्रातिनिधित्व करणारा असला तरी कोकणातील शेतकरी, कोळी, धनगर समाजाची परिस्थिती याहीपेक्षा हलाखीची असे. या मंडळींना नुसता भात जेवणेसुद्धा परवडत नसे. त्यामुळे कित्येकदा मूठभर तांदळाच्या पातळ पेजेवरच त्यांना आपली भूक भागवावी लागे. कोकणाला लाभलेला मोठा समुद्रकिनारा हा मात्र मच्छीमार लोकांच्या दृष्टीने वरदान होता. उदार हस्ते लुटण्यासाठी सागरी संपत्ती उपलब्ध असल्यामुळे रोजच्या कालवणासाठी मासे मिळत नाहीत असे सहसा होत नसे. परंतु शीतगृहे, कॅनिंग यासारख्या अत्याधुनिक सोयी नसल्यामुळे मासे टिकवता येत नसत. तसेच हा नाशिवंत माल दूरवर विक्रीसाठी पाठवता येत नसल्यामुळे अर्थार्जनासाठी या व्यवसायाचा उपयोग अगदी मर्यादित स्वरूपात होई.

एकंदरीत पाहता कोकणवासियांच्या आहारात विविधता नव्हती. मोसमातील आंबा, फणस या फळांखेरीज वर्षभर अन्य फळांची उपलब्धता नसल्यामुळे आहारात फळांचा समावेश नसे. उन्हाळ्यात भाज्यांचे दुर्भिक्ष असे. दूधदुभत्याचा पुरवठा फारच कमी असल्यामुळे आबालवृद्ध या पूर्णान्नापासून वंचित राहत. तरीसुद्धा आताच्या आहारशास्त्रानुसार नकळत का होईना पण कोकणी माणसाला त्याच्या पूर्वीच्या आहारातून अल्पशा व्हिटॅमिन्सचा पुरवठा होत असे. शेकटाच्या शेंगा, तांबडा भोपळा यामधील ए व्हिटॅमिन, हातसडीचे तांदूळ, मोड आलेली कडधान्ये यातून बी व्हिटॅमिन, चिंच, कैरी, कोकम, करवंदे यांसारख्या आंबट फळांमुळे सी व्हिटॅमिन अंशत: मिळत असे. समुद्रकिनाऱ्यामुळे वर्षभर उष्ण व दमट हवा, कपड्यांची गरज बेताचीच आणि गरिबीची अखंड साथ त्यामुळे कोकणी माणूस पंचा गुंडाळून शेतात कष्ट करी. उघड्या अंगाने प्रखर सूर्यप्रकाशात फिरण्यामुळे 'डी' जीवनसत्त्व त्वचेखाली तयार होई. म्हणजे स्वातंत्र्यप्राप्तीपूर्वी विसाव्या शतकाच्या पहिल्या अर्धशतकातील कोकणी माणसाचा आहार कनिष्ठ, मध्यम प्रतीचा होता,



अनुक्रमणिका

विज्ञानाने घालून दिलेल्या समतोल आणि चौरस आहाराच्या चौकटीत बसण्यासारखा तर तो निश्चित नव्हता.

विसाव्या शतकाच्या पूर्वार्धात सहज नजरेत भरणाऱ्या परिस्थितीचा आढावा आपण कोकणवासियांच्या आहाराच्या अनुषंगाने घेतला. पण ब्रॉदेलला अभिप्रेत असलेला अनियंत्रित ऐतिहासिक कालप्रवाह कोणता? इंग्रज, फ्रेंच, पोर्तुगीज यासारखे युरोपीय भारतात आले, येताना त्यांनी अनेक नवीन पदार्थ आपल्याबरोबर या भूमीत आणले आणि रुजवले. प्रबोधनकाळाचे आणि वैज्ञानिक प्रगतीचे द्योतक ठरणारे तंत्रविज्ञान त्यांनी या भूमीत आणले. या साऱ्या घटनांचा परिणाम भारतीयांच्या जीवनव्यवहारावर झाला. या घटना ब्रॉदेलच्या 'अनियंत्रित ऐतिहासिक कालप्रवाह' या संकल्पनेत बसणाऱ्या आहेत.

इंग्रजांप्रमाणे पोर्तुगीज व्यापार करण्यासाठी हजारो नॉटिकल मैल (१ नॉटिकल मैल = १८५२ मीटर) सागरी अंतर पार करून जेव्हा भारतात आले तेव्हा त्यांनी येताना अनेक नवीन पदार्थ भारतात आणले. बागाईतीचा आत्यंतिक नाद असल्यामुळे जेथे जेथे पोर्तुगीजांनी वसाहती केल्या तेथे तेथे त्यांनी त्यांच्या ओर्ता (बागा) तयार केल्या. मुंबईतील झावबाज ओर्ता (झावबाची वाडी), खोताज ओर्ता (खोताची वाडी) हे पोर्तुगीजांचेच अवशेष आहेत. मिरची, भुईमूग, साबुदाणा, पपया, अननस, चिकू, काजू, कलमी आंबे, बटाटे, रताळी असे अनेक पदार्थ पोर्तुगीजांनी भारतात आणले. 'ब्राझिल' ही जन्मभूमी असलेला काजू कोकणात, गोव्यात आणि भारताच्या पश्चिम किनारपट्टीचा 'रहिवासी' झाला. बागाईत हा आवडता छंद असल्यामुळे आंब्याच्या उत्कृष्ट जाती तयार करण्यासाठी आंब्याच्या झाडावर कलम करण्याच्या विविध पद्धती विकसित केल्या. हापूस आंब्याच्या कलमांची लागवड करण्याचा पायंडा पोर्तुगीजांनी पाडला. विसाव्या शतकाच्या पूर्वार्धात कोकणात आंबा, केळी, फणस, करवंदे यांसारखी मोजकी मोसमी फळे मिळत. पोर्तुगीजांमुळे कलमी आंबे, काजू यांची त्यात भर पडली. परंतु दळणवळणाची साधने नसल्यामुळे या नव्या पिकांची मशागत मोठ्या प्रमाणावर होत नव्हती. या फळांचे व्यापारी तत्त्वावर उत्पादन केले तरी हा नाशिवंत माल बाजारपेठेपर्यंत पोचण्याची शक्यता आणि खात्री नसल्यामुळे बागाईतदारांनी तसे उत्पादन करण्याची तसदी घेतली नाही. त्यामुळे पाश्चात्यांनी आणलेल्या अनेक नवीन पदार्थांचे ज्ञान होऊनसुद्धा विसाव्या शतकाच्या पूर्वार्धात कोकणातील माणसांच्या आहारात फारसा बदल झाला नाही. अर्थात अनेक पिकांची (पदार्थांची) माहिती होणे हे आहारातील बदलाच्या दृष्टीने टाकलेले पहिले पाऊल होते असे म्हणावयास हरकत नाही.

विसाव्या शतकाचा उत्तरार्ध म्हणजे भारतीयांच्या दृष्टीने स्वातंत्र्यप्राप्तीनंतरचा काळ. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर सरकारने अनेक पंचवार्षिक योजना आखल्या आणि भारताचा सर्वांगीण विकास घडवण्यासाठी अनेक आघाड्यांवर प्रयत्न सुरू झाले. यामुळे कोकणवासियांच्या आहारावर कसा परिणाम झाला ते पाहू.

स्वातंत्र्यप्राप्तीनंतरच्या पहिल्या दशकात कोकणातील खेड्यापाड्यात वीज पोचली. आणि

खेड्यातील जनजीवन अनेक अंगांनी उजळले. आपला देश शेतकीप्रधान; सुजलाम् सुफलाम् अशी जमीन, उत्तम हवामान, भरपूर पाऊस असे वरदान लाभलेला ! या नैसर्गिक अनुकुलनाला स्वातंत्र्यप्राप्तीनंतर आपण शास्त्रीय संशोधनाची जोड दिली. संकरित बी-बियाणे, तण नाहीशी करणारी रसायने, नैसर्गिक आणि कृत्रिम खतांचा योग्य प्रमाणात केलेला वापर, भरपूर पाणीपुरवठा, पिकांवरील कीड नष्ट करण्यासाठी योजलेले विविध उपाय, अत्याधुनिक शेतकी औजारे यासारख्या अनेक घटकांत सुधारणा झाल्यामुळे १९६० ते ७० या दशकात भारतात हरितक्रांती घडून आली. आपला देश अन्नधान्याच्या बाबतीत स्वयंपूर्ण झाला. सातारा जिल्ह्यात कोयना नदीवर मोठे धरण बांधले आणि तेथील शिवाजीसागर तलावातील पाणी सह्याद्रीच्या बोगद्यातून कोकणात पोफळी आणि कोळकेवाडी येथे आणले व तेथेचे वीज निर्माण करण्याची केंद्रे काढली. वीजनिर्मिती झाल्यावर हे पाणी कोकणातील वशिष्ट नदीत सोडल्यामुळे या नदीला बाराही महिने पाणी राहू लागले. तसेच कोकणातील गुहागर, लांजे या ठिकाणच्या पाझर तलावांना छोटे छोटे पाट काढल्यामुळे शेतीला योग्य प्रमाणात पाणीपुरवठा करता येऊ लागला. कोकणातील पिकांचे एकेरी उत्पादन अनेक पटींनी वाढले. शेतकऱ्यांची आर्थिक स्थिती सुधारल्यामुळे गायी, म्हशी यांसारखी दुभती जनावरे पदरी बाळगण्याची शेतकऱ्यांची क्षमता वाढली. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर पशुपालन केंद्रांची स्थापना झाली. प्राण्यांची देखभाल करणे या प्रगत शास्त्रांत भरपूर संशोधन झाले. सुप्रजननशास्त्रामुळे (Eugenics) उत्तम दूध देणाऱ्यां दुभत्या जनावरांच्या जाती विकसित झाल्या. हरितक्रांतीच्या जोडीला धवलक्रांती झाली. धवलक्रांतीमुळे दूध आणि दुग्धजन्य पदार्थांची उपलब्धता प्रचंड प्रमाणात वाढली. याचा कोकणवासियांच्या आहारावर परिणाम झाला.

हरित आणि धवल क्रांतीबरोबर बागाईती उत्पादनातही क्रांती घडून आली. देशी भाज्यांच्या जोडीला कोबी, फ्लॉवर, फरसबी, टॉमेटो, भोपळी मिरच्या, वाटाणा, गाजर या विलायती भाज्यांचेही अमाप पीक बागाईतदार घेऊ लागले. भाज्यांप्रमाणेच उत्तम जातीच्या रसाळ, मधुर फळांच्या उत्पादनातही स्वातंत्र्यप्राप्तीनंतरच्या दोन दशकात लक्षणीय वाढ झाली. याला मधुर क्रांती म्हणावयास हरकत नाही.

एखादे राष्ट्र जेव्हा प्रगतीपथावर असते तेव्हा त्याची प्रगती एकदिशीय राहत नाही. राष्ट्राचा विकास अनेक अंगांनी होत असतो. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर आपल्या देशात आपण शेतकीशास्त्रात ज्याप्रमाणे विकास घडवून आणला त्याप्रमाणे वाहतूक आणि दळणवळणाच्या साधनातही आपण आघाडी प्रस्थापित केली. १९५०-६० च्या सुमारास मुंबईहून कोकणात जायचे म्हणजे संपूर्ण चेहरा, कपडे, लाल मातीमय होणार हे गृहित धरलेले असे. पण त्यानंतरच्या दशकात पाऊलवाटांच्या सडका झाल्या आणि सडकांचे रूपांतर डांबरी रस्त्यात झाले. कोकणच्या अंतर्भागात असलेली शेकडो छोटी छोटी खेडी एकमेकांशी आणि तालुक्याच्या मुख्य ठिकाणाशी जोडली गेली. लाल एस. टी. कोकणातील सर्व खेड्यापाड्यात

पोचली; माल वाहतूक करणारे ट्रक आणि टेम्पो यामुळे कोकणातील शेतकी उत्पादने शहरापर्यंत पोहोचू लागली. कुंभार्ली घाट, आंबा घाट यासारख्या घाटांमुळे चिपळूण, कऱ्हाड, रत्नागिरी-कोल्हापूर ही शहरे जोडली गेली, कोकण व देश हाकेच्या अंतरावर आले. आता तर कोकण रेल्वे प्रकल्प पूर्ण झाला आणि रेल्वेमार्गावरील अनेक गावे मुंबईशी जोडली गेली. त्यांच्यातील दळणवळण सुधारले. मालवाहतूक करणे अधिक सोईस्कर झाले. विसाव्या शतकाच्या उत्तरार्धातील पहिल्या दोन दशकात आपल्या देशात हरितक्रांती, धवलक्रांती, मधुरक्रांती झाली. त्यांच्या जोडीला दळणवळणाची साधने उपलब्ध झाली आणि खेड्यापाड्यापर्यंत वीज पोचली. या सर्वांमुळे कोकणवासियांच्या आहारात बदल होण्यास सुरुवात झाली. विजेवर चालणाऱ्या पिठाच्या गिरण्यांमुळे गहू, तांदूळ, डाळ विनासायास दळली जाऊ लागली. अर्थात् कष्टाने ओढावयाची जाती मोडीत निघाली. देशी भाज्यांच्या जोडीला फ्लॉवर, कोबी, वाटाणा, गाजर, बीट यांसारख्या विलायती भाज्या येऊ लागल्या. पेरू, सिताफळे, सफरचंद, केळी यांसारखी फळे कोकणातील खेड्यापाड्यातील एस. टी. स्टँड्वर दृष्टीस पडू लागली. कोकणवासियांच्या आहारातील बदलाचा हा दुसरा टप्पा होय.

स्वातंत्र्यप्राप्तीनंतरच्या काळात शहरांचा विकास झाला. नवनवीन कारखाने, गिरण्या, सरकारी कचेऱ्या, इतरही अनेक उद्योगधंदे शहरात सुरू झाले. या ठिकाणी काम करण्यासाठी विविध स्तरांतील माणसांची आवश्यकता होती. ही गरज कोकणातील कष्टकरी बाले, घराघरातील कर्ते पुरुष आणि सुशिक्षित युवकांनी काही अंशी पूर्ण केली. खायला मिळायची भ्रांत असणाऱ्या कोकणवासियांचा लोंढा शहराकडे वळला. तेथे त्यांना रोजगार मिळाला. हातात चार पैसे खेळू लागले. या मंडळींना शहरातील राहणीमानाशी जुळवून घेण्यासाठी आहारात अनेक बदल करावे लागले. पोळीभाजीचा डबा नेणे सोईस्कर असल्यामुळे फक्त सणावारी पोळी खाणारा कोकणी माणूस रोज एक वेळ पोळी भाजी खाऊ लागला. त्यांच्या स्त्रिया शिक्षण घेऊ लागल्या. व्यवसायानिमित्त घराबाहेर पडू लागल्या. वृत्तपत्रे, मासिके यांमधील आहारविषयक लेख, या विषयावरील प्रबोधपर लेख, आकाशवाणीवरील श्रुतिका, महिला मंडळात घडवून आणलेली 'आहार व आरोग्य' या विषयावरील चर्चासत्रे आणि व्याख्याने यामुळे महिला चौरस व समतोल आहाराबाबत जागृत झाल्या. सर्व अन्नघटक, व्हिटॅमिन्स व क्षार यांचे आहारातील महत्त्व कोकणातून शहरात आलेल्या महिलांच्या मनावर ठसले. 'निकृष्ट आहार' म्हणजे प्रकृती अस्वास्थ्याला आमंत्रण ! अन्न पदार्थावर बचत करून डॉक्टरांची बिले भरण्यापेक्षा 'पोषणमूल्ये देणाऱ्या आहारावर खर्च करणे' अधिक श्रेयस्कर ही खूणगाठ या सूज्ञ गृहिणींनी मनाशी पक्की केली. किराणामालाबरोबर भाजीपाला दुधदुभते व फळे या गोष्टींची 'जीवनावश्यक' या सदरात गणना होऊ लागली आणि कौटुंबिक आर्थिक नियोजनात त्यांची तरतूद केली जाऊ लागली.

स्वातंत्र्योत्तर काळात भारतात वैज्ञानिक प्रगतीने वेग घेतला होता. दैनंदिन जीवन सुखकर करण्यासाठी विज्ञानाचा वापर कसा करावा याचा वस्तुपाठ इंग्रजांनी आपल्यापुढे घालून दिला

होता. स्वातंत्र्यानंतर आपण त्या दिशेने वेगाने प्रगती केली. लाकूडफाट्याऐवजी कोळशाच्या शेगड्या, त्यानंतर विनधुराचे स्टोव्ह आणि आता दमट हवेतही शीघ्रतेने पेटणारा, ध्वनीप्रदूषण, धूरप्रदूषण टाळणारा आणि वेळेचे बचत करणाऱ्या गॅसचे दास्यत्व शहरातील गृहिणींनी मोठ्या खुशीने स्वीकारले. नोकरी व्यवसायानिमित्त घराबाहेर पडणाऱ्या गृहिणींना खाद्यपदार्थ व दूधदुभते दीर्घकाळ उत्तम स्थितीत ठेवण्याची गरज निर्माण झाली. ही गरजसुद्धा विज्ञानाने भागवली. अल्पावधीत फ्रिजने स्वयंपाकघरात 'अढळस्थान' मिळवले. फ्रिजच्या जोडीला आणखी एक मदतनीस गृहिणीच्या मदतीला धावून आला. तो म्हणजे प्रेशर कुकर. 'हवाबंद डब्यात द्रवावरील दाब वाढला तर द्रवाचा उत्कलनबिंदू वाढतो. वाढलेले तापमान आणि दाब यामुळे पदार्थ लवकर शिजतो' या तत्त्वावर प्रेशर कुकरचे काम चालत असल्यामुळे वेळेची व इंधनाची बचत होऊ लागली. विज्ञानाने गृहिणीला दिलेली आणखी एक देणगी म्हणजे मिक्सर ! खलबत्ता, पाटा-वरवंटा ही जुनी उपकरणे पडद्याआड गेली. बटण दाबले की वाटणे, कुटणे यासारखी अत्यंत कष्टाची कामे विनासायास चुटकीसरशी होऊ लागली. मिक्सरच्या जोडीला फूड प्रोसेसर, चर्नर, कटर, ज्यूसर यासारख्या छोट्या छोट्या उपकरणांमुळे स्वयंपाकघरात गेल्या अर्धशतकात क्रांती घडून आली. गॅस, कुकर, फ्रिज, मिक्सर या स्वयंपाकघरातील नित्याच्या वस्तू तर आहेतच पण हे चारही शब्द मराठी भाषेने 'आपलेसे' केले आहेत.

नोकरी धंद्यानिमित्त शहराकडे आलेल्या माणसांचा गावाकडे ओढा असणे अगदी स्वाभाविक. ही माणसे छोट्या मोठ्या सुट्ट्या आणि गौरी गणपती, दिवाळी, शिमगा, महाशिवरात्र यासारखे सण यावेळी हमखास गावी जात. तसेच कामगार वर्गातील अनेक माणसे पावसाळ्यात शेतीची कामे करण्यासाठी गावी जात. गावातील घराविषयी असलेली ओढ. माणसांविषयी असलेले प्रेम व आपुलकी याच्या जोडीला खिशात खुळखुळणाऱ्या पैशाची ऊब यामुळे शहरातील सुधारणांचा, घरगुती उपकरणांचा, खाद्यपदार्थांचा ओघ शहरातून कोकणातील खेड्याकडे सुरू झाला. ही माणसे शहरी संस्कृतीची वाहक बनली. शहरातील तथाकथित 'हुश्शार' सून गावातील नणंदा, भावजया, बहिणी, मैत्रिणी यांच्यासाठी घरगुती उपकरणे वापरण्याची एक कार्यशाळाच घेत असे म्हणा ना ! या प्रशिक्षण शिबिरात अनेक खाद्यपदार्थ तयार करण्याच्या कृती, समतोल आहाराचे महत्त्व याविषयीचे प्रबोधनसुद्धा होत असे. त्यावरून खेड्यातील भगिनी आपल्या पाकसिद्धीत सुधारणा करीत. वस्तूंची उपलब्धता, विजेवर चालणारी घरगुती उपकरणे यांच्या सहाय्याने आपल्या रुचीनुसार सर्वजातीय खाद्यपदार्थ गृहिणी तयार करू लागल्या. ही प्रक्रिया स्वातंत्र्य प्राप्तीनंतर तीन ते चार दशके सातत्याने चालू राहिल्यामुळे त्याचे दृश्य स्वरूप आणि जाणवण्याजोगे बदल आपल्याला आढळू लागले. कोकणवासियांच्या आहारातील बदलाचा हा तिसरा टप्पा अतिशय महत्त्वाचा !

शहरामध्ये सर्व प्रांतातील लोक उद्योगधंद्याच्या अथवा व्यवसाय नोकरीच्या निमित्ताने

एकत्र आले आणि प्रांताप्रांतातील वैशिष्ट्यपूर्ण पदार्थ ठिकठिकाणी हॉटेल्समध्ये मिळू लागले. दक्षिणात्यांची इडली, वडा, डोसा, सांबार, बंगाल्यांचे रसगुल्ले, उत्तर व मध्य प्रदेशातील नमकिन आणि मिठाई, राजस्थानी चाट, गुजराथ्यांचे ढोकळे, उंध्यो यांसारख्या पदार्थांमधून शहरात 'राष्ट्रीय एकात्मता' प्रस्थापित झाली. शहरातील हे लोण कोकणातील खेड्यापाड्यात पसरावयास वेळ लागला नाही. कोकणातून शहराकडे आलेल्या माणसांनी ही 'खाद्यसंस्कृती' तेथपर्यंत पोचवली. कोकणातील माणसांच्या आहारात खूपच बदल झाला. जेवणातील 'भात' या एकमेव प्रमुख पदार्थाला पोळी, ब्रेडची जोड मिळाली. पावभाजी, वडा-पाव, भेळ, पाणीपुरी, रगडा-पॅटिस, इडली-सांबार यासारख्या चटकदार पदार्थांचा आहारात अधूनमधून समावेश होऊ लागला. कोकणातील माणसांच्या आहारातील तोचतोचपणा जाऊन त्यात विविधता आली. एकंदरीत आहारातील बदल हे ज्ञान-विज्ञान-तंत्रविज्ञानातील प्रगतीशी निगडीत असतात हे कोकणवासियांच्या आहारातील बदलावरून स्पष्ट होते !

गेल्या शतकात सर्वसामान्य भारतीय नागरिकांची सरासरी आयुर्मर्यादा अवघी तीस वर्षे होती. परंतु मानवाने केलेली वैज्ञानिक प्रगती, सामाजिक आरोग्याबद्दलची जाणीव, सर्वसाधारणपणे काही प्रमुख शहरातून होणारा स्वच्छ व शुद्ध पाणीपुरवठा, आहारातील बदल, वैद्यकीय व्यवसायातील क्रांतिकारी शोध, नवी औषधे यांसारख्या अनेक उपायांमुळे विसाव्या शतकाच्या उत्तरार्धात भारतीयांची सरासरी आयुर्मर्यादा ५५ ते ६० वर्षे झाली. वयाची सत्तर ओलांडलेल्या कितीतरी कार्यरत व्यक्ती सभोवतालच्या परिसरात आपल्याला भेटतात. 'अवघे पाऊणशे वयमान' असणारे ठणठणीत आजी-आजोबा विसाव्या शतकाच्या प्रारंभी दुर्मिळ वाटत असले तरी त्यांची संख्या आता जाणवण्याजोगी आहे मानवाची आयुर्मर्यादा वाढण्याची अनेक कारणे असली तरी 'आहारातील बदल' हे त्यातील प्रमुख कारण आहे.

आज वयाचे अर्धशतक गाठलेल्या भारतीयांच्या दृष्टीने विसाव्या शतकाचा पूर्वार्ध हा आपल्या आईवडिलांचा व आजीआजोबांचा काळ तर उत्तरार्ध हा आपला आणि आपल्या अपत्यांचा काळ. आजी-आजोबा आणि आई-वडिलांकडून आपण पूर्वार्धातील परिस्थिती ज्ञात करून घेतली आणि आपला संसार सुरू झाल्यापासून गेल्या पंचवीस वर्षातील स्थित्यंतरे आपल्या दृष्टीने चक्षुर्वैसत्त्यम् ठरली. विसाव्या शतकाचा निरोप घेताना पुढील पिढीच्या स्थित्यंतराच्या नांदीची चाहूल आपल्याला लागली आहे. थोडक्यात विसाव्या शतकातील भारतीयांच्या आहाराच्या स्थित्यंतराचा आढावा घेणे म्हणजे आपल्याच कौटुंबिक जीवनाचे पुस्तक उघडून वाचण्यासारखे आहे !

---

स्वत:तील कलेवर प्रेम करा आणि कलेतील स्वत:वर प्रेम करू नका. पहाणे आणि ऐकणे शिका. जीवनावर प्रेम करा. ते कलेत आणण्याला शिका.



अनुक्रमणिका

# समाजशास्त्र आणि इतिहास

## इतिहास आणि राष्ट्रे

**– श्रीकृष्ण खोत**

*'भारतबरशेर इतिहास'* या ग्रंथातील पहिले वाक्य मोठे लक्षवेधी आहे. "भारत वर्षावर हिंदू, मुसलमान, आणि ख्रिश्चन राजानी राज्य केले. (त्यानुसार या देशाच्या इतिहासाची विभागणी) हिंदू, मुसलमान आणि ख्रिश्चन राजानी जो काळ राज्य केले त्यानुसार या देशाच्या इतिहासाची विभागणी हिंदू, मुसलमान आणि ख्रिश्चन राजवटींचा कालखंड अशा प्रकारे करण्यात आलेली आहे."

हे वाक्य एका सीमारेषेसारखे आहे. यापुढे इतिहास हा 'राजांचा इतिहास' न राहता, तो 'देशाचा इतिहास' झालेला आहे. असे त्या वाक्याने अधोरेखित केले होते. *'राजाबली'* आता यापुढे कधीही लिहिली जाणार नव्हती. यापुढे सर्व काही *'देशाचा इतिहास'* बनणार होते. या संकल्पित इतिहासात प्रत्येक राजवटीची जी विशिष्ट प्रकृती असेल त्यानुसार त्या इतिहासात कालखंड पाडण्यात आले होते. या कालखंडाची जी काही विशिष्ट प्रकृती असेल ती राज्यकर्त्यांचे जे काही कर्म असेल त्यानुसार आकार घेणार होती. या विचारानुसार देश आणि राजाची कारकिर्द (REALM) या दोन्ही गोष्टी कायमच्या अविभाज्य होण्याइतकी त्यांच्यात एक वाक्यता (Identification) होती. याचा अर्थ असा होता की देशात अनेक राजवटी आणि राजे विद्यमान असतीलही. परंतु खरे सांगायचे झाल्यास देशात एकच राजवट नेहमी असते. तिचा विस्तार या देशाबरोबर होतो. एकच राजधानी आणि सिंहासन ही त्याची प्रतिके आहेत. हेच वेगळ्या शब्दात सांगावयाचे झाल्यास, 'राजवट' या संकल्पनेत या देशाचे (GENERIC) मुळातील स्वातंत्र्य अनुस्यूत आहे. त्याजवरोबर राजधानी अथवा सिंहासन हे (GENERIC) मुळातील राजव्यवस्थेच्या केंद्राचे प्रतिक आहे. आता हा देश भारतवर्ष आहे. म्हणजेच या देशाबरोबर सहविस्तारित अशी फक्त एकच खरीखुरी अशी राजसत्ता असणार. केंद्रस्थानी असलेली अशीच एकच राजधानी अथवा सिंहासन, त्या राज्यसत्तेचे प्रतिक असणार. हे असे जर नसेल, तर पृथ्वीराजाचा पराभव आणि महंमद घोरीने दिल्ली काबीज करणे, या दोन घटनानंतर भारतीय इतिहासातील एक कालखंडाचा संपूर्ण शेवट, आणि एका नव्या कालखंडाची सुरूवात या दोन्हीचे सूचन होते असे कसे म्हणता येईल? प्लासीच्या लढाईनंतर बंगालमधील मुसलमानी राजवटीची इमिश्री झाली, आणि ख्रिश्चन राजवटीचा आरंभ झाला असे कसे सांगता येईल? एखादा देश आणि त्यातील जनता यांच्या स्वत:च्या अशा सार्वभौमत्व आणि राष्ट्रीयत्व या दोन गोष्टींबद्दल काही कल्पना असतात. याबद्दल युरोपियन इतिहास लेखनात विवेचन येतच होते. या ज्या कल्पना होत्या,





अनुक्रमणिका

त्यांचे आता इंग्लिश विद्याविभूषित बंगाली माणसाच्या मनात पक्के रोपण झालेले होते.

या इतिहासग्रंथाच्या पुढच्याच पानावरती इतिहास लेखनाची जी आधुनिक पद्धत होती, त्याचे आणखी एक उदाहरण आढळते. आजवर उपलब्ध असलेले संस्कृत भाषेतील मुळ समजले जाणारे पुरावे उपलब्ध आहेत ते सारे दंतकथा आणि कल्पनेपलीकडच्या कथानी भरलेले आहेत. 'राजतरंगिणी' या ग्रंथाव्यतिरिक्त एकही विश्वसनिय असा इतिहास विषयक वृत्तांत उपलब्ध नाही. 'विश्वसनिय' वृत्तांत याचे मापदंड अर्थात युरोपिय इतिहासकार आणि त्या क्षेत्रातील पंडितानी जे मान्य केले होते तेच आहेत. भारतासंबंधी संशोधन करणाऱ्या (INDOLOGY) युरोपिय इतिहासकाराना एकही विश्वसनिय असा वृत्तांत भारतात उपलब्ध नाही या एकमेव शोध लागला होता. असे होते तरी या विचाराने मृत्युंजयाच्या मनाला स्पर्शही केला नव्हता. परंतु *तारिनिचरन* या इतिहासकाराच्या दृष्टीने ती गोष्ट स्वयंसिद्ध होती.

*यानंतर भारतात राहणाऱ्या लोकांचे वर्णन आपणास पेश करण्यात आलेले आहे. "फार प्राचीन काळी भारतात दोन स्पष्ट आणि वेगळे असे लोकसमूह राहत होते. त्यापैकी एक उंची आणि इतर शारीरिक बाबती आपल्याशी मिळते-जुळते होते. या समूहाचे वंशज आजकाल हिंदू म्हणून ओळखले जातात. दुसऱ्या समूहातले लोक खुजे, कृष्णवर्णिय आणि पराकोटीचे असंस्कृत (Uncivilized) होते. या समूहाचे वंशज आज खास (KHAS) भिल्ल, पुलींदा संताल आणि आधुनिक संस्कृतीचा ज्याना स्पर्श झालेला नाही (PRIMITIVE) अशा जंगली जाती म्हणून ओळखले जातात."*

अर्थात या दोन लोकसमूहाचा संकरातून मिश्र प्रजेची निर्मिती झालेली होती. एवंच हिंदू लोकसमूहाच्या पहिल्या तीन वर्णाना द्विजाती म्हणून संबोधण्यात येईल. परंतु शुद्राला ही प्रतिष्ठा प्राप्त करून घेण्याचा अधिकार नव्हता. यावरून एकच गोष्ट सिद्ध होते. ती म्हणजे पहिला लोकसमूह, सुरुवातीपासूनच दुसऱ्या लोहसमूहाशी संबंध नसलेला असा लोक-संप्रदाय होता. दुसऱ्या लोकसमूहातील लोक कालांतराने पहिल्या लोकसमूहात समाविष्ट करून घेण्यात आले. परंतु त्याना अत्यंत कनिष्ठ दर्जाची सामाजिक प्रतिष्ठा देण्यात आली होती.

हिंदू धर्म हा उत्तर भारतातून, हळूहळू दक्षिण भारतात पसरला ही कल्पना वा विचार प्रथमच इतिहास लेखनात समाविष्ट करण्यात आला होता. हा जो हिंदू धर्माचा प्रसार झाला, तो तत्कालीन राजवटीच्या वाढलेल्या प्रभावाचा परिणाम होता.

*"भारताचा दक्षिणेकडील भाग सुरुवातीला जंगलानी व्यापलेला होता, आणि त्यात असंस्कृत जाती आणि बिगर वस्ती होती. भारताच्या या विभागात हिंदूचे निशाण फडकावणारी प्रभु रामचंद्र ही पहिली व्यक्ती. . . . . . दक्षिण भारतात हिंदूनी प्राचीन काळी केलेल्या वसाहतीकरणाबद्दल आजही अनेक लोकप्रिय कथा प्रचलित आहेत."*

शंभर वर्षापूर्वी इंग्लिश विद्याविभूषित बंगाली ब्राह्मणाच्या मनात एक प्रतिमा अगदी सहजपणे येऊन जात असे. ती प्रतिमा होती राष्ट्रीय सार्वभौमत्वाचे आधुनिक प्रतिक अगदी

उंच अशा स्थानावर नेणाऱ्या रामायणातील नायकची. विद्यमान काळातील राजकीय हिंदुत्वाचे समर्थक आहेत, त्याना रामाने दक्षिण भारतातील प्रजेला पादाक्रांत करून तेथे आधुनिक वसाहतवादासारखी राजवट प्रस्थापित केली हे सूचन बहुतकरून चांगलेच पेचात टाकील हे खरे आहे.

विश्वसनिय अशा मुळ साधनांची कमतरता असल्याकारणाने, प्राचीन भारतीय इतिहासाचा वृत्तांत हा तुकड्या तुकड्याचाच असणार याबद्दल आता इतिहासकारांची खात्री पटलेली होती. मृत्युंजयानी पेश केलेल्या राजघराण्यांच्या यादीबद्दलही निश्चितता केव्हाच मागे पडली होती. बुद्धीवादाला अनुकरणाऱ्या, प्राचीन इतिहासाच्या पुर्नरचनेच्या मर्यादा *तारिनीचरण* या इतिहासकाराने अगदी स्पष्टपणे नोंदविल्या आहेत.

*"ख्रिस्तपूर्व चौदाव्या शतकात कुरुक्षेत्रावरची लढाई ही घटना प्रत्यक्षात घडली असे अनेक प्रकारच्या युक्तिवादाच्या आधारे युरोपिय इतिहासकारानी सिद्ध केले आहे. कुरूक्षेत्रावरच्या लढाईनंतरच्या फार मोठ्या काळातील भारतीय इतिहासाचा वृत्तांत अनिश्चित आहे. विशिष्ट बाजूने लिहिलेला पक्षपाती व अंतर्विरोधी असा आहे. जो इतिहास ही सारी लक्षणे इतक्या प्रमाणात प्रकट करतो त्याच्या आधारावर एक सुसंगत असा वृत्तांत रचणे केवळ अशक्य आहे."*

असे असूनही त्यानी जो वृत्तांत रचला आहे तो विशेषकरून लक्षवेधी आहे असे नाही. याचे कारण त्याना उपलब्ध असलेला प्राचीन भारताचा इतिहास या विषयासंबंधी लिहिण्यात त्या काळी जे ब्रिटिश लेखक व्यस्त होते त्यांच्या लेखनात फारसा बदल न करताच, त्यानी आपला इतिहास रचला होता. आपल्या समकालीन वाचकाचे लक्ष वेधून घेईल अशी एकच टिपणी या लेखकाने लिहिलेल्या इतिहासातील 'बौद्धधर्म' या प्रकरणात आढळते. *तारिनीचरण* यानी या शिर्षकाच्या प्रकरणात पुढील मते नमूद केली आहेत.

*"हिंदू धर्माचा बुद्ध एक महान शत्रू बनला. म्हणूनच हिंदू त्याचे वर्णन निरीश्वरवादी व धर्मउच्छेदक असे करतात. ते काहीही असो, बुद्धाने स्थापलेल्या धर्मात अत्यंत उच्च आणि मौल्यवान असा उपदेश आढळतो. बुद्धीला (युक्तीवादाला) धरून जे जे काही नसेल, ते त्यानी स्वीकारार्ह मानले नाही. जाती व्यवस्था ही धर्माने मान्य करावी ही प्रथा कितीही प्राचीन असो. परंतु या परंपरागत दृष्टीकोनाविरुद्ध, अधिक बळकट असा युक्तिवाद सादर करण्यात आला, तर मग निदान किमानपक्षी काही लोकांची मते बदलण्याची शक्यता आहे."*

या उताऱ्यात बुद्धधर्माचे जे धर्माबद्दलचे जे विचार आहेत, *ते बुद्धी व तर्क* या दोघानाही धरून आहेत हे नाकारण्यात आलेले नाही. बुद्धधर्म हा 'हिंदू धर्माचा अंतर्गत असा एक भाग मानून, हिंदुधर्मांतर्गत बुद्धीवादी अशी टिका या स्वरूपात बुद्धधर्माला सादर करण्यात आलेले आहे. तसे नसते तर कालखंड कसे ठरवावे या मापदंडानुसार बुद्धधर्माच्या कालखंडाला प्राचीन भारतीय इतिहासात स्वतंत्र स्थान देऊन, त्याची वर्गवारी करावी लागली असती. पण तो हा हिंदु धर्माचा अंतर्गत भाग मानल्या कारणाने, त्याला हिंदुधर्माच्या



अनुक्रमणिका

कालखंडातच स्थान देण्यात आलेले आहे.

प्राचीन भारतीय इतिहासाची मूळ साधने ही तुटक तुटक व अविश्वसनिय आहेत हे या अगोदरच नमूद करण्यात आलेले आहे. असे असले तरीही एका विषयाबाबत ऐतिहासिक पुराव्याचा तुटवडा *तारिंनिचरण* या इतिहासकाराला भासला असे दिसत नाही. तो विषय म्हणजे, 'प्राचीन भारतीयांची सभ्यता (CIVILIZATION) आणि त्यांचे ज्ञान,' *तारिंनिचरण* यांच्या ग्रंथाच्या सहाव्या प्रकरणाचे ते शिर्षकच आहे. त्यातील प्रमुख युक्तिवाद येणेप्रमाणे. "राक्षस आणि खूजा मनुष्य, बलदंड व अशक्त या दोघात फरक आहेच. परंतु प्राचीन काळतील हिंदू आणि आधुनिक यांच्यातील फरकाशी तुलना करता तो फारच नगण्य आहे. *आर्यवंशाचे* जे लोक होते, त्यांचे धैर्य, सत्यवचनी बाणा, आणि शालिनता पाहून प्राचीन काळी भारतात प्रवास करणारे परकीय लोक आश्चर्यचकीत होत. परकीय प्रवासी भारतीयात प्रामुख्याने हेच गुण विद्यमानकाळी नाहीत असे सांगतात. प्राचीनकाळी तातर, चिन आणि इतर प्रदेश पादाक्रांत करून, तेथे आपले निशाण फडकविण्याच्या उद्देशाने हिंदू लोक बाहेर पडत. विद्यमानकाळी आपण काय पहातो? एका बारकाश्या बेटावरून शिपाई भारतात येतात; व ते या भारतवर्षावर राज्य करतात. प्राचीनकाळी हिंदू लोक आपल्या जाती बाहेरच्या लोकांना *म्लेंध* असे संबोधून त्यांना अपमानास्पद वागणूक देत असत. वर्तमानकाळी आपणास काय आढळते? तेच *म्लेंध* आर्यांच्या वारसदारावर अपमानास्पद वागणूकीचा मारा करतात. प्राचीन काळी हिंदु सुमात्रा आणि इतर बेटावर जात असत. या संबंधीचा पुरावा या प्रदेशालगतच्या बाकी बेटावर अजूनही भरपूर प्रमाणात उपलब्ध आहे. वर्तमानकाळी काय परिस्थिती आहे? समुद्रपर्यटनाच्या विचारानेच हिंदू व्यक्तिच्या ह्रदयात धडकी भरते यदाकदाचित् एखादा कोणी हे कृत्य करण्यात यशस्वी झालाच, तर त्याला विद्यमान हिंदू समाज ताबडतोब बहिष्कृत ठरवितो."

प्राचीन काळातील किर्ती, विद्यमान काळातील विपन्नावस्था, या सर्वच कथानकाचा विषय 'आपण' आहोत. प्राचीन भारतवर्षातील बलदंड 'हिरो', हे आपले पूर्वज होते आणि विद्यमान काळातील भारतवर्षातील कमकुवत रहिवाशी आपणच आहोत. प्राचीन भारतीयांनी इतर देश पादाक्रांत केले, सातासमुद्रापलिकडील देशाशी व्यापार केला, आणि इतर देशातील लोकांना 'अपमानास्पद' वागणूक दिली, हा 'आमच्या' दृष्टीने गर्वाचा भाग आहे. 'आर्यांचे वारस' विद्यमान काळात परक्यांचे अंकीत झाले आहेत, आणि त्यांच्या तिरस्काराचे ते लक्ष ठरले आहेत. ही वस्तुस्थिती ही आपल्या शरमेची गोष्ट आहे. या पृथ्वीवर वसती करणाऱ्या वेगवेगळ्या प्रकारच्या लोकात सामर्थ्याबाबत एक निश्चित अशी फुटपट्टी आहे. या मापानुसार प्राचिन काळी भारतातल्या लोकांचे पारडे जड होते, असे असले तरी विद्यमान काळात ते फारच हलके ठरून भारतीयांनी सामर्थ्याच्याबाबत अगदी तळ गाठलेला आहे.

प्राचीन काळी भारतीयांकडे बलदंड शक्ती ही होतीच. पण त्याजबरोबर इतरही अनेक क्षेत्रात भारतीयांनी त्यांनी कर्तृत्व गाजविले होते. विद्वत्ता, शिक्षण या क्षेत्रात प्राचीन

भारतीयांनी जी कामगिरी बजाविली होती, तीला सार्वत्रिक मान्यता प्राप्त झालेली आहे.

*"प्राचीन काळीं भारत सोडून पृथ्वीचा जवळजवळ इतर सर्व भाग अज्ञानाच्या अंधकाराने झाकोळून गेलेला होता. परंतु त्या काळी भारतात मात्र ज्ञानसंपादन आणि विद्वता यांच्या विशुद्ध प्रकाशाचा झगमगाट होता. प्राचीन काळातील विद्वानांच्या अत्यंत कुशाग्र बुद्धीसामर्थ्यात ज्याचात उगम आहे, असे तत्वज्ञानाच्या क्षेत्रातील शोध विद्यमान काळातील विद्वानालाही स्फूर्ती देत आहेत."*

या ठिकाणी आपण पुढील गोष्टीची नोंद घेणे जरुरी आहे. *तारिनिचरण* या ग्रंथकाराला, युरोपिय विद्वानांची या विषयासंबंधीची जी मते होती, ती अत्यंत महत्त्वाची वाटतात. वस्तुस्थिती अशी आहे की प्राचीन भारतीयांच्या पांडित्यासंबंधी त्यांच्या ज्ञानाविषयी जी काही उदाहरणे *तारिनिचरणाने* उद्धृत केली आहेत, ती सर्वच उदाहरणे त्यांनी पाश्चिमात्त्य समाजातील 'ओरीएंट्लिस्ट' या नावाने ओळखल्या जाणाऱ्या विद्वानांच्या लेखनातून घेतलेली आहेत. खगोलशास्त्र, गणित, तर्क आणि भाषाशास्त्र या विविध ज्ञानशाखेतील आपल्या विवेचनाच्या समर्थनार्थ *तारिनिचरणाने* उद्धृत केलेली उदाहरणे म्हणजे एकोणिसाव्या शतकातील 'ओरिएंटॅलिस्ट'नी लावलेले शोध होते. 'आज भारतीयांना अत्यंत विपन्नावस्था आलेली असल्याकारणाने, आजकाल युरापिय लोक भारतीयांकडे फारच तुच्छतेने पहातात. असे जरी असले तरी भारतीयांची परिस्थिती नेहमीच अशी होती असे नाही. याचे कारण प्राचीन भारतीयांची कला आणि विज्ञान या दोन्ही क्षेत्रात फारच वरच्या श्रेणीचे काम कर्तृत्व दाखविलेले होते हे युरोपिय विद्वानांनीही मान्य केलेले आहे. म्हणून ओरिएंटॅलिस्ट विद्वानांच्या लिखाणातून प्राप्त होणारा पुरावा परिपूर्ण असा राष्ट्रवादी इतिहास रचावयाचा झाल्यास अत्यंत महत्त्वाचा ठरतो'. या ठिकाणी *तारिनिचरण* यांना याच गोष्टींचे सूचन करावयाचे आहे असे दिसते.

दुसऱ्या एका गोष्टीवरून *तारिनिचरण* यांचा इतिहास हा राष्ट्रवादी होता हे सुचित होते. प्राचीनकाळची किर्ती आणि त्यानंतरची अवनती याचा जो वृत्तांत त्यांनी कथन केला आहे, त्याला सरतेशेवटी एक तात्पर्य आहे. समाज-सुधारणा करा, अवनती दर्शक अशा ज्या काही खुणा, लक्षणे व भ्रामक समजुती आहेत त्या काढून टाका, आणि गतकालातील खऱ्याखुऱ्या सत्य अशा ध्येयाचे व उद्दिष्टांचे पुनरूज्जीवन करा, हे ते तात्पर्य होय. ज्या खोट्या श्रद्धा आणि चालीरिती यामुळे भारतीय तिरस्करणीय झाले आहेत, त्या श्रद्धा व चालिरीती प्राचीन काळी अस्तित्वात नव्हत्या. हे अशा अर्थाचे विधान करण्यामागे एक कारण आहे. ते म्हणजे प्राचीन काळात 'आपण' फारच सुसंस्कृत होतो याची कबुली खुद्द युरोपियनांनीच दिलेली आहे.

"हिंदु स्त्रियांना आपण गुलामासारखे वागवून आहोत असे आपणास आढळते. त्यांना एखाद्या कैद्याप्रमाणे बंदिवासात टाकलेले आहे. एखाद्या पशु इतक्या त्या अज्ञानी असतात. आपण एक हजार, दिड हजार वर्षे मागे जाऊन पाहिले, तर त्याकाळी स्त्रियांचा आदर केला

जात होता, त्या सुशिक्षित होत्या, आणि त्यांच्यावर बहुतांशाने बंधने नव्हती असे आपणास आढळते. त्याकाळी बालविवाह कोठे अस्तित्वात होते? चौव्वीस वर्षे झाल्याशिवाय कोणीच लग्न करीत नव्हते.''

राष्ट्रवादाच्या दृष्टीने प्राचीन भारत, हे सुवर्णयुग होते. या उलट प्राचीन काळ आणि विद्यमान काळ, यांच्या दरम्यानचा कालखंड, हा मध्ययुगीन कालखंड अंध:कारमय होता. आता हे सांगण्याची आवश्यकता नाही, की हा जो आकृतिबंध होता, तो युरोपियन इतिहासकारांना मंजूर होता. प्राचीन ग्रीसचा वारसा, हा इंग्लिश माणसाच्या अभिजात व सुवर्णयुगी वारसा आहे, असा दावा युरोपिय इतिहासाचा आकृतिबंध करतो. असे जर असेल, तर तथाकथित वैदिक संस्कृतीने साध्य केलेल्या अनेक चांगल्या गोष्टीबद्दल इंग्रजी विद्याविभूषित बंगाली माणसाला अभिमान का वाटू नये?

**वृतांत कथनातील खंड**

'प्राचीन भारतीयांची सभ्यता आणि ज्ञान' या प्रकरणानंतर *तारिनिचरण* यांचा प्राचीन भारताचा इतिहास पूर्णविराम घेतो. त्यानंतर ते वाचकास भारताबाहेर घेऊन जातात. सातव्या शतकातील अरबस्थानात ते वाचकाला आणून सोडतात. बाराव्या शतकातील भारताच्या इतिहासविषयक कालखंडात झालेल्या बदलांची चर्चा करण्यास सुरुवात करतात. सातव्या शतकातील अरबस्थानाचे वर्णन करण्याची आवश्यकता त्यांना का बरे वाटली असावी? या प्रश्नाचे उत्तर अर्थात उघडच आहे. परंतु एकोणिसाव्या शतकातील युरोपियन इतिहासकारांनी गृहीत धरलेल्या गोष्टी आणि त्यांचे पूर्वग्रह या सर्वांचा संपूर्ण वृत्तांत त्या प्रश्नाच्या उत्तरात अनुस्युत आहे.

*''महंमदाने आपल्या अनुयायांना मुसलमान ( म्हणजेच श्रद्धावान असे नाव दिले) आणि बाकी सर्व मानवजातीला तो काफ्फीर (म्हणजे जो मुसलमान नाही तो) हे संबोधन देई. मंहमदाने आपल्या अनुयायांना आज्ञा केली की, काफिरांचा नायनाट करण्यासाठी त्यांनी आपल्या हाती तरवार घ्यावी. महंमदाने असेही सांगितले होते की अल्लाला मान्यता नसलेल्या खोट्या धर्माचे जे अनुयायी आहेत, त्यांच्या विरुद्ध पुकारलेल्या युद्धात, ज्या कोणा मुसलमानांना मृत्यू येईल, ते थेट स्वर्गात जातील, आणि त्यानंतर मृगनयनी अप्सरांच्या सहवासात त्यांना सतत रहाता येईल. परंतु या अशा लढायापासून जे पळ काढतील त्यांची रवानगी नरकात होऊन त्यांना जाळण्यात येईल. युद्धपिपासुवृत्ती आणि कशाचेही भय न बाळगण्याची प्रवृत्ती ही अरब या जातीची प्रकृती आहे. आता जगात लुटालुट करण्याच्या त्याच्या स्वाभाविक लालसेला उठावणी मिळाली होती. त्याजबरोबर हे जग सोडल्यानंतर ते ज्या जगात जाणार होते, तेथेही त्यांना कायम ऐषआरामी जीवन प्राप्त होणार होते. या दोन्ही कारणामुळे, ते ज्या ज्या ठिकाणी गेले, त्या ठिकाणी त्यांच्या तरवारीचा कोणी प्रतिकारच केला नाही. सर्व अरबस्थान महंमदाच्या नियंत्रणाखाली आले. त्याच्या मृत्युनंतर थोड्याच वर्षाच्या आत, काबुल ते स्पेन या भूभागातील प्रत्येक देशावर*

*मुसलमानांचे निशाण फडकत होते. मुसलमानी मुसंडीला प्रत्येक देश बळी पडला. एका राजा पाठोपाठ दुसरा, एका देशानंतर दुसरा असे या मुसलमानांच्या तरवारीने पादाक्रांत केले. आजवर दुसऱ्या कोणत्याही आक्रमणाने इतक्या वेगाने एकामागून एक देश पादाक्रांत केला नव्हता. हे अशा प्रकारचे लोक, आपण एखादा देश पादाक्रांत करणार आहोत, यांनी नेहमीच बेभान होत. या अशा लोकांनी भारताच्या संपत्तीची लालसा न धरणे हे केवळ अशक्य होते.''*

या नंतर येणाऱ्या कालखंडाची भूमि अशा वर्णनाने तयार करण्यात येत होती. भारतियांचा इतिहास वेगळा, आणि मुसलमानांचा वेगळा असा इतिहास, या दोघांच्या संघर्षाचे जे परिणाम झाले, त्यामधून प्राचीन भारतीय इतिहासानंतर येणारा कालखंड तयार झाला होता, महंमदाच्या जीवनातून मुसलमानांच्या इतिहासाच्या वेगळेपणाची निर्मिती झाली होती. महंमदाच्या जीवनातून मुसलमानांच्या इतिहासाला वैशिष्ट्य प्राप्त झालेले होते. हेच वेगळ्या शब्दात सांगावयाचे झाल्यास तेराव्या शतकाच्या आरंभाला दिल्लीच्या सिंहासनावर अनेक राजघराण्यांची स्थापना झाली होती आणि मध्यंतरीच्या पाच शतकात अनेक राजकीय घडामोडी होणार होत्या. परंतु या सर्वांचे वर्णन भारतात स्वारी करून आलेल्या तुर्की अफगाण अगर मोगल यांच्या राजवटींचा कालखंड असे होणार नव्हते. हा सर्व कालखंड मुसलमानांच्या इतिहासाचा अविभाज्य भाग होता.

हा पाच शतकांचा इतिहास घडविणारांना वागणूकीबाबत काही वैशिष्ट्ये बहाल करण्यात आलेली होती. ते युद्धपिपासू होते. ''ईस्लाम धर्म न मानणाऱ्यांना ते मानीत नव्हते, त्यांना ठार मारणे हे आपले धार्मिक कर्तव्य आहे'' अशी त्या राज्यकर्त्यांची श्रद्धा होती. लुटालुट करण्याची लालसा, आणि नंदनवनात, आपण चिरतरुण अप्सरांच्या सहवासात कायम रहाणार आहोत ही स्वप्ने, या दोन्ही विचारांनी ते कार्यप्रवण झाले होते. असे करताना लढाईत मरण झाले तरी पत्करण्यास ते तयार होते. ते नुसताच प्रदेश पादाक्रांत करणारे लढवय्ये नव्हते; तर आपण प्रदेश पादाक्रांत करणार आहोत या विचारानेच उन्मत व धुंद झालेले ते धर्मवीर होते. परिणामी आपल्या प्रकृतीधर्मानुसार भारतातील संपत्ती व वैभव आपण कशी हस्तगत करू याची त्यांना हाव लागलेली होती.''

या ठिकाणी एका मुद्याची नोंद घेणे महत्वाचे व आवश्यकही आहे. एकोणिसाव्या शतकात, ब्रिटीश लेखकांनी निर्माण केलेला भारतीयांचा इतिहास आणि अव्वल इंग्रजीच्या काळात होत असलेले नवे राष्ट्रवादी इतिहास लेखन, यांच्यातील परस्पर संबंध गुंतागुंतीचे होते. जेम्स मिल यांचा 'दि हिस्टरी ऑफ इंडिया' (ब्रिटीश हिंदुस्थानचा इतिहास) हा ग्रंथ इ. स. १८७१ साली त्यांनी लिहून हातावेगळा केला होता. युरोपिय भारतशास्त्र (EUROPEAN INDOLOGY) या ज्ञानशाखेच्या दृष्टीने हा ग्रंथ 'भारतीय इतिहास' या विषयाबाबतच्या त्या काळातील पाठ्यपुस्तकात अग्रस्थानी असेलही. परंतु अव्वल इंग्रजीच्या काळात, सुरुवातीच्या भारतीय इतिहासकारांचा एक दृष्टीकोन होता. या इतिहासकारांना एका



अनुक्रमणिका

विशिष्ट इतिहास विषयक दृष्टीकोनाशी संघर्ष करणे क्रमप्राप्त होते. मिल्स यांचा ग्रंथ हे नेमकेपणाने त्या दृष्टीकोनाचे प्रतिक होते.

विल्यम जोन्स यांच्या सारख्या ओरिएंटॅलिस्ट पंडीतांना प्राचीन भारतीय तत्वज्ञान आणि वाङ्मय या क्षेत्रातील भारतियांची कामगिरी आणि कर्तृत्व याविषयी उत्साह व प्रेम होते. परंतु त्यात जॉनस्टुअर्ट मिल हे पंडीत कधीही सहभागी झाले नाहीत. भारतीय सभ्यतेतील अनैतिकता आणि हुकुमशाही प्रवृत्ती यांच्याबद्दलचा मिल यांचा निषेध अगदी पराकोटीचा व परिपूर्ण असाच होता. या उलट तौलनिक दृष्ट्या इस्लामी सभ्यता ही अधिक श्रेष्ठ होती असे मिल यांनी मान्य केले होते. परंतु असे होते तरी त्यांनी सरतेशेवटी काढलेल्या निष्कर्षात, भारताच्या 'नशिबी अर्धी-अधिक जंगलशाही आणि हुकूमशाही राजवट, यातून निर्माण होणारे दु:ख व हाल अपेष्टा या कायमच्याच होत्या.' या अशा तऱ्हेच्या इतिहास या विषयातील केवळ वैयक्तिक अशा स्वरूपाची (SUBJECTIVITY) प्रवृत्ती प्रकट करणारे जे सर्वकष आणि सर्वव्यापी अशा स्वरूपाचे जे काही आग्रह (CLAIM) होते, त्यांना आव्हान दिल्यानंतरच भारतातील राष्ट्रीय इतिहासाचा जन्म होणार होता.

आपण ज्या राष्ट्रीय विचारसरणीच्या पाठ्यपुस्तकांचे परिशिलन करीत आहोत, त्यावर अधिक प्रमाणात प्रत्यक्ष परिणाम करणारा जर कोठचा ग्रंथ असेल तर तो *माऊंट स्टुअर्ट एलिफिस्टन* यांचा 'हिस्टरी ऑफ इंडिया' (१८४१) (भारताचा इतिहास) हा ग्रंथ. भारतीय विद्यापीठातून एक प्रमाण असे मानले जाणारे ते त्याकाळातील पाठ्यपुस्तक होते. ब्रिटीश लेखकांनी लिहलेले जे भारतीय इतिहास होते. त्यात हा ग्रंथ त्याकाळी सर्वात अधिक वाचला जात असे. विसाव्या शतकाच्या आरंभीला *व्हिसेंन्ट स्मिथ* यांची पाठ्य-पुस्तके प्रसिद्ध होईपर्यंत या ग्रंथाची ही लोकप्रियता टिकून राहिली होती. मिल्स यांच्या ग्रंथापेक्षा, एलिफिन्सटन यांचा ग्रंथ राष्ट्रवादी वाचकांच्या रूचीचा का होता याची कारणे शोधण्याकरता संशोधनाची अजिबात आवश्यकता नाही. प्रा. ई. बी कॉवेल (COWEL) हे त्याकाळी कलकत्ता विद्यापिठात शिकवीत असत. *एलिफिन्सटन* यांच्या या 'भारतीय इतिहासा'च्या नंतरच्या आवृत्त्यांना प्रा. कॉलेल यांनी अनेक तळटिपा लिहलेल्या आहेत. इ. स. १८६६ च्या आवृत्तीच्या प्रस्तावनेत त्यांनी म्हटले होते. "या ग्रंथातून सर्वत्र भारतीय प्रकृतीबद्दल कौतुक आणि ह्रदयातून आलेली अस्सल व खरीखुरी सहानुभूती आढळते. या विचाराने व प्रवृत्तीने भारून लिहलेला हा ग्रंथ आहे; आणि त्यातच त्याचे विलोभनीयत्व व गोडवा (CHARM) आहे. जेम्स मिल यांच्या अत्यंत बोलक्या (ELOQUENT) ग्रंथात या सर्व गुणांचा अभाव होता. तोच त्याग्रंथाचा प्रमुख दोष आहे. *एलिफिन्सटन* यांनी सहानुभूती आणि कौतुक या दोन्ही प्रवृत्तीने भारून, अतिशय चैतन्यशीलतेने, आपल्या इतिहास ग्रंथातील प्रकरणांना येणेप्रमाणे नावे दिलेली आहेत ! *एलिफिन्सटन* यांच्या ग्रंथातील एका प्रकरणाचे शिर्षक आहे. 'तत्वज्ञान', आणखी काही प्रकरणांची शिर्षके आहेत 'खगोलशास्त्र' आणि गणित शास्त्रे 'वैद्यक' 'भाषा' 'वाङ्मय', 'कला' आणि 'व्यापार' या सर्व प्रकरणात हिंदूचे या विषयातील

संशोधन *एलिफिस्टन* यांनी नोंदविले आहे. *एलिफिस्टन* 'यांनी आपल्या ग्रंथातील 'मुसलमान' या विभागातील एका प्रकरणाची सुरुवात' 'अरबांनी पादाक्रांत केलेला प्रदेश इ. स. ६३२ ते इ. स. ७५३.' या प्रकरणातील पहिल्या विभागाचे शिर्षक आहे इस्लाम धर्माचा उदय (RISE OF MAHOMETAN RELIGION) बंगाली पाठ्यपुस्तकात आणखी एका, ग्रंथ मालिकेला वारंवार मान्यता दिली जात असे. ऐतिहासिक पुराव्या संबंधी हा ग्रंथ मूलस्त्रोत समजला जात असे. या ग्रंथ मालिकेचे नाव आहे 'दि हिस्टरी ऑफ इंडिया अॅज टोल्ड बाय इटस्स ओन हिस्टोरियन्स' (हिंदुस्थानचा इतिहास हिंदुस्थानी इतिहासकारांनी कथन केल्याप्रमाणे) हेन्री इलिएट यांनी या ग्रंथ मालिकेचे संकलन केले होते. त्यांच्या मृत्यूनंतर जॉन डॉवसन (DOWSON) यांनी त्या मालिकेचे संपादन करून, ती मालिका इ. स. १८६७ ते १८७७ च्या दरम्यान प्रसिद्ध केली होती. ही मालिका आठ खंडाची आहे. तिच्यात मुख्यत: पार्शियन भाषेतील इतिहास ग्रंथ, आणि इतरही अनेक ग्रंथ, अशा एकूण एकशेपन्नास ग्रंथातील उताऱ्यांची भाषांतरे समाविष्ट करण्यात आलेली आहेत. हे सारे उतारे, नवव्या शतकापासून तो अठराव्या शतकापर्यंतच्या कालखंडातील आहेत. तत्कालिन आधुनिक युरोपिय संशोधकांनी आणि विद्वानांनी, अनेक प्रकारच्या संशोधनासंबंधी आपल्याला खास अधिकार व हक्क आहे असे सांगितले होते. ही ग्रंथमालिका त्या प्रवृत्तीचे एक महाप्रचंड असे उदाहरण. ऐतिहासिक जाणीव ज्या लोकांना नव्हती, त्या लोकांच्या लिखाणावर प्रक्रिया करून, तयार करण्यात आलेला हा महाप्रचंड असा प्रकल्प. (पर्शियन आणि इतर भाषातील लिखाणाला) जे लिखाण इतिहास लेखनाच्या कामी मूलाधार ठरेल असे स्वरूप त्यास देऊन त्यांनी ही ग्रंथ मालिका सिद्ध केली. त्यांनी तसे केले नसते, तर तवारिखापेक्षा, त्या लिखाणाला अधिक वरचा दर्जा मिळाला पाहिजे असा दावा, त्या मूळ भाषातील लिखाणाला क्वचितच करता आला असता, या ग्रंथमालिकेच्या प्रकाशनानंतरच्या अनेक दशकात एलिएट आणि डॉवसन यांच्या संशोधन क्षेत्रातील कार्यक्षमतेविषयी अनेकांनी मतभेद व्यक्त केले होते. त्यांच्या संशोधनासंबंधीच्या तांत्रिक (Technical) गुणाबद्दलही अनेकांनी शंका प्रकट केली होती. शिवाय त्यांनी केलेल्या भाषांतरासंबंधीही अनेक प्रश्न उपस्थित केले होते. हे सारे या ठिकाणी लक्षात ठेवावयास हवे. पण इंग्रज आल्यानंतर पर्शियन भाषेऐवजी इंग्रजी ही राज्यकारभाराची भाषा झाली. हिंदुस्थानच्या इतिहासाविषयींचे जे मूळ साहित्य पर्शियन भाषेत होते, ते एलिएट आणि डोवसन या दोन मध्यस्त्याकरवी, आता आधुनिक विद्याविभूषित बंगाली पंडितांना उपलब्ध झाले होते.

ही ग्रंथमालिका तयार करताना कोठच्या मूळ लिखित साहित्यातील कोणते साहित्य स्विकारायचे व त्याचे भाषांतर करावयाचे यासंबंधी काही मापदंड अर्थातच गृहीत धरले गेले असणार. त्या बाबतची आपली भूमिका एलिएट यांनी अगदी स्पष्ट शब्दात मांडलेली आहे.

"चकाकणाऱ्या पृष्ठभागाखाली अगदी सखोल जाणे आपणास शक्य होईल आणि जुलमी हुकुमशाही राजवटीचा प्रत्यक्ष व्यवहार काय व कसा असतो हे पहाण्यास मदत

होईल असे फारच थोडे भारतीय इतिहासात उपलब्ध आहे; तथापी भारतातील समकालीन राजवटीकडे आपण जर दृष्टीक्षेप टाकला आणि त्यातील राजपूत्रांच्या वर्तनाची व त्यांच्या व्यक्तिमत्वाची जर तपासणी केली ...... तर मग प्राचिन काळ आणि आधुनिक काळ यांच्यामध्ये आपणास एक वाजवी ठरेल अशी समांतरता दाखवून देता येईल .....आळस आणि बाहेरख्यालीपणात पार बुडालेले एखादा *कॅलीगुला (CALIGULA ) अगर एखादा कॉम्मोडूस (COMMODUS) सारख्या राजाच्या दुर्गुणांचे अनुकरण करणारे राजे आपल्या दृष्टीस पडतात .... पाटेरक्युलस (PATER CULUS) यांच्या अधिक सुखदायक अशा तोंडपुजेपणाऐवजी सुएटोनिएस (SUETONIUS) या इतिहासकाराने ज्या विश्वसनियतेने सिझर जे शब्दचित्र सादर केले आहे तसेच या इतिहासकारांनी केले असते तर एक गोष्ट घडली असती. आम्हास ज्यांचा संदर्भ घेणे, वा ज्यांच्या लिखाणातून पुरावा सादर करणे भाग पडते अशा इतिहासकारांनी तसे काही केलेले नाही. म्हणूनच आम्ही जी काही विधाने केली आहेत त्यांच्या समर्थनार्थ आम्हास अनिच्छा दर्शविणाऱ्या साक्षीदारांकडून, पुरावा जबरदस्तीने वदवून घेणे जे भाग पडले आहे, तसे काही घडले नसते. मुसलमान व्यक्तीबरोबर तंटा केल्याबद्दल हिंदुना ठार मारणे, धार्मिक मिरवणुका, उपासना, आणि धार्मिक कृत्ये यांना असलेली सर्वसाधारण बंदी, इतर अनेक प्रकारच्या असहिष्णु कारवाया, देव देवतांच्या मूर्ति फोडणे, देवळे जमिनदोस्त करणे, जबरदस्तीने केलेली बाटवेगिरी, विवाह, खून आणि कत्तली, बाहेरख्यालीपणा आणि आडमाप मद्यपान, त्यात सहभागी होणारे जुलमी राजे या साऱ्यांची झलक या अत्यंत कमी पृष्टांच्या छोट्या पुस्तकात आपणास आढळून येते. यावरून हे स्पष्ट होते की, या अनिच्छेने साक्ष देणाऱ्या व्यक्तिने रेखाटलेले चित्र अतिशयोक्त नाही. असंख्य सर्वसामान्य घटनातून, हे शब्दचित्र आमच्या इतिहास लेखनात आम्हास रेखाटणे भाग पडले आहे. आम्हास या गोष्टीचा अर्थातच खेद आहे.''*

''आपल्या राजेशाही मुसलमान आश्रयदात्याच्या दाखवेगिरीबद्दल स्तुती करणारा मजकूर'' हिंदु लेखकही लिहतात या वस्तुस्थितीविषयी एलिएट यांना 'खेद' होतो. ''ही गुलामी वृत्ती प्रकट करणाऱ्या लेखकांच्या फलटणीत असा एकही लेखक नाही, की जो आपल्या मातृभूमीचा इतिहासाला आत्मियतेने हाताळीत आहे. अथवा जी जमात अनेक शतके दडपली गेली आहे, तीने आपले विचार, भावना व आनंदाचे क्षण यांना कशा प्रकारे वाट करून दिली असेल तेही आपणास सादर करीत नाहीत.'' हे सर्व उतारे वाचकास पेश केल्यानंतर, एलिएट यांनी आपल्या वाचकासाठी पुढील निष्कर्ष काढले आहेत.

*''आमच्या (ब्रिटीश) राजवटीचा सौम्यपणा व न्याय्यता यातून जे प्रचंड फायदे आमच्या प्रजाजनास मिळणार आहेत त्याची जाण येथे उद्धृत केलेल्या उताऱ्यावरतून, आमच्या भारतीय प्रजाजनात अधिक चांगल्या प्रमाणात प्राप्त होईल. एका पादाक्रांत केलेल्या राष्ट्राला, राजकीय हक्क व वैयक्तिक स्वातंत्र्य बहाल करण्यात आलेले आहे. आजवर असे हक्क व स्वातंत्र्य इतक्या प्रचंड प्रमाणात कोणत्याही विजयी सत्तेने एखाद्या पराभूत सत्तेला कधीही*

*बहाल केले नव्हते. हे हक्क व स्वातंत्र्य याचा उपभोग घेणाऱ्या बाबूकडून त्यांच्या सद्यस्थितीतील अवनत अवस्था याबाबत केलेला आरडाओरडा आणि देशभक्ती याबद्दल आपण इत:पर ऐकून घेऊ नये. आम्ही येथे ज्याचा उल्लेख केला आहे, त्या इतिहासाच्या अनेक खंडातील कोणत्याही खंडात त्यांनी बुडी मारली तर मग काय हाती येईल? या तरुण ब्रुटसाना (BRUTUSES) आणि फोकिओन्सना (PHOCIONS) एक गोष्ट फारच थोड्या अवधीत शिकता येईल ती गोष्ट म्हणजे, आपल्या अत्यंत मूर्खपणादर्शक फॅटन्सिसजचा त्यांनी नुसता उच्चार-आरडा ओरडा त्यांनी केला असता तर त्यांच्याकडे नुसते शांतपणे अथवा तिरस्काराने पाहिले गेले नसते. याउलट तप्त शिसाचा रस त्यांच्या कानात ओतून वा त्यांना सुळावर चढवून त्यांना कडक शिस्तीचे धडे देण्यात आले असते.''*

या सर्वात एक उपरोधही दडलेला आहे. या तरुण ब्रुटस आणि फोकीओन्सना इलिएट यांनी मुसलमानी राजवटीसंबंधी जी शिकवण दिली होती; ती त्यांनी जरुर आत्मसात केली. परंतु 'एक प्रदिर्घ काळ दडपली गेलेली जमात' म्हणून ज्या नव्या जाणिवा त्यांनी हस्तगत केल्या होत्या, त्यामुळे आणखी एक गोष्ट घडली. ती म्हणजे या नव्या जाणिवांचा केवळ ईस्लामी दडपशाही व जुलूम यांचा निषेध करून पूर्णविराम झाला नाही. ते ब्रिटीश राजवटीवरही उलटले होते.

एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात 'भारत शास्त्रा'तील (INDOLOGICAL) काही युरोपिय अभ्यासकांचे एका बाबतीत एकमत झाल्याचे दिसून येते. हिंदुधर्माचा इतिहास हा एक अभिजात (CLASSICAL) युगात घडलेला इतिहास होता. दुसऱ्या काहींच्या मते चौथे शतक ते सातशे शतक यांच्या दरम्यानच्या तथाकथित गुप्तांच्या काळी झालेले पुन्नरुजीवन, हा कालखंड त्या अभिजात युगांचा होता. त्याच्या पाठोपाठ आलेले सातवे ते अठरावे शतक हा काळ मध्ययुगीन अवनतीचा काळ होता. हिंदुसंस्कृती, ही मुसलमान आक्रमकाकडून इतक्या झटकन पराभूत झाली याचे कारण मध्ययुगात झालेले हिंदु-संस्कृतीची अवनती हे होते. एकोणिसाव्या शतकातील ब्रिटीश इतिहासकारांनी असा निष्कर्ष काढला होता की 'भारतातील मुसलमान राजवटीचा काळ' हा दडपशाही जुलुम, गैरराज्यकारभार आणि अराजकता यांचा काळ होता. ते काहीही असो. मध्ययुगीन अवनतीचा जो सिद्धांत होता तो या निष्कर्षात अगदी चपखलपणे बसत होता. आता हे सांगण्याची आवश्यकता नाही की ब्रिटीशांचा भारतातील हस्तक्षेप किती न्याय होता !

एकोणिसाव्या शतकाच्या शेवटच्या वर्षात भारतीय राष्ट्रवादी, अभिजात युगाची किर्ती, त्या नंतरची अवनती आणि त्याच्या पाठोपाठ आलेली ब्रिटीश राजवट, हा आकृतिबंधाकडे एका विशिष्ट स्वरूपात पहात होते. आधुनिक युरोपिय इतिहास लेखकांनी 'अभिजात युगातील किर्ती, मध्ययुगिन अवनती, आणि आधुनिक जागरण व प्रबोधन हा आकृतीबंध जाहिर केला होता. त्यामुळे एक गोष्ट नक्की झाली होती. निदानपक्षी युरोपिय अभ्यासकांचा एक गट, भारताच्या (हिंदूच्या) बाजूने उभा रहाण्यास तयार होता. भारतीय राष्ट्रवादी या कालखंडातील



अनुक्रमणिका

घडामोडीकडे या दृष्टीकोनातून पहात होते. आता एकाच गोष्टीची आवश्यकता होती. ती म्हणजे आधुनिकीकरणाचा जो प्रकल्प होता, तो सिद्धीस नेण्यासाठी भारत राष्ट्र हे इतिहास दृष्ट्या एक साधन आहे या विचारावर आपला हक्क त्या आकृतिबंधाद्वारे प्रस्थापित होतो असे प्रतिपादन करणे. या अशा प्रकारचा दावा करण्यासाठी भारतीय आधुनिकत्वाची अभिजात अशी गंगोत्री प्राचीन भारतच आहे असे होणे अगत्याचे होते. याउलट, मग 'मुसलमानी कालखंड' हा मध्ययुगिन काळोख्या रात्रीचा कालखंड झाला असता. इस्लामसंबंधी युरोपिय ज्ञानयुगाचे जे पूर्वग्रह होते, त्या सर्वांनीच भारतीय राष्ट्रवाद्यांच्या या समजुतीस व त्या वर्णनास चांगलाच हातभार लावला होता. नव्या भारतीय राष्ट्रवादी इतिहास ग्रंथात, बाराव्या शतकानंतरचा इतिहास कथन करणारी जी प्रकरणे होती, त्या सर्व प्रकरणातून मुसलमान या व्यक्तिची छबी अगदी एकछापी होती. या छबीत चित्रित झालेल्या 'मुसलमानाची एक 'राष्ट्रीय प्रकृती' होतो. तो धर्मवेडा, धर्मांध, युद्धपिपासू, स्वैराचारी आणि क्रूर होता.'

**मुसलमानी जुलूम दडपशाही हिंदू प्रतिकार**

अरबस्थानात इस्लामचा जन्म झाल्यानंतर या कथेस आरंभ होतो. अर्थात त्यानंतर या कथानकाचे स्थलांतर भारतात होते. परंतु हे सारे एकदम घडत नाही, पायरी पायरीने घडते. *तारिनिचरण* यांनी अरबांनी सिंधवर केलेल्या स्वाऱ्यांची चांगली लांबलचक वर्णने वाचकास सादर केली आहेत. तसेच महंमद गझनवी यांनी भारतातील वेगवेगळ्या हिंदू राज्यावर एका पाठोपाठ घातलेल्या अनेक धाडींचे वर्णनही त्यांनी ग्रंथित केले आहे. हे सारे तेराव्या शतकाच्या सुरुवातीला तथाकथित 'गुलाम घराण्या'ची दिल्लीच्या सिंहासनावर स्थापन होण्यापूर्वी घडते. या सर्व वर्णनातून एका समान अशा आकृतिबंधाचा मागोवा घेता येतो. येथे दिलेल्या तीन उदाहरणाकडे दृष्टीक्षेप टाकून या आकृतिबंधाचे स्वरूप स्पष्ट करता येईल. उदा. *तारिनिचरण* यांनी वाचकास सादर केलेले प्रसंग (१) महंमद बिन कासिम यांची सिंध वरील स्वारी (२) महंमद गझनवीचा पंजाब वरील हक्क (३) ठाणेश्वर येथे महंमद घोरीने मिळविलेला विजय.

इ. स. ७१२ साली सिंधच्या दाहिर राजा विरुद्ध महंमद कासिम यांनी आपल्या स्वारीस सुरुवात केली.

*नशिबाने कासिमला हात दिला. त्याच्या सैनिकाने फेकलेला तोफेचा एक गोळा दाहिर राजाच्या हत्तीला लागला. हत्ती घाबरला आणि रणमैदान सोडून तो पळाला. दाहिरच्या सैनिकांना वाटले, की राजाने शरणागती पत्करली आहे, आणि त्यांची पांगापांग झाली. मागाहून असे दिसून आले की भारतीयांना विजय प्राप्त करून घेण्याची फारच मोठी संधी होती. अशा प्रकारच्या दुर्दैवाने हिंदुचा मुसलमानाकडून अनेक वेळा पराभव झाला.*

या ठिकाणी एका मुद्याची नोंद घेतली पाहिजे. *तारिनिचरण* ज्यास दैव आणि 'दुर्दैव' म्हणतात त्याचा अर्थ मृत्युंजयाच्या कथानकात त्या शब्दांत जो अभिप्रेत आहे त्यापेक्षा वेगळा आहे. मृत्युंजयांच्या लेखी 'दैव' वा 'दुर्दैव' यांचा अर्थ ईश्वरी हस्तक्षेप असा होता. तारिनिचरण

यांच्या लेखी दुर्दैव याचा अर्थ अपघात असा होता. काकतालीय न्यायाने घडलेली गोष्ट, वा अनैतिक वागणूकीबद्दल मिळालेली शिक्षा, याची सुचनाही त्यात 'अर्थातच' नाही. हे 'दुर्दैव' हे त्या राजाचे नसून, ते 'भारतीयांचे' होते. भारतीयांना खरे म्हणजे विजय मिळावयास हवा होता. परंतु वर्णन केलेले 'अपघात' झाल्याकारणाने, त्यांचा एकसारखा पराभव होत होता.

*"सरतेशेवटी दाहीर राजाने कमालीचे शौर्य दाखविल्यानंतर, शत्रूने त्यांना ठार मारले. त्यांच्या राजधानीस वेढा घालण्यात आला. परंतु दाहीर राजाच्या राणीने आपल्या पती प्रमाणेच धीर व हिम्मत दाखविली, आणि राजधानीचा बचाव करण्याचे काम चालूच ठेवले. अखेरी शहरातील अन्नसाठा संपला. शत्रूला शरण जाण्यापेक्षा, राणीने मरण अधिक पसंत केले. हे ठरविल्यानंतर तीने राजधानीतील रहिवाशांना आवश्यक ती व्यवस्था करण्यास सांगितले. सगळ्यांनी संमती दर्शविली. सर्वत्र चिंता पेटविण्यात आल्या. स्त्रियांनी आपला देह अग्निला समर्पित केल्यानंतर पुरुषांनी त्यांची क्रियाकर्मे केली. यानंतर सारे पुरुष हाता तरवारी घेऊन बाहेर पडले आणि मुसलमानांनी त्यांना लवकरच ठार केले."*

पराभवाच्या या अशाच कथा मागाहूनही येतात. या ठिकाणी दोन महत्त्वाच्या लक्षणांची नोंद घेणे उपयुक्त (WORTH) ठरेल. (१) आक्रमणाचा प्रतिकार करताना हिंदू स्त्रियांनी दाखविलेली हिम्मत व धैर्य. (२) हिंदु पुरुषांनी लढाईत मरण पत्करणे. हे आत्मबलिदान एखाद्या कर्मकांडासारखे होते. एवंच, या अशा कथानकात पुढे नमूद केलेले काही दर्शक आढळतात." 'सर्वत्र चिंता पेटविण्यात आल्या' आणि 'त्यांची क्रियाकर्मे पूर्ण केल्यानंतर मुसलमानाकडून मारले गेले.' मुसलमान सैनिकांचे वर्णन करताना पुढील दर्शक आढळतात. 'हरिणाक्षी अशा सुंदर अप्सरावरोबर समागम करावयास मिळेल या संभव्यतेच्या प्रेरणेने ते आगेकूच करीत !'

*तारिनिचरण* यांनी कासिम विषयी आणखी एक कथा सांगितली आहे. येथे उल्लेखिलेल्या कथानकाच्या रचनेतील तो एक भाग आहे.

*"कासिमने सिंध पादाक्रांत केल्यानंतर, तो भारतात आणखी मुसंडी मारण्याची तयारी करीत होता. एका स्त्रीच्या उपक्रमशीलतेमुळे, त्याचा हा हेतू पार धुळीला मिळाला. सिंध बरोबरच्या युद्धात त्याने अनेक स्त्रिया 'काबिज' केल्या होत्या. त्यात दाहिर राजाच्या दोन कन्या होत्या. या दोन कन्यांचा श्रेष्ठ अशा राजकुळात जन्म झाला होताच. परंतु त्या लाखोतही उठून दिसतील अशा असामान्य सुंदर होत्या. खलिफाला हा अतिशय योग्य असा नजराणा आहे असे कासिमला वाटले. या दोन बहिणीतल्या थोरल्या बहिणीच्या सौंदर्याने तो मुसलमान धर्मियांचा सर्वश्रेष्ठ अधिपती वेडापिसा झाला. तिच्याशी समागम करण्याच्या अभिलाषेने तो तिच्याकडे दृष्टीक्षेप टाकू लागला. हे पाहून त्या थोरल्या बहिणीने अश्रु ढाळण्यास सुरुवात केली आणि ती म्हणाली "आपल्या सारख्या थोर माणसांचे प्रेम स्वीकारण्याच्या लायकीची मी नाही, ही एक दुर्दैवाची गोष्ट आहे. याचे कारण असे आहे की कासिमने माझा अगोदरच उपभोग घेऊन मला भ्रष्ट केले आहे." आपल्या नोकराच्या या*

*कृत्याचा वृत्तांत ऐकल्यानंतर खलीफा संतप्त झाला. त्याने असा हुकूम फर्माविला की, कासिमला (ठार मारून) त्याच्या कातडीतच त्याला शिवून, खलिफासमोर हजर करा. या हुकूमाची अंमलबजावणी झाली. खलिफाने कासिमचे प्रेत त्या राजकन्यांना दाखविले. त्या राजकन्यांचे डोळे आनंदाने चमकले. नंतर थोरली राजकन्या म्हणाली, ''कासिम हा सर्वस्वी निरपराध आहे. मी माझ्या वडिलांच्या मृत्यूचा आणि त्यांच्या प्रजाजनांची जी अहवेलना झाली होती, त्यांचा बदला घेण्यासाठी मी तो आरोप केला होता.''*

हिंदु स्त्रियांकडे धैर्य व हिम्मत हे गुण होतेच, या गुणांच्या यादीत आणखी एका गुणाची भर पडली. 'बुद्धीमत्ता'. आत्मबलिदानाला समांतर अशा एका आणखी एका कथानकाची निर्मिती करण्यात आलेली होती. ती म्हणजे आपल्या स्वत:च्या नातेसंबंधात असलेल्या एखाद्या व्यक्तिच्या मृत्युनंतर, शत्रूवर उमटविलेला सूड आणि घेतलेला बदला.

आपण अकराव्या शतकाच्या आरंभाकडे परतू या. हा महंमद गझनीचा काळ. ''महंमद गझनीच्या आक्रमणाने एक गोष्ट झाली. इतर मुसलमान आक्रमकानाही ती तोवर जमली नव्हती.'' ती म्हणजे भारत प्रथमच वेचिराख झाला आणि त्याची राजव्यवस्था पार कोलमडली. या महंमद गझनीच्या आक्रमणानंतर हिंदूच्या स्वातंत्र्याला ओहोटी लागली आणि पौर्णिमेचा चंद्र जसा कलेकलेने नाहीसा होत जातो, तसेच हिंदूचे झाले. *तारिनिचरण* यांनी महंमद गझनीच्या काही गुणांची नोंद घेतलेली आहे. धैर्य, दूरदृष्टी, व्यूहरचना आणि डावपेचातील कौशल्य; जिद्द आणि चिवटपणा इत्यादी त्याच्या गुणांची नोंद ते घेतात. परंतु त्याच्या इतर गुणाकडे पार दुर्लक्ष करतात. एलिफिस्टन यांनी महंमद गझनवी हा कला आणि साहित्य यांचा आश्रयदाता होता असे सांगितले आहे. *तारिनिचरण* या गुणांचा उल्लेखही करीत नाहीत. ते पुढे जाऊन असे सांगतात की 'वर उल्लेखिलेले गुण महंमद गझनवी यांच्याकडे असले तरी, तो निदान जाहिरपणे तरी मुसलमान धर्माचा निष्ठावंत पाईकच होता. थोडक्यात सांगावयाचे झाल्यास, तो मुर्तीपूजेचा अत्यंत कडवा विरोधक होता. तसेच संपत्ती आणि प्रसिद्धी यांचा अथकपणे पाठपुरावा करणारा होता. मुसलमानांची जी तथाकथित वैशिष्ट्ये व प्रकृती होती, त्या तथाकथित गुणांचे हे आणखी एक उदाहरण. हेच अधिक उघड करून सांगावयाचे झाल्यास, इस्लामवरची श्रद्धा हे युद्धास पुरेसे कारण असले, तरी ती श्रद्धा अस्सल वा खरी नव्हती. आपण धर्मनिष्ठ आहोत असे भासविण्यासाठी तो देखावा होता.

महंमदाने शाहिया घराण्याचा राजा आनंदपाल याच्यावर स्वारी केली.

''सर्व भारताचा नाश करावयाचा आणि हिंदु धर्माचा समुळ उच्छेद करण्याचा महंमदाने निश्चय केला होता. मुसलमानांनी लाहोर जिंकल्यानंतर ते भारत वर्षाच्या इतर भागावार हल्ला करणार होते. म्हणूनच *म्लेच्छांची* शक्ती निपटुन टाकण्यासाठी, सर्व हिंदू राजांनी एकत्र येण्याची अत्यंत गंभीर अशी आवश्यकता होती; (*एलिफिन्सटन* आणि *तारिनिचरण* यांनी हा मुद्दा नमूद केला आहे. एलिफिन्सटन आनंदपाल ऐवजी आनंगपाल असे लिहितात) असे

सांगून, आनंदपाल यांनी सर्व प्रमुख हिंदू राजाकडे आपले दूत पाठविले. त्यांच्या आवाहनाला प्रतिसाद मिळाला नाही असे नाही. त्याला प्रतिसाद मिळाला. दिल्ली, कनोज, उज्जैन, ग्वाल्हेर, कालीनगर आणि इतर ठिकाणच्या राजांनी आनंदपाल यांच्याबरोबर एकजूट केली. विरोधकांच्या सामर्थ्यात या एकाएकी पडलेल्या भरीमुळे, सुरक्षिततेचं कारण लक्षात घेऊन महंमदाने पेशावर जवळ थांबविण्याचे ठरविले, हिंदुच्या सैन्यात व शक्तीत दिवसेंदिवस भर पडतच होती. दूरवरच्या भागात राहणाऱ्या हिंदु स्त्रियांनी आपली रत्ने, माणके विकली. आपले सोन्याचे दागिने वितळविले, आणि असे करून युद्ध साहित्याचा पुरवठा व्हावा म्हणून ते रवाना केले.'' एकदा लाहोर पडले की मग ''सर्व भारतवर्षाच्या स्वातंत्र्याचा विनाश' करण्यासाठी महंमद आगेकूच करील या इतिहासविषयक दूरदृष्टीची अटकळ राजे आनंदपाल यांना होती हे असंभवनीय असेच आहे. हे खुद्द तारिनिचरण यांचे शब्द आहेत हे सांगण्याची आवश्यकता नाही. परंतु हे शब्द पंजाबच्या राजाच्या तोंडी घालुन तारिनिचरण यांनी या युद्धाच्या कथानकाचे रूपांतर हिंदु जातीच्या युद्धात केले. 'आनंदपाल यांना येऊन राजे मिळाले'. 'हिंदुच्या सैन्यात दररोज भर पडत होती'. 'दुरवरच्या भागात राहणाऱ्या हिंदु स्त्रियांनी, युद्ध साहित्याची मदत पाठविली'. इत्यादी, इत्यादी. परंतु यानंतर अटळ असा कमनशिबाचा तडाखा आला. मुसलमानांच्या बाजूने आलेला अग्निबाण, अथवा धारदार बाण हिंदु सैन्याचा सेनापती अनंदपाल याच्या हत्तीला लागला. आपल्या पाठीवर असलेल्या राजासकट, त्या हत्तीने रणभुमीवरून पळ काढला. हे झाल्यानंतर हिंदु सैनिकात बेदिली निर्माण झाली.''

या प्रसंगाचा शेवटही सुडाच्या कथानकानेच होतो. परंतु यावेळी त्याचे स्वरूप जरा वेगळे आहे. ''कनोजच्या राजाने महंमदाबरोबर सहकार्य केले होते. म्हणून तो हिंदू राजांच्या परिमंडळात एक तुच्छतेचे व द्वेषाचे लक्ष बनला होता'. हे गझनीच्या कानावर गेल्यानंतर या मुसलमान राजाने, आपल्या आश्रिताचे संरक्षण करण्यासाठी दहाव्या वेळी भारतात प्रवेश केला. परंतु महंमद भारतात पोचण्या अगोदरच कालीनगरच्या राजाने, कनोज राजाचा वध केला होता.'' आता हे सांगण्याची आवश्यकता नाही, हे कृत्य सुद्धा एक छोटासा धर्मविधी (RITUAL) होता. याचे कारण तो वध नव्हता, तो वध (बळी) देण्याची कृती धार्मिक होती.

*यापुढे महंमद घोरी संबंधी तारिनिचरण आपणास असे सांगतात की घोरींचे सैनिक 'हे डोंगरातले रहिवाशी, चांगले कणखर, आणि युद्धनिपुण. त्यांच्याशी तुलना करता, एकतर हिंदू राजात ऐक्य नव्हते, त्यांचे सैनिक हे त्यामानाने कसल्याही प्रकारची उभारी न दर्शविणारे, शामळू आणि बेशिस्त असे होते. या सर्वांचा परिणाम म्हणून, मुसलमानांना विजय सहज प्राप्त होईल अशी अपेक्षा होती. परंतु प्रत्यक्षात तसे काही घडले नाही. एकाही हिंदू राजाने प्रखर व बलशाली असा संघर्ष केल्याविना शरणागती पत्करून आपले स्वातंत्र्य गमविले नाही. विशेषत: राजपुतान्यातील राजांचा (विद्यमान राजस्थान) कधीही पराभव झाला*

*नाही. मुसलमानी सत्तेचा उदय, त्याची स्थिरस्थावर, आणि त्याचा विनाश हे सर्व काही धडले. परंतु आजतागायत राजपुताना हा स्वतंत्रच राहीला आहे.'*

हिंदूनी प्रतिकार केल्याविना कधीही शरणागती पत्करली नाही. इतकेच नव्हे तर महंमदाने केलेल्या पहिल्या हल्यानंतर हिंदूनी महंमदाचा चांगला वीस कोस (सुमारे ६५ किलोमीटर) पाठलाग करून त्याला मागे रेटले होते. महंमदाच्या दुसऱ्या हल्याच्या वेळी, जयचंद राजाने केलेला विश्वासघात आणि कसलाही नैतिक विधिनिषेध न बाळगणारी महंमदाची वागणूक या दोन्ही कारणामुळे पृथ्वीराजाचा पराभव झाला. मृत्यूंजयांनी या घटनेबाबत सादर केलेला जो वृत्तांत आहे, तो तारिनिचरण यांनी पेश केलेला जो वृत्तांत आहे त्याच्याशी अजिबात मिळता-जुळता नाही. तारिनिचरणांच्या वृत्तांताच्या शेवटीही सुडाची एक कथा आहेच. डोंगरकपारीत राहणाऱ्या एका जमातीला *तारिनिचरण* यांनी गोकसूर (GOK SUR) हे नांव दिले आहे. *एलिफिन्सटन* यांनी त्यांना गक्कर (GAKKAR) या नावाची टोळी म्हटले आहे. महंमदाने या टोळीचा पराभव केला होता. एक दिवशी या जमातीतील टोळीतील काही लोक महंमदाच्या तंबूत प्रवेश मिळविण्यात यशस्वी झाले; आणि पराभवाचा बदला व सूड म्हणून त्यांनी सुलतानाला ठार केले. सलतनतची एकदा प्रस्थापना झाल्यानंतर या मुसलमान असहिष्णु राज्यकर्त्यांनी हिंदुवर केलेल्या दडपशाही व अत्याचार यांच्या वृत्तांताची उजळणी अनेक वेळा झालेली आहे. उदा. सिंकदर लोदी.

''गंगा आणि इतर पवित्र नद्यात स्नान करणे, आणि तिर्थाटन करणे, या दोन्हीसही सिकंदराने बंदी घातली. अनेक ठिकाणची देवळे त्याने उद्ध्वस्त केली. एका ब्राम्हणाने असे जाहिर केले होते की, *'जो धर्म निष्ठेने, दाखवेगिरी न करता, मनोभावे पाळला जातो, अशा प्रत्येक धर्माला परमेश्वर मान्यता देतो' हे जाहिर करणाऱ्या ब्राम्हणाला सिंकदरासमोर हजर होण्याचा हुकुम देण्यात आला. परंतु आपला सहिष्णु दृष्टीकोन त्याज्य ठरविण्यास या ब्राम्हणाने नकार दर्शविल्याकारणाने, या क्रुर व जुलमी राज्यकर्त्याने त्याला ठार मारले. सुलतानाने, हिंदुंनी तीर्थयात्रा करण्यावर जी बंदी घातली होती, त्यावर एक धार्मिक व सच्छिल मुसलमानाने टिका केली, हे झाले तेव्हा सुलतान संतापला व ओरडला 'हरामखोरा, याचा अर्थ तू मूर्तिपूजकांचा पाठीराखा आहेस' यावर त्या धार्मिक व सच्छील मुसलमानाने उत्तर दिले, 'नाही, मी जे काही करतो, ते आपण म्हणता तसे नाही. मी जे सारे काही म्हणतो आहे, त्याचा मतितार्थ एकच आहे. तो म्हणजे राज्यकर्त्याने आपल्या प्रजाजनांची दडपशाही करणे, हे अन्याय आहे.'*

*तारिनिचरण* यांच्या टिकेचे हे बाण, जेव्हा औरंगजेब विरुद्ध फेकण्यात येतात तेव्हा ते कमालीचे धारदार व अणकुचीदार बनतात. 'औरंगजेब हा लफंगा, खोटारडा, खुनी आणि दुसऱ्यांच्या संपत्तीची लुटमार करणारा होता.' 'इस्लाम या धर्मावर आपली श्रद्धा आहे असे जाहिर करून आपले हितसंबंध सुरक्षित कसे राहतील या विषयीचा मार्ग तो सुकर करीत होता ..... वास्तविक आणि खरे म्हणजे धर्म, अथवा न्याय यांच्या बाजूने उभे

राहण्यासाठी, आपल्या हितसंबंधावर औरंगजेवाने कधीही पाणी सोडले नव्हते.' ही मते व्यक्त केल्यानंतर, *तारिनिचरण* हे अकबराविषयी मते व्यक्त करतात. जी अर्थातच पराकोटीची वेगळी आहेत. परंतु *तारिनिचरण* ते जे काही हे करीत होते त्याची कारणे अगदी वेगळी होती. ही कारणे तशी लक्षवेधी व मती गुंग करणारी आहेत.

*"ईस्लाम धर्माने आज्ञा केलेल्या पण बुद्धीला न पटणाऱ्या काही प्रथांचे उच्चाटन करण्याचा प्रयत्न अकबराने केला. तशाच प्रकारच्या हिंदुच्याही अनेक प्रथा थांबविण्याचा प्रयत्न त्याने केला. अग्निपरीक्षा, बालविवाह आणि आपल्या इच्छेविरुद्ध एखाद्या स्त्रिला सती जावयास भाग पाडणे त्या सर्व प्रथांना पायबंद घालण्याचा प्रयत्न केला. विधवांना पुर्नविवाह करण्याची त्याने परवानगी दिली. धर्मासंबंधी अकबराचा जो उदार दृष्टीकोन होता, त्यामुळे अनेक सनातनी मुसलमानांनी त्याला प्रखर विरोध केला. अनेक जणांनी तो निरिश्वरवादी आहे असेही म्हटले."*

एवंच धार्मिक बाबतीत अकबर नि:पक्षपाती होताच. परंतु केवळ त्यामुळेच अकबर हा स्तुतीला पात्र होत नाही. या नि:पक्षपातीपणाला हिंदु आणि मुसलमान या दोन्ही धर्मात सुधारणा करण्यासाठी आपल्या हातातील राजसत्तेची जोड अकबराने दिल्याकारणाने तो स्तुतीस पात्र ठरतो.

अकबराचे जे एकंदर धोरण होते, त्या संदर्भात काही विशिष्ट हिंदू राजे, आणि मुसलमान राज्यकर्ते यांच्यात जे नातेसंबंध प्रस्थापित झाले होते, त्याबाबतचा प्रश्न पुन्हा एकदा डोके वर काढतोच. त्याचे असे आहे की रजपुत राजकन्यांचे मोंगलाबरोबर झालेले विवाह या विषयावर *तारिनिचरण* लिहतात.

"या अशा प्रकारच्या विवाहांना, ज्या रजपुतीनी संमती दिली, त्यांच्यावर (अकबर) बादशहाची खास मर्जी होती. हे असे विवाह अपमानास्पद आहेत आणि आपल्या 'जाती'चा त्यामुळे विनाश होतो, अशा दृष्टीकोनातून या रजपूतांनी या विवाहाकडे पाहिले नाही. हे विवाह, त्यांना आनंददायी, संतोषजनक आणि आपला स्वत:चा सन्मान करणारे आहेत, असे या रजपूत राजांस वाटत होते. या विचारसरणीस उदेपूरच्या राजघराण्याने, कधीही मान्यता दिली नाही. यवन-प्रेमी राजाबरोबर असलेले सर्व प्रकारचे संबंध, उदेपूरच्या राजाने तोडून टाकले. केवळ याच कारणासाठी, उदेपूरच्या राजघराण्याचा आजही मोठा सन्मान करण्यात येतो. रजपुत राजघराण्यात, उदेपूरचे राजघराणे हे एकच अगदी अस्सल 'जातीवंत' घराणे आहे असे रजपुततही मानण्यात येते. या अशा राजघराण्याबरोबर आपला काही सामाजिक संबंध असणे, हा आपला फारच मोठा बहुमान आहे असे (इतर) रजपुत राजे मानतात."

**राष्ट्रीय इतिहासावर इतर घटक सांगत असलेला आपला हक्क**

*तारिनिचरण* यांच्या या मान्यवर ग्रंथाचे पुर्नमुद्रण दरवर्षी होतच होते. पण त्याजबरोबर इतर या विषयातील पाठ्यपुस्तके हा ग्रंथ आदर्श समजत असत. 'हिंदुस्थानच्या

इतिहासाबाबतची प्रश्नोतरे' या नावाचे एक पाठ्यपुस्तक होते. बारीसालचे *सैय्यद अब्दूल रहीम* हे त्याचे लेखक. त्यांनी आपले पाठ्यपुस्तक *तारिनिचरण* यांच्या ग्रंथावरून बेतलेले आहे. फक्त त्यात फारच थोडे पण महत्त्वाचे असे बदल केले आहेत.

पुस्तकाच्या अगदी आरंभालाच, अब्दुल रहीम हे 'आर्या' बाबतचा जो वृत्तांत आहे तो *तारिनिचरण* यांच्यापेक्षा वेगळ्याच प्रकारे सादर करतात. ते म्हणतात 'हिंदू हे भारताच मुळातले रहिवाशी नाहीत. सिंधु नदीच्या पश्चिमेकडून ते भारतात आले, आणि शस्त्र बळाच्या जोरावर ते भारताचे रहिवाशी बनले.' याबाबत तारिनिचरण यांनी लिहिले आहे 'आर्यांच्या संप्रदायात बिगर आर्यांना सामावून घेण्यात आले होते किंवा 'आर्यांनी आपल्या वसाहती स्थापन केल्या' अगर 'हिंदुचा झेंडा फडकावला' हा सारा मुळातला वृत्तांत बदलून 'शस्त्र बळाच्या जोरावर ते भारताचे रहिवाशी बनले' असा बदल करण्यात आला होता.

सय्यैद अब्दुल रहीम यांच्या या पाठ्यपुस्तकाचा उरलेला भाग ही *तारिनिचरण* यांच्या ग्रंथाचीच नक्कल आहे. तो भाग मूळ ग्रंथातील प्रतिपादनापासून जराही दूर जात नाही, उदा. महंमद गझनी आणि महंमद घोरी या दोघांपैकी घोरीने हिंदु समाजाचे अधिक नुकसान केले. महंमद गझनची यांनी हिंदुची फक्त लुटमारच केली. या उलट महंमद घोरीने हिंदु समाजाचा अत्यंत महत्त्वाचा असा जो ठेवा त्यांचे स्वातंत्र्य त्या स्वातंत्र्याचेच अपहरण केले, किंवा दयाळू *'महात्मा'* अकबर यांने जिझिया कर रद्द ठरविला, पण दुरात्मा औरंगजेब यांने तो पुन्हा जारी केला. रहीम यांच्या प्रश्नोत्तर इतिहासात एका प्रश्नाचे उत्तर देताना एका स्पष्टीकरणाची जोड दिली आहे. या स्पष्टीकरणात त्यांनी म्हटले होत. 'मोगल साम्राज्य कोसळण्याचे कारण, औरंगजेबची दडपशाही आणि धर्मांधता हेच होते' *तारिनिचरण* यांनी या संदर्भात दिलेल्या स्पष्टीकरणाचा हा प्रतिध्वनी आहे.

सर्वात महत्त्वाचा बदल या पाठ्यपुस्तकातील शेवटच्या प्रश्नाच्या उत्तरात अवतीर्ण होतो.

*"शिक्षक– मुसलमानी राजवटीचा इतिहास वाचून, तुम्ही काय तात्पर्य काढले आहात? विद्यार्थी-मुसलमानी राजवटीचा इतिहास वाचून, मी निश्चितपणे पुढील तात्पर्य काढले आहे. एखाद्या प्रदेशावर राज्य करणे याचा अर्थ या जगात आणि या आयुष्यानंतरच्या जगातल्या आपल्या आयुष्याचा विनाश करणे हाच आहे. दया दाखविणे आणि क्षमा करणे या ईश्वराने आपणास दिलेल्या देणग्या आहेत. राज्य करायचे म्हणजे या देणग्यांचा सदैव त्याग करावा लागतो. राज्य करण्यासाठी, आपल्या बालपणीची वर्षे ज्या भावांच्या सहवासात घालविली त्यांच्या रक्ताने ही पृथ्वी लाल करावीच लागते. हे किती शोकजनक आहे. हे साम्राज्या . . . ! मानवी ह्रदयाचे रूपांतर तू फत्तरात कसे करतोस हा बोध मी मुसलमानांच्या इतिहासावरून चांगलाच घेतला आहे. हे साम्राज्या केवल तुझ्या प्राप्तीसाठी आमच्या माता-पित्यांचा, किंवा आपल्या भावा-बहिणीचा वध करणे किंवा धर्माने दिलेल्या महान ठेव्याचा बळी देणे या गोष्टी आपल्या खिजगणतीत घेता येत नाही. हे साम्राज्या तुझी फूस लावण्याची ताकद किती महान आहे."*



अनुक्रमणिका

*तारिनिचरण* यांच्या या ग्रंथाचे आलोकन केल्यानंतरही कार्यकारणभावातील विलोभर्नीयतेचा आस्वाद फारसा घेताच येत नाही. याचे कारण, कार्यकारणभाव स्पष्ट होईल असे मार्गदर्शन व आपल्या प्रतिपादनाचा विकास तारिनिचरण यांनी आपल्या ग्रंथात केलेला नाही. याउलट सैय्यद अब्दुल रहमान यांनी आपल्या स्वत:च्या शब्दात मृत्युंजना अभिप्रेत असलेल्या प्रजाजनांचा आवाज वाचकाच्या कानावर अजूनही जाईल असे केलेले आहे.

परंतु तो आवाज यानंतर फार काळ आपणास ऐकूच येणार नाही. भारतीय संस्कृतीच्या अभिजात परंपरेत इस्लामला काहीही स्थान नाही असेच सुचित होत होते. हा विचार जर मान्य झाला तर मग नव्या युगात नव्या पद्धतीने केलेल्या इतिहास लेखनात, अभिजात भारतीय परंपरेपेक्षा इस्लाम हा अगदी वेगळा, अथवा तिला पर्याय असा घटक आहे असेच मानले गेले असते. *शेख अब्दुल रहिमान* यांनी प्रेषितांचे (महंमदाचे) चरीत्र इ. स. १८८६ साली लिहिले. *तारिनिचरण* यांनी आपल्या ग्रंथात युरोपियन विद्वानांच्या लिखाणातील उतारे उद्धृत केले होते. *अब्दुल रहिम* यांनीही तसेच उतारे, आपण केलेल्या दाव्याच्या व युक्ति-वादाच्या समर्थनार्थ केलेले आहेत. त्यांनी असे म्हटले आहे की मनुष्य प्राण्याला *(जातीला)* ख्रिश्चन धर्मापेक्षा इस्लाम हा कितीतरी लाभदायक ठरलेला आहे. आशियातील मुसलमानांनी आणि स्पेन मधील मूर या लोकांच्या मार्फत, तत्वज्ञान आणि विज्ञान या दोन ज्ञानशास्त्रातील ज्ञान युरोप खंडात नेण्यात आले ..... युरोपमधील तत्वज्ञान या ज्ञानशाखेचे स्पेनमधील मूर म्हणून ओळखले जाणारे मुसलमान हे संस्थापक आहेत. युरोपियनांनी मुसलमानांविरुद्ध केलेल्या त्यांच्यामते खोट्या असलेल्या आरोपांचे खंडणही त्यांनी केलेले आहे.''

ते म्हणतात,

*''आजवर बंगाली भाषेत प्रेषित महंमदाची जी चरित्रे लिहिली गेली आहेत. ती सर्व परीने अपूर्ण आहेत. विशेषत: या चरीत्र लेखकांनी या विषयावर लिहिताना, इंग्लिश भाषेतील पुस्तकांचे अनुकरण केल्या कारणाने, मुसलमान वाचकाच्या दृष्टीने ती अनेक बाबतीत गैरसोयीची आहेत. मुसलमानांनी तरवारीच्या जोरावर धर्माचा प्रसान केला, असे खोटे आरोप या इंग्लिश लेखकांच्या पुस्तकातून केलेले आहेत. या आरोपात फारसे तथ्य नाही, असे या पुस्तकाने (अब्दुल रहीम यांच्या) दाखवून दिले आहे.''*

हिंदु इतिहासकारांनी भारतातील मुसलमान राजवटींच्या केलेल्या मूल्यमापनाचाही त्यांनी इन्कार केला आहे व ते मूल्यमापन चुकीचे आहे असे सांगितले आहे. त्यांच्या मते, धर्माचे कारण दाखवून मुसलमान राजांनी प्रजेवर दडपशाही केली हे खरे आहे. परंतु ही त्या राजांची कृत्ये इस्लाम धर्माशी विसंगत अशी होती. म्हणून इस्लाम धर्मावर त्या कृत्यांच्या आधारे आरोप करता येणार नाहीत.

एकोणिसाव्या शतकाच्या शेवटच्या दशकात हेच लेखक अब्दुल रहिमान, *मिहीर अे* 'सुधाकर' या पत्रिकेचे संपादक होते. या पूर्वीच्या दशकात बंकिमचंद्रांनी आपल्या 'बंगदर्शनात' ज्या प्रकारची भाषा वापरून राष्ट्रीय इतिहासाबाबत आवाहन केले होते. तशीच

भाषा वापरून बंगाल मधील मुसलमानांना योग्य ठरेल, असा 'राष्ट्रीय इतिहास' लिहिण्याबाबत *अब्दुल रहिमान* यांनी आवाहन केले होते. या आवाहनास प्रतिसाद देऊन *अब्दुल करीम* (१८६३ ते १९४३) यांनी भारतातील मुसलमानी राजवटीचा इतिहास लिहिला. *इस्माईल हुसेन सिराजी* (१८८० ते १९३१) यांनी अनल प्रभा नांवाच्या ऐतिहासिक पोवाडा लिहिला (HISTORICAL BALLAD) इंग्लिश शिक्षित आधुनिक मध्यम वर्गाच्या ज्या कल्पना व विचार, ज्यांनी स्पष्टपणे आत्मसात केले होते, असे ते लेखक होते. आम जनतेचे आपण नेते आहोत याचे भान असलेले ते लेखक होते. या ठिकाणी बंगाल मधील मुसलमान प्रजेचे ते नेतृत्व करीत होते. 'हे साम्राज्या . . . फुस लावण्या बावतची तुझी ताकद किती जादूमय व संमोहनीकारक आहे' अशा शोकजनक शब्दात ते आपल्या ग्रंथाचा शेवट करणारापैकी नव्हते.

*अब्दुल करीम* यांच्या इतिहास लेखनाचे उद्दिष्ट वेगळेच होते. भारतातील मुसलमानी राजवटीचा इतिहास लिहिण्याचे त्यांनी ठरविले याचे कारण त्यांची अशी श्रद्धा होती की भारतातील मुसलमानांच्या किर्तीदायी कामगिरीचा खराखुरा वृत्तांत सादर केल्याने मुसलमानांच्या खऱ्याखुऱ्या गुणांचा लोकांना परिचय होईल. मुसलमानांचे शौर्य, धीरोदत्तपणा, उदारता आणि ज्ञानाबद्दलचे प्रेम या सर्वाविषयी आम जनतेला ज्ञान होईल. असे झाले म्हणजे मग हिंदु आणि मुसलमान यांच्यामध्ये अधिक सामंजस्य व प्रेम निर्माण होण्यास मदत होईल. भारतातील मुसलमानी राजवटीची सुरुवात प्रेषित महंमद पैगबरांच्या जन्मापासून; अरबांनी हा धर्म स्विकारल्यानंतर होते. थोडक्यात अरबांनी 'चुकीच्या श्रद्धा, लोकभ्रम आणि खोट्या चालीरिती' यांचा त्याग करून 'नवे ऐक्य व बंधुभाव यासंबंधीच्या नव्या भावना व विचार पत्करल्यानंतर, मुसलमानाच्या इतिहासाला यात भारतातले मुसलमान आलेच- सुरुवात होते. या नव्या भावना, विचार व कल्पना या सर्वांमुळे' आजवर कोणालाही प्राप्त झाली नव्हती अशी शक्ती असलेली *'जात'* बनणे अरबांना शक्य झाले होते.

सिंध प्रांतावरच्या सुरुवातीच्या स्वाऱ्यांची हकीकत सांगताना त्यांना थोडी अडचण येत होती. ती लक्षात घेऊन, याबाबतचा वृत्तांत कथन करताना त्यांनी फारच काळजी घेतली आहे. हा वृत्तांत लिहिताना, अरब सेनाधिकारी हे युद्धातही न्यायाची बूज कशी राखीत होते, आणि सामाजिक चालचालणूक, मानमरातब याबद्दलच्या परंपरांचा आदर कसा अगदी कांटेकोरपणे करीत होते, हे सारे सांगतात. परंतु हे सारे करताना *अब्दूल करीम* यांना फारच कसरत करावी लागली होती.

*"महंमदाने किल्ला जिंकून घेतला आणि सर्व शस्त्रधारी पुरुषांना ठार केले. परंतु सर्व व्यापारी कारगिर आणि सर्वसामान्य जनता यांना या कत्तलीतून वगळले. यानंतर कासिमने (HEJAZ) हेजाझला पत्र पाठविले आणि विचारले की हिंदुनी आपल्या धर्मानुसार वागण्यात व तो धर्म मानण्यास परवानगी घ्यावी का? हेनाझने उत्तर पाठविले की "आता त्यांनी आपली हुकुमत मान्य केली आहे, खलीफास कर देण्यास संमती दिली आहे, तेव्हा हे सारे*

*लक्षात घेऊन, त्यांचे संरक्षण आपण केलेच पाहिजे. तसेच त्या सर्वांच्या मालमत्तेची व जीवनाच्या सुरक्षिततेची ग्वाही आपण दिलीच पाहिजे. या पत्रानुसार हिंदुना आमच्या देवतांचे पुजन करण्यास परवानगी देण्यात आली आहे.''*

• महंमद गझनवीने सोमनाथच्या मंदिरातील मूर्तीची मोडतोड केली, व ती नाहींशी केली या संबधीच्या वृत्तांताची समीक्षा करताना *अब्दुल करीम,* लिहिताना की 'हा जो मूर्तीभंजनाचा वृत्तांत आहे तो सर्वस्वी कपोलकल्पित आहे, असे आधुनि इतिहासकारांना वाटते ..... महंमदाने 'मूर्तीभंजक' हा बहुमान व्यक्त करणारा किताब स्विकारल्यानंतरच्या दिवसापासून पर्शियन इतिहासकारांनी एका गोष्टीबाबत निर्णय घेतला. ती म्हणजे महंमदाने सोमनाथ देवालयावर धाड घातली होती, ती त्याच्या धार्मिक अंधश्रद्धेचा भाग होता .... अशा कथानकात त्या धाडीचे रूपांतर करणे.'

राज्यव्यवहाराच्या बाबतीत इस्लामने मान्यता दिलेली न्याय आणि सन्माननीय अशी वागणूक कोणती, व इतर प्रकारची मान्यता न मिळालेली वागणूक कोणती, यात फरक करण्याबाबत *अब्दुल करीम* हे अत्यंत साक्षेपी आहेत. धर्माबाबतचा दुराभिमान हा नेहमीच निषेधार्ह आहे असे ते नमूद करतात. एवंच धर्माबाबतचा लोदी यांचा दृष्टीकोन अगदी असहिष्णु आणि संकुचित होता, आणि हिंदुवर दडपशाही करणारा होता असे त्यांनी म्हटले आहे. हे सर्व लिहिताना त्यांना एकाच गोष्टीशी कर्तव्य होते. ती म्हणजे आपल्या समान धर्मियाव्यतिरिक्त इतरांच्या बाबतीत इस्लामं एक धर्म म्हणून आणि मुसलमान राज्यकर्ते म्हणून या दोघांची हिंसक, असहिष्णु आणि दडपशाही करण्याची जी प्रकृती आहे, असा जो आरोप केला जात असतो त्याचा इन्कार करणे आणि त्याचे खंडण करणे. हा खोटा आरोप युरोपिय इतिहासकारांनी पसरविलेला आहे, असे त्यांनी सुचविले आहे. आपण गत इतिहासा-संबंधी मुसलमान इतिहासकारांनी जो वृत्तांत कथन करावयाचा आहे, तोच जर लक्षात घेतला गेला, तर मुसलमानांच्या मनात एक समूह म्हणून आत्म गौरवाच्या भावनेला चालना मिळेल आणि बिगर मुसलमानांच्या मनात त्यांच्याबद्दल आदरभाव निर्माण होईल. बंकिमचंद्रांनी राष्ट्राच्या भूतकाळाबद्दल जे काही सुचविले होते, त्यापेक्षा या इतिहास लेखनातील संरचनेपासून निर्माण होणारा प्रतिसाद अर्थातच वेगळा नाही.

**इतिहास – राष्ट्रवादाचे उगम स्थान या स्वरूपात**

राष्ट्राचा इतिहास हा हिंदुच्या इतिहासाशी एकरूप आहे, असे बंकिमचंद्राच्या कार्यक्रम पत्रिकेत सुचित केले गेले होते. आपल्या स्वत:च्या इतिहासावर आपणच हक्क सांगितला पाहिजे असे आवाहन केले गेले तर, व तसा आग्रहही धरला गेला होता. त्याही पलिकडे जाऊन, त्यांनी तो बाहुबलाचा (सामर्थ्याचा) वा दंडसत्तेचा तो इतिहास होता हेही सांगितले होते. असे होते तरी हा सत्तेसाठी झालेला जो संघर्ष होता तो त्यांनी ब्रिटिश काळापुरताच सिमित केलेला होता. साम्राज्यशाहीच्या जोखडाखाली असलेल्या एका अंकीत राष्ट्राने आपली ऐतिहासिक मुक्ती करून घेण्याकरीता आवश्यक अशा ज्या अटी होत्या, त्याची गणतीही

त्यांनी केलेली आहे. असे असले तरी ब्रिटिश साम्राज्यशाही विरुद्ध सत्ता संघर्ष करण्याची वाच्यता त्यांनी केलेली नाही. मुसलमान राज्यकर्त्याविरुद्ध हिंदुजातीने केलेल्या संघर्षाच्या कथाच ते आपल्या वाचकाला सांगतात. या ठिकाणी एक विसंवाद आहे असे *रणजित गुहा* सुचित करतात. साम्राज्यशाहीच्या इतिहासातून दंडसत्तेच्या (बाहुबोलाला) इतिहासाला वगळण्यात एक परिणाम होता, तो म्हणजे साम्राज्यशाहीच्या इतिहासातूनच दंडसत्ता वगळण्यात आली होती. परिणामी पर्यायी इतिहास कसा असला पाहिजे याची कार्यक्रम पत्रिका प्रत्यक्ष कार्यवाहीत येण्यास प्रतिबंध झाला. त्याचे तपशीलवार वर्णन देण्यात आले असले, व तो कसा लिहिला जावा असे आवर्जुन सांगण्यात आले असले तरीही. परंतु ब्रिटिश राजवटीला बाहुबलाच्या इतिहासातून वगळण्यात आल्याकारणाने, या पर्यायी इतिहास लेखनाची कार्यक्रम पत्रिका ठरत नव्हती.

बंकिनचंद्रांनी जसा इतिहास लिहिला, तसा त्यांच्या दुसऱ्या काही समकालीन पण तितक्याश्या प्रसिद्ध नसलेल्या व त्या मानाने कमी उल्लेखनिय अशा इतिहास लेखकांनी इतिहास लिहिलेला आहे. आपण हे दोन्हीही इतिहास वाचले, तर त्यात आपणास पुढील गोष्टी आढळून येतात. (१) या दुसऱ्या वर्गातील लेखकांनी बंकिमचंद्राइतके तरलतेने व उच्चपातळीवरून इतिहास लेखन केलेले नाही. परंतु इतिहास लेखनाबाबत या दोघांचा दृष्टीकोन जवळ जवळ सारखाच आहे. (२) *दोघांच्याही* लेखनात गुहा यांनी दाखविलेली विसंगती आढळते. (३) बंकिमचंद्रांच्या बाबतीत असे म्हणता येईल की ब्रिटीशांच्या विरुद्ध कराव्या लागणाऱ्या सत्ता संघर्षाबद्दलचा पवित्रा त्यांच्या लिखाणात केव्हाच घेण्यात आला होता, फक्त तो संघर्ष उघडपणे जाहिर करणे त्यांना शक्य नव्हते एवढेच. हे विधान आपणास या दुसऱ्या वर्गातील लेखकाबद्दल करता येणार नाही. याचे कारण इ. स. १८८० ते इ. स. १८९० या दरम्यानच्या काळात अनेक बंगाली लेखकांनी उघडपणे असे केव्हाच जाहिर केले होते की, स्वतंत्र अशा इतिहास लेखनासाठी करावयाचा संघर्ष आणि राष्ट्रीय स्वातंत्र्यासाठी करावयाचा संघर्ष हे दोन्हीही संघर्ष वसाहतवादा विरुद्धच करावयाचे संघर्ष आहेत. वसाहतवादी राजवट म्हणजे नेमके काय, हे ठरविण्यातच मुख्य अडचण होती. या लेखकांच्या मते वसाहत वादाविरुद्ध संघर्ष म्हणजे ब्रिटीश राजवट आणि मुसलमानी राजवट या दोन्हीही विरुद्ध होणारा संघर्ष. या दोन्हीत राष्ट्रीय स्वातंत्र्याचे उद्दिष्ट एकच होते. ते म्हणजे वसाहतवादी राजवटीचा शेवट करणे. या दोन्ही संघर्षात स्वातंत्र्यप्राप्तीसाठी व्यापरण्याचा मार्गही एकच होता. तो म्हणजे सत्तेसाठी संघर्ष. या त्यांच्या कार्यक्रम पत्रिकेत अजिबात विसंगती नव्हती, एक गोष्ट उल्लेखनिय होती, ती म्हणजे ही राष्ट्रीय इतिहासाची चौकट, ही इंग्लिश विद्याविभूषित हिंदू मध्यम वर्गाच्या जाणिवेत सर्वत्र पसरली होती. मध्यमवर्गियांच्या वाङ्मयीन आणि नाट्य निर्मितीत, तसेच त्यांच्या शाळातून आणि महाविद्यालयातून या दृष्टीकोनावर आधारीत असलेले जे इतिहास कथन होते, त्यास विसाव्या शतकाच्या पहिल्या दशकापर्यंत जवळ जवळ कधीही आव्हान मिळाले नाही.

'भारतीय राष्ट्रवाद' हा हिंदुराष्ट्रवादाशी एकरूप आहे. ही कल्पना पूर्व-आधुनिक अशा काही संकल्पनांचा उरलेला अवशेष नाही. सर्वस्वी आधुनिक तत्वप्रणालीप्रमाणे, समाजाचे आधुनिकीकरण करण्याच्या कामात 'राज्य' या संघटनेची मध्यवर्ती भूमिका ती संकल्पना मान्य करते. तसेच 'राज्य' या संघटनेचे ऐक्य व सार्वभौमत्व यांचे समर्थन करण्यासाठीही ती संकल्पना सज्ज असते. या संकल्पनेचे जे आवाहन आहे, ते धार्मिक नाही, ते राजकीय आहे. या अर्थाने या राष्ट्रीय इतिहासाची जी चौकट आहे, तिच्या वतीने केला जाणारा युक्तिवाद हा सर्वस्वी धर्मातीत (SECULAR ) आहे. मृत्युंजयांचा इतिहास हा ईश्वरी आणि पवित्र अशा शक्तिंच्या अवती-भोवती फेऱ्या घालीत होता. *मृत्युंजय* आणि *तारिनिचरण* यांच्या इतिहास लेखनाची तुलना करून, त्यांचे अगदी वरवरचे असे परिक्षण केले, तर असे आढळून येते की तारिनिचरण यांचे इतिहासलेखन हे सर्वस्वी धर्मातीत आहे.

या इतिहासविषयक संकल्पनेतील (HINDUNESS) हिंदुमयता ही कोणत्याही प्रकारच्या धार्मिक मापदंडात बंदिस्त असणार नाही व तशी आवश्यकताही नाही. हिंदुची वैशिष्ट्ये अधोरेखित करतील अशा नेमक्या श्रद्धा व धार्मिक चालिरितीही नाहीत. तसेच हिंदु जगतात तात्विक आणि पंथवादी असे भेदाभेद असले तरी हिंदु या संकल्पनेबाबत ते अप्रस्तुत आहेत. या इतिहास विषयक संकल्पनेत, बुद्ध व जैन या धर्मासारखे वेद प्रामाण्य न मानणारे आणि ब्राम्हण विरोधकांची या ठिकाणी हिंदुत गणना केली जाते. याजप्रमाणे जे इतर लोक ब्राम्हणी धर्माबाहेर आहेत, आणि जातीव्यवस्था मानणाऱ्या समाजाबाहेर आहेत अशा लोकांनाही हिंदु जातीचाच ते एक भाग असल्याचा दावा केला जातो, परंतु ख्रिश्चन आणि इस्लाम या धर्मांना या हिंदु जातीतून अगदी स्पष्टपणे वगळण्यात आलेले आहे.

असे असेल तर 'हिंदु'त समाविष्ट करण्यासाठी अथवा न करण्यासाठी, कोठचा मापदंड वापरावयाचा? बुद्ध धर्मिय आणि जैन धर्मिय हे हिंदु आहेत. याचे कारण ते हिंदु धर्माच्या अंतर्गत अशा वादविवादातून आणि समीक्षेतून, त्या धर्मांचा भारतात जन्म झाला. म्हणून ते स्वदेशी आहेत. ख्रिश्चन आणि इस्लाम हे बाहेरून आलेले ज्यांचा जन्म भारताबाहेर झाला आहे असे धर्म असल्याकारणाने ते परकीय आहेत. या ठिकाणी इंडिया (भारत) ही एक GENERIC ENTITY आहे. या ENTITY च्या भौगोलिक सीमा बंदिस्त व ठरलेल्या आहेत. या प्रादेशिक सीमांचा भूभाग हा या (हिंदू) जातीच्या इतिहासाचे कायमचे क्षेत्र आहे.

आता आपणास आणखी एक प्रश्न उपस्थित करता येईल. या अशा प्रकारच्या 'राष्ट्र' या संकल्पनेतून, भारतातील ज्या रहिवाशांना वगळण्यात आले होते, त्यांचे स्थान काय होते? येथवर उल्लेखिलेल्या इतिहास लेखनात, या प्रश्नाला अनेक उत्तरे सुचित करण्यात आलेली आहेत, त्यांचे वर्णन पुढीलप्रमाणे करण्यात येईल. (१) या उत्तरात राष्ट्राच्या आयुष्यात, आधुनिक 'राज्याचे' मध्यवर्तीत गृहीत धरलेले आहे. ही स्थिती अगदी उघडउघडपणे बहुसंख्याकांच्या बाजूची आहे. बहुसंख्यांक जमात ही हिंदुची आहे. बाकीचे सर्व अल्पसंख्यांक आहेत. बहुसंख्यांकाचा हा जो वरचष्मा आहे; त्याचे प्रतिबिंब 'राज्याच्या' धोरणात पडणारच.



अनुक्रमणिका

एवंच अल्पसंख्याकांनी बहुसंख्याकाचे नेतृत्व आणि त्यांनी दिलेल्या व केलेल्या संरक्षणाचा स्विकार केला पाहिजे. या दृष्टीकोनाचा विद्यमान काळातही प्रचार होतच असतो. एकदा साम्राज्यशाहीचा अंत झाल्यानंतरच्या भारतवर्षातही आत्यंतिक विचारांचे हिंदु राजकारणी, आणि त्यांचे राजकारण, या दृष्टीकोनाचा अगदी कंठरवाने पुरस्कार करतात. पण तसे पहाता हा दृष्टीकोन तसा नवा नाही. वस्तुत: या दृष्टीकोनचा उगम सव्वाशे वर्षापूर्वी झाला. त्याच सुमारास भारतीय राष्ट्रवादाचा जन्मही झाला होता.

भूबदेव मुखोपाध्याय यांनी एक 'स्वप्नरंजनात्मक (UTOPIAN) इतिहास इ. स. १८७६ साली लिहिला. आपण त्याचा विचार करूया. या इतिहासातील एक प्रसंग. पानिपतच्या भूमीवर अहमदशहा अबदाली व मराठे यांच्या फौजा एकमेकांना भिडलेल्या आहेत. *मराठ्यांच्या सेनापतीकडून अहमदशहाकडे एक निरोप्या येतो, आणि तो म्हणतो, "मुसलमानांनी हिंदूंना नेहमीच वाईट वागणूक दिलेली आहे. असे असले तरी हिंदु त्यांना क्षमा करावयास तयार आहेत. तुम्ही आपल्या सैन्यासकट आपल्या मायभूमीकडे परता. आपल्याला कोणत्याही प्रकारचा अटकाव होणार नाही. भारत वर्षात राहणाऱ्या कोणत्याही मुसलमानाला आपल्या बरोबर जाण्याची इच्छा असेल, तर त्याला तसे करता येईल. त्यांनी किमान फक्त पांच वर्षे तरी भारतात परतता कामा नये.*

हा इतिहास अर्थातच स्वप्नात झालेल्या साक्षात्कारी असा 'भारत इतिहास' आहे. म्हणूनच अहमदशहा म्हणतो, 'महाराष्ट्राच्या सेनापतीकडे जा आणि त्याला सांग ..... मी पुन्हा भारतावर कधीही हल्ला करणार नाही.'

हे ऐकल्यानंतर त्या निरोप्याने अहमदशहास सलाम ठोकला आणि म्हणाला ..... 'मला आपणाला आणखीनही एक निरोप देण्याबद्दल हुकूम आहे. या देशातले सर्व मुसलमान, नवाब, सुभेदार, जमिनदार आणि जहागिरदार इत्यादी यापैकी जे कोणी आपणाबरोबर जाऊ इच्छित नाहीत त्यांनी आपल्या स्वत:च्याच राहत्या घराकडे आणि स्थावर मालमत्तेकडे (ESTATE) ताबडतोब परतावे. भूतकाळात जे काही गुन्हे या लोकांनी केले असतील, त्याबद्दल त्यांना क्षमा करण्यात आलेली आहे.

स्वप्नरंजनात्मक इतिहासातील हा एक भाग आहे याचा विसर वाचकाला पडू नये. यानंतर भारतातील राजांच्या एका मोठ्या सभेचे आयोजन करण्यात आले या सभेत खालिल प्रस्ताव सादर करण्यात आला.

*"हिंदु जातीचे जे लोक आहेत, त्यांचीच भारतमाता ही खरीखुरी मातृभूमी आहे. तसेच या भारत मातेने अनेक मुसलमानांना जन्म दिला आहे. परंतु हे मुसलमान इत:पर या मातेशी आपला संबंध नाही असे सांगतात. हे सारे असे असले तरीही भारतमातेने या मुसलमानाना आपल्या हृदयाशी कवटाळले आहे. त्यांचे संगोपन केले आहे. म्हणूनच मुसलमान भारतमातेची दत्तक घेतलेली बालके आहेत.*



अनुक्रमणिका

*एक नैसर्गिक बालक आणि दुसरे दत्तक घेतलेले बालक या अशा दोन बालकांना बंधुभावाचे अनुबंध असणारच नाही का? असे अनुबंध निश्चितपणे आणण्याची शक्यता आहेच. प्रत्येक धर्माने सांगितलेले जे कायदे आहेत, त्यात अशा प्रकारचे संबंध मान्य करण्यात आले आहेत. भारत वर्षात राहणारे जे हिंदु व मुसलमान आहेत या दोघांच्यात ते जन्माला आहे तेव्हाच एका अनुबंधाचा जन्म झाला होता.*

*आपल्या मातेची काळजी घेण्याकरता आपण सर्वांनी एकंजूट केली पाहिजे. परंतु प्रमुख पदी कोणीतरी व्यक्ती असल्याशिवाय कोणत्याही संघटनेचा वा ऐक्याचा कारभारच होणार नाही. आपल्या सर्वांमध्ये नेतृत्व पदाच्या जागी कोण असेल? ईश्वरी इच्छेने या संबंधात वादविवाद होण्यास जागाच उरलेली नाही. हे सिंहासन जे राजा राम चंद्रासाठी तयार करण्यात आलेले होते . . . . . त्याचा विनाश होणे शक्यच नाही. पहा तेथे पहा. राजा रामचंद्राच्या हवाली आपला राजमुकूट करण्यासाठी शहाणा बादशहा शहा आलम पुढे येत आहे. आपल्या साम्राज्यावर राज्य करण्याची जबाबदारी ही त्या राजमुकुटाबरोबरच राजा रामचंद्राकडे आलेली आहे.'* एवंच मराठा राजा रामचंद्र यांच्या हवाली मोगल बादशहा आपले सिंहासन करतो. या सभेचे काम संपले आहे असे जाहिर झाल्याबरोबर प्रत्येक राजा आपल्या आसनावरून उठला. यानंतर शहा आलमचे दर्शन कोणालाही घेता आले नाही. दिल्लीच्या सिंहासनावर शिवाजी महाराजांच्या घराण्यातील राजा रामचंद्र विराजमान झाले होते. त्यांच्या डोक्यावर शहा आलम यांनी त्यांना दिलेला राजमुकूट होता.

या ठिकाणी आणखीही एका गोष्टीचा उल्लेख करावयास हवा. 'स्वप्नातल्या' या सभेमध्यें एक राज्यघटनाही जाहीर करण्यात आली. तिचा तोंडावळा जर्मन राईश (GERMAN REICH) सारखा होता. स्वराष्ट्रातील उद्योगधंद्यांना जोरदारपणे संरक्षण देणारे आर्थिक धोरण, त्या राज्यघटनेत खास करून नोंदविण्यात आलेले होते. या संकल्पित रामराज्यात (UTOPIA) तत्कालिन युरोपिय आर्थिक सत्तांना फार पक्केपणी पायबंद घालण्यात ही आर्थिक धोरणे जर्मन राईशच्या काळात यशस्वी झाली होती. हे झाले एक उत्तर!

दुसरे उत्तर आणखी एका वेगळ्याच बाबतीत आहे. भारतातील बहुसंख्य आणि अल्पसंख्य जमाती यांच्यातील फरक या उत्तरात सांगितलेला आहे. भारतीय राजकारणात ज्यास धर्मातीतवादी (SECULARISM) राजकारण म्हणून जे ओळखले जाते, त्याच्याशी हे उत्तर संलग्न आहे. या दृष्टीकोनानुसार, बहुसंख्याकांकडून अल्पसंख्याकावर दडपशाही होऊ नये यासाठी, अल्पसंख्यांकांची वेगळी अस्मिता, व्यक्तित्व व त्यांचे हक्क या सर्वांना संरक्षण देण्यासाठी 'राज्याला' कायदे मंजूर करून घ्यावे लागतील. या ठिकाणी एक अडचण उपस्थित होते. राष्ट्रातील नागरिकत्वासंबंधीची संकल्पना, जात व धर्म यावर आधारलेली नाही. ही संकल्पना राष्ट्रातील सर्व नागरीक समान मानते. थोडक्यात या संकल्पनेनुसार अल्पसंख्याकांना खास व वेगळे प्रतिनिधित्व द्यावे यास परवानगी व मान्यता मिळाली नसती. याचा परिणाम असा झाला की, अल्पसंख्यांकाचे प्रतिनिधित्व कोण करतो? हा प्रश्न 'समान



अनुक्रमणिका

नागरीकत्व' या संकल्पनेत अजुनही आवश्यकपणे अनिर्णित राहिलेला आहे. तो तसाच राहणार यात आश्चर्य करण्यासारखे काहीही नाही. परंतु या प्रश्नाने आणखी एका प्रश्नाचे सुचन होते. राष्ट्र ही संकल्पना आहे आणि राज्य (STATE) हा प्रत्यक्ष व्यवहार आहे. या दोघातही ऐक्यभावना तशी तकलादू आहे. म्हणूनच त्या ऐक्यभावनेला सातत्याने धमकावण्यात येत असते.

आरंभीच्या राष्ट्रवादी इतिहास लेखनात, या प्रश्नाचे आणखी एक तिसरे उत्तर सापडते. राष्ट्राच्या जीवनात 'राज्य' या संघटनेत मध्यवर्ती स्थान आहे, हेच मुळी नाकारण्यात आलेले होते. त्याऐवजी लोकांनी आपल्या दैनंदिन जीवनात अनेक संस्था चालीरिती आणि परंपरा या सर्वांच्या मदतीने आपला भिन्न धार्मिक दृष्टीकोन सामावून घेणारा जीवनमार्ग उत्क्रांत केला होता, याकडे बोट दाखविण्यात येते. स्वदेशीचा पुरस्कार करणारा कालखंडाची अवस्था उलटून गेल्यानंतरच्या काळातील रविंद्रनाथाचे लिखाण हे या दृष्टीने विशेष लक्षणीय आहे. राजांनी केलेल्या लढाया, साम्राज्यांचा उदय आणि ऱ्हास केवळ यातच भारताचा इतिहास सामावलेला नाही. याउलट आम जनतेला प्रिय असलेल्या जीवनाच्या दैनंदिन जगताचा तो इतिहास आहे. 'राज्य' या संघटनेच्या कथेत जे संघर्ष येतात, त्यात आम जनतेला प्रिय असलेल्या जीवनात जी लवचिकता अंर्तभूत अशी आहे, तिला स्पर्श होत नाही, पण त्याजबरोबर सर्व प्रकारच्या धार्मिक श्रद्धा अस्तित्वात रहाव्यात याला परवानगी येते. या तिसऱ्या उत्तरातला युक्तिवाद या स्वरूपाचा होता. या कालखंडानंतर, कालांतराने आलेल्या गांधीवादी राजकारणाशी हा जो दृष्टीकोन आहे तो अनेक बाबतीत मिळता-जुळता आहे. या दृष्टीकोनाबाबतही एक प्रमुख अडचण आहेच. थोडक्यात सांगावयाचे झाल्यास, आधुनिक 'राज्य' या संघटनेचा सर्व गोष्टीमागे टाकील असा जो झपाटा होता, त्यापुढे हा दृष्टीकोन अंगभूतपणे कमकूवत होता; म्हणूनच त्याचा टिकाव लागला नसता. राष्ट्र ही संकल्पना इतिहासात विकसित झालेली संकल्पना आहे. या संकल्पनेपासून बचाव करण्यासाठी एकच मुद्दा उपलब्ध असतो तो म्हणजे लोकांचे दैनंदिन आयुष्य हे आवश्यक आणि इतिहासापलिकडे जाणारे सत्य आहे. असा दावा वा युक्तिवाद करणे. आपल्या समर्थनासाठी या युक्तिवादाने जो परीघ आखून घेतलेला आहे, त्या परिघातही हा बचावात्मक युक्तिवाद कमकुवतच ठरतो. भारतातील मुसलमानी राजवटीचा इतिहास *या अबदुल करीम* यांच्या ग्रंथाचे *रवींद्रनाथ टागोर* यांनी परिक्षण लिहिले होते. त्यात *रविंद्रनाथांनी* पुढील गोष्टी नमूद केल्या आहेत. रविंद्रनाथांची वृत्ती याबाबत किती दोलायमान होती. हे त्या परिक्षणात दिसून येते. त्यांच्या लिखाणातील हा सर्वच भाग तसा लक्षवेधी व कुतुहल चाळवणारा आहे. ते म्हणतात की, सत्ता आणि किर्ती संपादन केली की त्याची परिणती दुसऱ्यांच्या जीवनात हस्तक्षेप करण्यात होते. पण हिंदु लोकसत्ता आणि किर्ती संपादण्यास नाखूष असतात. जे कोणी सत्ता आणि किर्ती संपादन करतात, त्यांना ती हाताळता येत नाही व त्या परिस्थितीशी जुळवून

घेता येत नाही. हिंदूंच्या मनोवृत्तीबद्दलचे हे रविंद्रनाथांचे भाष्य. ते यापुढे जाऊन आणखीही काही सांगतात. त्यांचे म्हणणे असे आहे की इस्लामचा राजकीय इतिहास आणि अगदी अलिकडच्या काळात भारताबाहेरील जगात, युरोपिय सत्तांनी जे देश पादाक्रांत केले. त्या प्रक्रियांचा इतिहास एक गोष्ट दाखवून देतो. तो म्हणजे, जग पादाक्रांत करण्याची इच्छा जे लोक बाळगून असतात, ते लोक सुसंस्कृत अशा नागरी जीवनाच्या इमारतीखाली अक्राळविक्राळ अमानुषता, बेलगाम स्वार्थ आणि हव्यास यांनी भरलेली एक गुप्त कोठडी लपवून ठेवतात. या अशा प्रकारच्या आयुष्याशी तुलना करता, एका साचलेल्या डबक्यात, अत्यंत शांततापूर्ण वातावरणात, काहीतरी साहस करावे आणि महत्त्वाकांक्षेची परिपूर्ती करावी या विचारातून निर्माण होणाऱ्या अस्वस्थेपासून मुक्त असलेल्या स्थितीत जीवन घालविणे हे अधिक पसंतीदायक आहे असे दिसते.

*'शास्त्राने' उभारलेली तटबंदी भारताचे संरक्षण करण्यास असमर्थ ठरली आहे, आणि इतर लोकांशी संघर्ष करणे हे अटळ बनले आहे. इतरांच्या लोभ, स्वार्थ व हव्यास यांच्यापासून आपण आपल्या हितसंबंधास जपणे, आणि इतरांच्या हिंसेपासून आपल्या जीवनाचे संरक्षण करणे. याबाबतची जबाबदारी आपल्यावर येऊन पडली आहे. म्हणूनच आपलया हृदयातही जी पशुवृत्ती दडलेली आहे, तिच्यापुढे मांसाचे तुकडे टाकणे, आणि आपल्या दिंडी दरवाजासमोर तिला पहारेकरी या स्वरूपात खडी करणे, हे अर्थातच अधिक शहाणपणाचे आहे असे दिसते. याचे कारण जे लोक बलशाली व सामर्थ्यवान आहेत, त्यांच्या मनात आपल्याविषयी किमानपक्षी आदरभावनेची निर्मिती तसे केल्याने होईल.'*

येथवर उल्लेखिलेल्या एकाही उत्तरात असा दावा नाही की इस्लामच्या इतिहासाकडून वारसा हक्काने भारत या राष्ट्राकडे काही आले आहे व त्यावर संपूर्ण अशा भारत या राष्ट्राचा त्यावर हक्क असण्याची शक्यता आहे. अशा प्रकारचा दावा मान्यच होणे शक्य नाही. भारत या राष्ट्राला एकच राष्ट्रीय इतिहास असणार या कल्पनेचे पर्यवसान, अपरिहार्यपणे एकाच गोष्टीत होते. ती म्हणजे भारतीय परंपरेचा उगम, प्राचीन हिंदू सभ्यतेतच होतो. इस्लाम, म्हणजे परकियांनी हिंदूवर मिळवलेल्या विजय सांगणारा इतिहास तरी असतो, अथवा आमजनतेला प्रिय असलेल्या दैनंदीन जीवनाने आत्मसात केलेला तो भाग असतो. इस्लाम धर्माचा अभिजात अशी जी परंपरा व वारसा आहे, तो भारतीय इतिहासाच्या बाहेर व इतिहासाला परकाच राहिलेला आहे.

सगळ्यात चमत्कारी दिसणारी वस्तुस्थिती अर्थातच वेगळी आहे. ती म्हणजे हिंदु राष्ट्रवादासंबंधी इतिहासाशी संलग्न (HISTORICIST) अशी जी संकल्पना आहे, ती आधुनिक युरोपच्या परंपरेवर व वारश्यावर हक्क सांगताना, जराही बिचकत नाही, वा त्याबद्दल तिला कसलाही विधिनिषेध नसतो. आधुनिक राज्यांच्या जागतिक परिसरात सहभागी होणे हा आपला हक्क आहे असे वसाहोत्तर कालखंडात भारतात लढणारे जे स्पर्धक आहेत ते मानतात. हे सर्व स्पर्धक इतिहासाचे नांव घेऊनच या लढाया करीत असतात.



अनुक्रमणिका

**प्रकाशात येऊ न दिला गेलेला इतिहास** ··

या तीन उत्तराव्यतिरिक्त आणखीही एक चौथे उत्तर होते. तसे बघावयास गेले तर ते अस्पष्ट असेच आहे. तसे ते चिरेबंदीही नाही. तुकड्या तुकड्याचेच ते आहे. म्हणूनच त्याला एक संभाव्य उत्तर म्हणून संबोधणे, हे अधिक उचित ठरेल. भारताला एकच एक इहिास आहे या संकल्पनेबद्दल या उत्तरातून संशय निर्माण होतो. त्याजबरोबर अभिजात अशा एका संस्कृतीतून आपला उदय झाला आहे, याबद्दलही त्या उत्तरातून अनिश्चितता निर्माण होते. या उत्तराला अभिप्रेत असलेल्या इतिहासात, एकाच 'राज्याचे सार्वभौमत्व हे आवश्यकपणे गृहीत धरलेले नाही.

· आपणास आश्चर्य वाटेल, पण खुद्द बंकिमचंद्रांच्या लिखाणात, या चौथ्या उत्तराचे सूचन आहे. 'राजा' हा भिन्न जातीचा आहे याचा अर्थ देश पारतंत्र्यात आहे असा नाही' स्वतंत्र्य सुलतानांची राजवट, ही खरोखरीच बंगाली संस्कृतीच्या प्रबोधनाची गंगोत्री आहे अशा दृष्टीकोनातून बंकीमचंद्र या स्वतंत्र सुलतानांच्या राजवटीकडे पहात होते.

*''परदास्यात असलेल्या जातींची बौद्धिक क्षेत्रातील नवनिर्मिती अस्तंगत पावणे; हा परदास्य या स्थितीचा प्रमुख परिणाम आहे, असे इतिहास आपणास सांगतो. असे असले तरीही पठाणांच्या राजवटीत वंगदेशियांची बुद्धीमत्ता अजोड अशा तेजाने चमकली .... या दोनशे वर्षांच्या काळात बंगालचा चेहरा, जेवढा उजळून निघाला, तेवढा आजवर कधीही, व भविष्यकाळात कधीही तेजस्वीतेने चमकला नाही.''*

*आपण या प्रबोधनावर कसे येऊन पोचलो? जातींच्या बौद्धीक जीवनात, ज्ञानयुग एकाएकी असे उभारून आले? ..... ही ज्ञान ज्योत कशी बुझाली?*

*आपण ज्या अकबर बादशहावर स्तुतीचा वर्षाव करतो, त्याचाच काळात बंगालला कमालीची अवनत दशा प्राप्त झाली. तोच त्याला जबाबदार आहे. बंगालला खरोखरीच्या परदास्यात लोटणारा तो पहिला राजा. मोगले हे आपले शत्रू आहेत पण पठाण हे आपले मित्र आहेत.*

या ठिकाणी बंगालचा इतिहास आणि भारताचा इतिहास यात फारच मोठी विलगता निर्माण झालेली आहे. एका मुळातील (GENERICALLY) सार्वभौम राष्ट्राचे सर्वांनी तथाकथितपणे मान्य केलेले केंद्र आणि त्याचे एका राष्ट्राबरोबरचे सहअस्तित्व, या सऱ्यांचेच स्थान अतिश्चित होऊन जाते. बंकिमचंद्रांनी असे म्हटले आहे की, बंगालमध्ये आर्य कांहीसे उशिरा आले. मग आर्यांचा अभिजात असा जो वारसा आहे, त्यावरचा बंगालचा असलेला हक्क हा त्या मानाने कमकुवत होत नाही का?

*'बऱ्याच जणांना असे वाटेलही की बंगाल आणि बंगाली यांचा तो हक्क हा कमी ताकदवान झाला आहे. तसेच आपली जात अगदी अलिकडे निर्माण झालेली आहे, अशा प्रकारची चिखलफेकही करण्यात येईल. आधुनिक इंग्लिश समोर आम्ही आमच्या प्राचीन वारश्याचे मोठ्या दिमाखाने प्रदर्शन करतो. परंतु आता आम्ही आधुनिक जातीच्या जागेवर*

*येईपर्यंत घसरलो आहोत.*

*परंतु आम्ही जे काही करीत आहोत, त्यात कांही लांच्छनास्पद असे काय आहे हे दिसणे तसे फारच कठीण आहे. आम्ही बंगाल या भूप्रदेशात केव्हा का प्रवेश केला असेना, अजूनही आमचे पूर्वज किर्तीमान आर्यच राहणार. प्राचीन आर्य जातीचे आम्ही अजूनही वंशजच आहोत.'*

एका वेगळ्या दृष्टीकोनातून पाहता आणखी एक प्रश्न उपस्थित होतो? एकंदर बंगाली म्हणून समजल्या जाणाऱ्या लोकांपैकी आर्य कोण? बंगाली जातीचे उगम स्थान काय? एका प्रदीर्घ अशा निबंधात बंकिमचंद्रांनी या प्रश्नांच्या उत्तराचा शोध घेतला आहे. 'बंगाल्यांचे उगमस्थान' हेच त्या निबंधाचे शीर्षक आहे. बंकीमचंद्रानी आपल्या युक्तिवादाचे समर्थन करण्यासाठी भरपूर 'वैज्ञानिक पुरावा' जमवून वाचकास सादर केला आहे. आजच्या आधुनिक वाचकाला तो पुरावा कमालीचा बनावट वाटेल. बंकीमचंद्राच्या एकंदर सर्व निबंधाचे आजकाल जे काही स्मरण होते, त्यात सर्वात कमी स्मरण याच निबंधाचे होते. गंमत आहे ती हीच आहे. या निबंधात बंकीमचंद्रांनी काढलेले जे निष्कर्ष होते, ते भारत या राष्ट्राचा एकमेव भारतीय इतिहास लिहिण्याच्या दृष्टीने फारच कमी सुखावह होते.

*'इंग्लिशांची एकच जात आहे. बंगल्यात अनेक आहेत. आपण आज ज्यांना बंगाली मानतो, त्यात आपणास चार प्रकारचे बंगाली आढळून येतात. एक आर्य, दोन बिगर आर्य हिंदू, तीन आर्य आणि बिगर आर्य हिंदू यांच्या संकरातून निर्माण झालेले हिंदु, आणि चौथी बंगाली मुसलमान. या चारही जाती एकमेकापासून स्वतंत्रपणे अलग अलगच राहतात. बंगाली समाजाच्या तळात, बिगर आर्य बंगाली, संकरीत आर्यांची प्रजा, आणि सरतेशेवटी बंगाली मुसलमान अशी ती उतरंड आहे. या समाजाच्या सर्वात वरच्या थरात केवल आर्यांना, आर्यांपासून झालेल्या संततीचा फक्त समावेश आहे. आपण बंगाली समाजाच्या बाहेर जाऊन जर अवलोकन केले, तर केवळ याच कारणांच्या व या उतरंडीच्या अनुषंगाने पाहता, बंगाली जाती ही शुद्ध आर्य जाती असल्याचे दिसते. बंगालचा इतिहास हा आर्य जातीचा इतिहास म्हणून लिहिलेला आहे.'*

या पर्यायी इतिहासाच्या काही छटा केवळ बंकीमचंद्र यांच्या इतिहासात दिसतात असे नाही, इतर अनेक लेखकांच्या इतिहासातही त्या आढळतात. रामकृष्ण मुखोपाध्याय यांनी लिहिलेल्या ग्रंथाचे परिक्षण करताना बंकीमचंद्रांनी बंगाली इतिहाससंबंधी आपले पहिले भाष्य केले आहे. भारताच्या इतर भागात, तरवारीच्या जोरावर इस्लामचा प्रसार झाला. पण बंगालमध्ये तसे कांही घडले नाही, असे बंकीमचंद्रांनी त्या परिक्षणात म्हटले आहे. क्रिशन चंद्र रे यांनी ब्रिटिश राजवट आणि सुलतानी अगर नबाबी राजवट या दोहोंची तुलना केली होती. त्यात त्यांनी असे नमूद केले होते की 'या देशातील लोकांना, प्रशासनातील महत्त्वाच्या पदी नेमण्यात, त्या नबाबी व सुलतानी राज्यात अजिबात आडकाठी नव्हती. अक्षयकुमार

मैत्रेय यांचा सिराज दौल्ला (१८९८) या ग्रंथात बंगालचा शेवटच्या नबाबाच्या काळातील 'राष्ट्रीय करणाची (स्वदेशी करणाची)' ही प्रक्रिया आपणास शिगेला पोचलेली आढळते.

राष्ट्रीय इतिहासाचे हे दोन पर्याय. एक– भारत वर्षाचा इतिहास. यात अभिजात आर्यांचा भूतकाळ गृहीत धरलेला आहे. या इतिहासाचा केंद्रबिंदू उत्तर भारत समजला जातो. दोन– अनेक अनिश्चित अशा मुळापासून खाली आलेला. अनेक जातींच्या बंगाली लोकांचा इतिहास. या दोन्ही इतिहासांच्या भ्रमण कक्षा वेगळ्या आहेत. त्या इतिहासांची लयही भिन्न आहे. राष्ट्रीयत्वासंबंधी अगदी भिन्न अशी कल्पना व प्रतिमा त्यात अनुस्युत आहे. एका सकरणात्मक परिभाषेतून या दुसऱ्या इतिहासाव्या शक्यतेबद्दल सध्या तरी शोध घेणे कठीण आहे. याचे कारण, या दोन पर्यायातील दुसरा पर्याय, एका प्रचंड लाटेखाली पार बुडून गेला आहे. ही प्रचंड लाट, आर्य-हिंदू-भारतवर्ष यांच्या ऐतिहासिक स्मरणाची आहे. परंतु या ठिकाणी उद्धृत करून विचारात घेतलेल्या काही उदाहरणावरून एक गोष्ट स्पष्ट होईल. ती म्हणजे, पठाण राजांची राजवट, आणि मोगल राजवट यांची एक मोट बांधणे, आणि त्यास मुसलमानी रियासत हे नांव देणे, अथवा बंगाल मधील इस्लामच्या प्रसाराची सुरुवात 'महंमदाने आपल्या अनुयायांना असा हुकूम दिला की तरवार हाती घ्या, आणि धर्मलंडांचा नाश करा' असे सांगून करणे, हे केवळ अशक्य आहे, हे त्या उदाहरणानी दाखवून दिले आहे'.

भारतातील वेगवेगळ्या विभागांचे असे अनेक पर्यायी इतिहास आहेत अशी कल्पना करता येईल. तसे केल्यास, भारतीय इतिहासाचे केंद्र आर्यावत व ती अगदी नेमकेपणाने सांगावयाचे झाल्यास दिल्लीचे सिंहासन – या ठिकाणी असण्याची गरज नाही. असे झाले म्हणजे मग प्रश्न विभागीय इतिहास आणि राष्ट्रीय इतिहास असा इत:पर राहणार नाही. तसेच 'विभाग' आणि सर्व भारत यांच्यातील संबंध हेही चर्चेसाठी खुले होतील. या अशा पर्यायी इतिहासांत काही प्रकारचे ऐक्य असल्यास त्याचे स्वरूप राष्ट्रीय न राहता, ते संघराज्याचे राहील.

परंतु अशा प्रकारचे इतिहास लिहिण्यासाठी आवश्यक असलेली सामुग्री आपणापाशी नाही, तसेच हे इतिहास लिहिले जाण्यास अनुकूल अशी परिस्थिती आपण जोवर निर्माण करीत नाही तोवर आपणास एक गोष्ट अपरिहार्यपर्ण स्विकारावी लागणार आहे. ती म्हणजे भारताचा एकमेव असा राष्ट्रीय इतिहास या कल्पनेचा स्विकार केल्या कारणानेच, आपण भारतीय एकमेकापासून विभक्त होणार आहोत.

---

मागे जाऊन जीवन समजावून घेता येईल, परंतु ते पुढे जाऊनच जगले पाहिजे.

**–किर्केग्राड**

# बोलकी हाडे

## हाडांवरून अंगकाठीचे अनुमान

–डॉ. आनंद जोशी

'हरक्युलिसच्या पावलावरून तुम्ही त्याच्या शरीरयष्टीचा अंदाज बांधू शकता' अशी एक लॅटिन म्हण आहे. ऐतिहासिक ग्रीसमधील ऑलिम्पिक स्टेडियमच्या धावपट्टीची लांबी ६०० फूट होती. या हिरोचा 'फुट' (पाउल) हे लांबी मोजण्याचे प्रमाण मानून मूलतः या ऑलिम्पिक स्टेडियमची लांबी मोजली होती अशी आख्यायिका आहे. पायथागोरसने या आख्यायिकेचा उपयोग करून ऑलिम्पिक स्टेडियममधील धावपट्टीच्या लांबीवरून हरक्युलिसच्या पावलांचा अंदाज बांधला व त्यावरून हरक्युलिस सहा फूट सात इंच उंचीचा असावा असेही ताडले ! या आख्यायिकेवरून 'वस्तूच्या एका भागावरून सबंध वस्तूचा अंदाज बांधता येतो' अशी म्हण पडली !

ही म्हण न्याय सहायक मानववंशशास्त्रातही उपयुक्त ठरते ! हाडांवरून तसेच संपूर्ण सांगाड्यावरून अज्ञात व्यक्तीची उंची काय असावी, अंगकाठी कशी असावी याचा अंदाज बांधणे ही न्याय सहायक मानववंशशास्त्रीय तपासणीतील महत्त्वाची पायरी. हाडांवरून कुडीचा अंदाज अंदाज बांधणे हे अज्ञात व्यक्तीची ओळख पटण्यासाठी जरूरीचे असते

सापडलेल्या हाडावरून अज्ञात व्यक्तीच्या उंचीबद्दल अंदाज बांधणे या प्रक्रियेमध्ये तज्ज्ञांच्या संशोधनामुळे वेळोवेळी बदल होत गेले. हा विकास कसा होत गेला व अंदाज बांधण्याच्या नानापद्धती कशा योजल्या गेल्या हे पाहणे उद्‌बोधक !

१७५५ साली जे. जे स्यु या शरीरशास्त्रज्ञाने हाडांवरून अंगकाठीच्या अंदाज पद्धतीचा पाया घातला. त्याने सहा आठवड्यांच्या अर्भकापासून पंचवीस वर्षे वयाच्या प्रौढ माणसापर्यंत चौदा शवांच्या मोजमापनाचा अभ्यास केला त्याने शरीरातील जवळ जवळ सर्व हाडांची मापे घेऊन प्रत्येक हाडाची जास्तीत जास्त लांबी किती असते याच्या नोंदी केल्या. सबंध शरीराची लांबी, धडाची लांबी, बाहूंची लांबी, पायांची लांबी अशी प्रत्येक (चौदा शवांच्या) शरीराची मोजमापे लिहून ठेवली. शरीराची वाढ होत असताना शरीरातील भागांच्या प्रमाणशीरतेबद्दल दोन महत्त्वाचे मुद्दे स्यूच्या संशोधनामुळे प्रकाशात आले. ते पुढीलप्रमाणे

१) वयाच्या चौदाव्या वर्षापर्यंत धडाची लांबी पायाच्या लांबीपेक्षा जास्त असते. चौदा वर्षांनंतर पायाची लांबी व धडाची लांबी समान असते व जधनसंधानक (प्युबीक सिंफीसीस) हा शरीराचा मध्य असतो.



अनुक्रमणिका

२) मूल जन्मेपर्यंत (म्हणजे गर्भावस्थेत) बाहूंची लांबी ही पायांच्या लांबीपेक्षा जास्त असते, त्यानंतर पायांची लांबी बाहूंच्या लांबीपेक्षा जास्त असते.

स्यूच्या मोजमापांचा शरीरविज्ञानाप्रमाणे चित्रकलेला फायदा झाला. स्यूच्या आकडेवारीमुळे चित्रकारांना मानवी चित्रे प्रमाणशीरतेने काढण्यास शास्त्रीय पाया मिळाला. वैज्ञानिक विचार पद्धतीचा कसा कसा उपयोग होतो याचे हे एक उदाहरण !

१८२१ साली एम. जे. बी. ऑफिला या तज्ज्ञाने स्यूची मोजमापे न्यायसहायक वैद्यक शास्त्राच्या पुस्तकात लिहून तज्ज्ञांचे या महत्त्वाच्या विषयाकडे लक्ष वेधले. ऑफिलाने एकावन्न प्रेते व वीस संपूर्ण सांगाडे यांची मोजमापे घेऊन हाडांच्या लांबीचे मेट्रीक एकक नक्की केले. ब्रिटिश मानववंशतज्ज्ञांनी स्यू व ऑफिला या दोघांच्या पद्धती एकत्र करून शरीरातील लांब हाडांची लांबी मोजून व्यक्तीच्या उंचीबद्दल अंदाज बांधण्याची नवीन मापन पद्धती तयार करण्याचा प्रयत्न केला.

१८५९ साली पॉलब्रोका याने लांब हाडांची लांबी मोजण्यासाठी अस्थिमापक फळा तयार केला. १८८८ साली पॉल टोपीनार्ड याने स्वत: मिळवलेली माहिती व ऑफिला व टंफ्री यांनी जमवलेली माहिती एकत्र करून देहातील लांब हाडे व व्यक्तीची उंची यांचे सरासरी गुणोत्तर काय असते याचे गणित तयार केले. रोलेट याने समान उंचीच्या माणसांच्या लांब हाडांची सरासरी लांबी किती असते याच्या नोंदी केल्या.

१८९४ साली थॉमस डवाइटने शरीराच्या उंचीचा अंदाज बांधण्याच्या १) शरीर शास्त्रीय २) गणिती अशा दोन पद्धती तयार केल्या.

१) शरीरशास्त्रीय पद्धतीत सापडलेली सर्व हाडे व्यवस्थित रीतीने जुळवून त्यावरील मांसल भागाबद्दल अनुमान बांधून मग शरीराच्या उंचीबद्दल अंदाज बांधायचा असतो. पण या मापन पद्धतीसाठी सांगाड्यातील जवळ जवळ सर्व हाडे मिळणे जरूरीचे असते.

मानवी उंचीच्या अंदाजासाठी शरीर शास्त्रीय पद्धत वापरणे जिकीरीचे असते. त्यासाठी सात फूट लांबीचे टेबल लागते. या टेबलावर सांगाड्यात सापडलेली सर्व हाडे शरीरात असतात त्याप्रमाणे मांडून ठेवतात. व ती हाडे एकमेकांना धरून राहण्यासाठी चिकण मातीचा उपयोग करतात. यासाठी शरीरशास्त्राचे उत्तम ज्ञान असणे जरूरीचे ठरते. दोन हाडांमधील कुर्चासाठी किती जागा सोडायची, मांसल भागाचा मानवी उंचीमध्ये किती सहभाग असतो, त्याचा अंदाज कसा बांधायचा, वगैरे गोष्टींचे ज्ञान असणे महत्त्वाचे ! अशी सांगाड्याची मांडणी केल्यानंतर, त्या सांगाड्याची लांबी मोजतात. कुर्चा व मांसल भाग यांसाठी ३२ ते ३५ मि. मी. या लांबीत मिळवतात. ही लांबी म्हणजे माणूस जिवंत असताना किती उंचीचा असावा याबद्दलचा अंदाज !

सांगाड्यातील काही मणके सापडले नसतील तर उंचीबद्दलचा अंदाज कसा बांधावयाचा याबद्दलचे संशोधन 'फुली' या तज्ज्ञाने केले आहे. मानेचा मणका, छातीचा मणका, कंबरेचा



अनुक्रमणिका

मणका, यांप्रमाणे जो मणका सापडत नसेल तर उंची कशी मोजायची याचे कोष्टक फुलीने तयार केले आहे. हे कोष्टक वापरून उंचीचा अंदाज करता येतो.

२) गणिती पद्धतीमध्ये शरीरातील विशिष्ट हाडांच्या लांबीवरून व्यक्तीच्या उंचीचा अंदाज बांधण्याची सूत्रे तयार केली आहेत. या सूत्रांचा उपयोग करून व्यक्तीच्या उंचीचा अंदाज बांधता येतो. एखादे लांब हाड सापडले तर ही गणिती पद्धत वापरून न्याय सहायक मानववंश तज्ज्ञ उंची बद्दलचा अंदाज बांधू शकतात.

१८८८ साली रोलेट या फ्रेंच तज्ज्ञाने पन्नास पुरुषांच्या व पन्नास स्त्रियांच्या पुढील हाडांचे, दंडाचे हाड (हयुमरस), कोपरापुढील भुजेची दोन हाडे (रेडियस व अल्ना) मांडीचे हाड (फिमर), गुडघ्यापुढील तंगडीची दोन हाडे (टिबीया व फिब्युला) या हाडांचे मोजमाप मृत्यूनंतर लगेच व त्याच हाडांची मापे परत दहा महिन्यानंतर घेतली तेव्हा त्याला या हाडांची सरासरी लांबी हाडे सुकल्यानंतर दोन मि. मी. कमी झाल्याचे लक्षात आले.

१८९२-९३ मध्ये मॅनोव्रिये या तज्ज्ञाने रोलेटची माहिती वापरून उंचीच्या अंदाजाची काही कोष्टके तयार केली. १८९९ साली पियर्सनने रोलेटच्या नोंदणीतील फक्त उजव्या बाजूच्या हाडांची मापे वापरून उंचीबद्दलची परागमन सूत्रे (रेग्रेशन फॉर्म्युला) बनवली.

हाडांची लांबी मोजण्याची पद्धत सर्वत्र समान असावी म्हणून जिनीवा येथे करार करण्यात आला. माणसाच्या सर्व लांब हाडांची कमाल लांबी मोजावी. या मोजण्याच्या पद्धतीला फक्त दोन अपवाद असतील– फिमर हाडाची लांबी तिरकस (ऑब्लीक) मोजावी. तसेच टिबीया हाडाची लांबी स्पाइन वगळून तिरकस मोजावी असे जिनीवा करारात ठरवण्यात आले.

जगातील निरनिराळ्या देशातील तज्ज्ञांनी नानाविध जातींच्या लोकांची शरीरातील लांब हाडांच्या लांबीवरून व हाडांच्या तुकड्यांच्या लांबीवरून माणसाच्या उंचीबद्दलची परागमन सूत्रे बनवली आहेत.

भारतात १९६३ साली आठवले यांनी लांब हाडांच्या क्ष किरण चित्रावरून महाराष्ट्रीय पुरुषांची उंची ठरवण्याचे सूत्र बनवले.

पटेल व इतर (१९६४), जोशी व इतर (१९६४-१९६५) यांनी बडोदा मेडिकल कॉलेज येथे टिबीया व अल्ना या हाडांच्या लांबीवरून निरोगी प्रौढ पुरुषाची उंची ठरवण्याचे परागमन सूत्र तयार केले.

बदकुर (१९८५) यांनी ८२ पुरुष, व ६९ स्त्रिया यांच्या सांगाड्याचा मध्यप्रदेशात अभ्यास करून पुरुष व स्त्री यांच्या बद्दलची हाडांच्या लांबी वरून उंची ठरवणारी परागमन सूत्रे तयार केली. या सूत्रांचा न्याय सहायक तपासणीत चांगला उपयोग होत आहे.

बंगाली, उत्तरप्रदेशीय, लाहोरचे पंजाबी, अमृतसरचे पंजाबी, मध्य प्रदेशीय अशा नाना भारतीयांची हाडांच्या लांबीवरून उंची ठरवणारी सूत्रे तयार आहेत.



अनुक्रमणिका

**परित्वचा पद्धती** – विशिष्ट लोकसमुहातील व्यक्तीच्या सांगाड्यातील हाडे मिळाल्यानंतर लांब हाडांची लांबी मोजून परागमन सूत्रे तयार करणे ही हाडांवरून उंचीचा अंदाज बांधण्याची एक पद्धत आहे. परंतु दर वेळेला अशी हाडे मिळवणे ही काही सोपी गोष्ट नाही. यासाठी तज्ज्ञांनी विशिष्ट जातीतील प्रातिनिधिक व्यक्तींच्या लांब हाडांची टोके त्वचेवरून जिवंतपणी चाचपून त्या हाडांची लांबी मोजून नोंदी केल्या. जिवंतपणी त्वचेवरून हाडांची लांबी मोजणे या पद्धतीला परित्वचा पद्धती (परक्युटेयस मेथड) म्हणतात. ही पद्धता वापरून भारतातील तज्ज्ञानी काही जातींच्या हाडांच्या लांबीवरून उंचीचा अंदाज बांधणारी गणिती सूत्रे तयार केली आहेत त्याची काही उदाहरणे पुढीलप्रमाणे –

दुगल व नाथ (१९८६) यांनी पश्चिम बंगाल मधील लोढा व मुंडा या दोन आदिवासी जमातींतील व्यक्तींच्या रेडियस, अल्ना, व टिबीया या हाडांची जिवंतपणी परित्वचा पद्धतीने मापे घेतली व या हाडांच्या लांबीवरून उंचीचा अंदाज बांधण्यासाठी पुनरुत्पादन गुणक (मल्टिप्लीकेशन फॅक्टर) तयार केला.

नाथ आणि सतीशचंद्र (१९८६) यांनी उदयपूर येथील भिल जमातीतील पुरुषांची परित्वचा पद्धतीने हाडांची लांबी मोजून उंचीचा अंदाज बांधणारा पुनरुत्पादन गुणक तयार केला.

एका जमातीसाठी तयार केलेली परागमन सूत्रे किंवा पुनरुत्पादन गुणक दुसऱ्या जमातीतील व्यक्तीच्या उंचीचा अंदाज बांधण्यासाठी वापरता येत नाही. भारताच्या प्रत्येक लोक समुहातील प्रातिनिधिक व्यक्तींची परित्वचा पद्धतीने हाडांची परागमन सूत्रे व पुनरुत्पादन गुणक तयार केले पाहिजेत. प्रत्येक जाती जमातीची हाडे मिळणे कठीण असले तरी परित्वचा पद्धतीने हाडांची लांबी मोजणे दुरापास्त नाही असे तज्ज्ञांचे मत आहे.

ज्या वेळी एखादे प्रेत वर्षानुवर्षे कुजत पडते तेव्हा त्यात कोणते नैसर्गिक बदल होतात हे पूर्वी पाहिले आहे. गुन्हेगार प्रेताची ओळख पटू नये म्हणून शवावर कधी मधी क्षारक पदार्थ (ॲसिड-अल्कली सारखी झिजवणारी रसायने) लावतात. या क्षारक पदार्थांचा परिणाम हाडांपर्यंत पोहोचतो. हाडांवर सूर्यप्रकाशाचाही परिणाम होतो. हाडाच्या भागावर सूर्यप्रकाश सतत पडतो. त्या भागावर विरंजनाचा डाग तयार होतो. या नैसर्गिक तसेच रासायनिक प्रक्रियांचे ज्ञान गुन्ह्याची उकल करण्यासाठी न्याय सहायक मानववंश शास्त्रज्ञांना जरुरीचे असते.

मानवी शरीरातील सगळ्यात जड भाग म्हणजे डोके. मग माणूस 'जड' डोक्याचा असो वा तल्लख डोक्याचा ! जड डोके धडाशी नाजूक मानेच्या मणक्याच्या माळेने जोडलेले असते. ज्या वेळी शरीर कुजत पडते त्या वेळी मानेच्या मणक्याचे सांधे निसर्गत: खिळखिळे होतात, जबड्याचे सांधे खिळखिळे होतात. कवटी धडापासून वेगळी होते. शव जर एखाद्या उतारावर कुजत पडले असेल तर डोके धडापासून वेगळे होऊन घरंगळत लांबवर जाऊन

पडते. त्यामुळे धड व डोके वेगवेगळ्या वेळी व वेगवेगळ्या ठिकाणी सापडतात. कवटी धडापासून मृत्यूपूर्व वेगळी केली होती का मृत्यूनंतर निसर्गत: वेगळी झाली? डोके व धड एकाच माणसाचे आहे का? असाही संशय निर्माण होतो. हे कोडे सोडवण्यासाठी पोलिसांना न्यायसहायक मानववंश शास्त्रज्ञांची मदत घ्यावी लागते. कोड्यात टाकणारी कितीतरी प्रकरणे न्यायसहायक मानव वंश शास्त्राच्या दप्तर नोंदीत सापडतील. आम्लासारख्या क्षारक पदार्थाचा तसेच सूर्यप्रकाशाचा हाडावर काय परिणाम होतो हे पुढील केसवरून चटकन समजेल.

विशीच्या आतली एक तरुणी पोरांबरोबर पार्टीला गेली व नंतर परत कधी दिसलीच नाही. आईवडलांनी पोलिसांत मुलगी बेपत्ता आहे म्हणून तक्रार नोंदवली पोलिसांनी तिचा शोध घेण्यास सुरूवात केली. ९ वर्षे तपास चालू होता पण तिचा पत्ता लागला नव्हता. शहरातील सफाई कामगाराने एका मॅनहोलवरचे जड झाकण उचलेले तेव्हा त्याला खोल कुंडाच्या तळाशी एक सांगाडा दिसला. पोलिसांना वर्दी मिळाली. फोटो काढले. तो सांगाडा बाहेर काढण्यात आला. पोलिसांनी विविध चाचण्या घेतल्या. दातांच्या तपासणीवरून व गावातील दंतवैद्याच्या नोंदीवरून सांगाड्याची ओळख पटली. नऊ वर्षांपूर्वी बेपत्ता झालेल्या युवतीचा तो सांगाडा आहे हे नक्की झाले. नऊ वर्षांच्या नैसर्गिक प्रक्रियेमुळे सांगाड्यापासून कवटी वेगळी झाली होती. खालचा जबडा मानेच्या मणक्यांना चिकटलेला होता. पण वरच्या जबड्यासह कवटी वेगळी झाली होती. त्या कवटी वर काही डाग पडले होते. ते डाग कशाचे आहेत हे शोधण्यासाठी व त्यायोगे गुन्ह्यावर प्रकाश पाडण्यासाठी सांगाडा न्याय सहायक मानववंश तज्ज्ञांकडे पाठवला होता.

न्याय सहायक मानववंश तज्ज्ञांना या कवटीच्या तपासणीत काही विलक्षण खुणा आढळल्या. चेहऱ्याच्या हाडांवर सफेद रंगाचे आम्लकोरण झाले होते. कवटीतील कपाळाच्या हाडावर एक इंज भुजा असलेले त्रिकोणी भोक मध्यभागी पडले होते.

कवटीच्या हाडांच्या रचनेत जाड बाह्यस्तर, मधला थोडासा भुसभुशीत थर व जाड अंतस्तर असे तीन स्तर असतात. कवटीतील हाडांच्या बाह्य स्तरावर आम्लकोरण झाले होते, आरपार अंतस्तरापर्यंत कोरणाचा परिणाम पोहोचला नव्हता. चेहऱ्याच्या हाडांवरील आम्लकोरणाच्या कडा स्पष्ट दिसत होत्या. चेहऱ्याचा जवळजवळ सर्व भाग, कवटीच्या मुकुटाचा खालचा डावा भाग, वरच्या जबड्याचा दंत रेषेपर्यंतचा भाग व खालच्या जबड्याचा पुढचा भाग, असा हा आम्लकोरणाचा नकाशा कवटीवर उठून दिसत होता. वरच्या जबड्यातील दाताच्या एनॅमल मधील कॅलशियम निघून गेला होता व सर्व दात खडू सारखे पांढरे फटक पडले होते. तरुणीचा खून केल्यानंतर तिच्या चेहऱ्यावर ॲसिड ओतण्यात आले होते असा निष्कर्ष वरील लक्षणांवरून तज्ज्ञानी काढला.

या आम्लकोरणा व्यतिरिक्त कवटीच्या मुकुटावरील पुढच्या व बाजूच्या हाडांवर आठ आण्याएवढा एक तर रुपयाएवढा दुसरा असे दोन पांढरे ठिपके होते. हे दोन विरंजनाचे



अनुक्रमणिका

ठिपके कसे तयार झाले असावे याचा तज्ज्ञांनी अंदाज बांधला होता. त्या युवतीचे प्रेत खोल कुंडात ९ वर्षे पडून होते. वरच्या मॅनहोलच्या झाकणावर हवा आत बाहेर जावी म्हणून गोल भोके होती. या भोकातून सूर्य प्रकाशाचे झोत आत पडत होते. कवटीच्या एकाच भागावर बरेच वर्षे सूर्य प्रकाशाचा झोत पडून रुपयायेवढा विरंजनाचा सफेद डाग पडला. निसर्गाचे काम चालू होते. सांधे खिळखिळे झाले. खालचा जबडा व वरचा जबडा यांच्यामधील सांधा निखळला. कवटी धडापासून वेगळी झाली, व थोडीशी घरंगळली. आता दुसऱ्या भागावर सूर्य प्रकाशाचा झोत काही वर्षे मारा करीत राहिला व तेथे आठ आण्याएवढा विरंजनाचा सफेद डाग पडला. त्या युवतीच्या सांगाड्याच्या इतर हाडांवर जेथे जेथे सूर्यप्रकाशाचे झोत पडले तेथे विरंजनाचे डाग पडले होते. तज्ज्ञांनी मांडलेले हे गृहितक प्रत्यक्ष कुंडाची व त्यावरच्या मॅनहोलच्या झाकणाची पाहाणी केल्यानंतर वस्तुस्थिती संगत आहे असे सिद्ध झाले.

पोरांच्या ज्या टोळीने हा गुन्हा केला होता. त्यांच्या साक्षी पुराव्यात मुलीला ठार केल्यानंतर ओळख पटू नये म्हणून तिच्या चेहऱ्यावर ॲसिड टाकल्याचे सिद्ध झाले व त्या मुलीचे प्रेत कुंडांत ठेवून वर मॅनहोलचे झाकण लावल्याचे साक्षीदारांनी सांगितले. ज्याने गुन्हा केला होता त्याच्या वर खुनाचा आरोप न्यायालयात सिद्ध झाला. न्याय सहायक मानववंश तज्ज्ञांच्या निष्कर्षामुळे गुन्हा कसा घडला असावा याची पोलिसांनी पूर्ण कल्पना आली. न्याय सहायक मानववंश शास्त्रज्ञांनीं न्यायालयात तज्ज्ञ साक्षीदार म्हणून या केसमध्ये काम केले.

**अग्निदिव्य**

मानवाला अग्नी कसा उत्पन्न करायचा याचा शोध लागला व त्याच्या प्रगतीचे पाऊल पुढे पडले. मानवाने अग्नीला देवता मानले ! अग्निदिव्य करणारा माणूस निर्दोष व निष्पाप असे पुराणांनी सांगितले. पण मानवी स्वभावाच्या हिंसक प्रवृत्तीने विध्वंसक जाळपोळीसाठी, गुन्ह्यासाठी, गुन्हे लपवण्यासाठी या अग्नीचा उपयोग केला. खून करून, तो लपवण्यासाठी आगीचा उपयोग केल्याच्या घटना प्रत्येक देशातील गुन्हे अन्वेषण विभागात नोंदल्या गेल्या आहेत. अग्नि विझला तरी त्याच्या खुणा कायमच्या उमटतात. या खुणांचा मागोवा घेत, विज्ञानाला वाट पुसत, गुन्ह्याचा शोध लावण्याचे काम न्याय सहायक तज्ज्ञ करतात.

उतम तऱ्हेने प्रज्वलित केलेला अग्नी सुद्धा मानवी शरीरातील हाडनूहाड जाळून टाकण्यास असमर्थ असतो. म्हणून तर खून करून शव पेटवून दिले म्हणजे गुन्ह्याच्या सर्व खुणा पुसल्या जातील असा समज गैरसमज ठरतो. अग्नीतून तावून-सुलाखून निघालेले मानवी अवशेष तपासणे व त्यातील सूक्ष्म खुणा शोधून काढणे यासाठी न्याय सहायक तज्ज्ञांना परिश्रमाने प्रशिक्षण घ्यावे लागते व ते एक अग्निदिव्य असते असे म्हणायला हरकत नाही.

मानवी शरीर जाळल्यानंतर मागे उरलेल्या हाडांच्या आकार व आकारमानात विलक्षण बदल होतात. अग्नीमुळे हाडे आक्रसतात. हाडाची घनता, आगीचे तापमान व किती वेळ हाड आगीत आहे यावर हाडाचे आक्रसणे अवलंबून असते. हाडाचे आक्रसणे मूळ आकाराच्या एक ते पंचवीस टक्के असू शकते. हाड आक्रसण्यासाठी आगीचे तापमान ७०० ते ९००° सेंटिग्रेड असावे लागते. या तापमानाच्या अलिकडे हाडांचे आक्रसणे कमीत कमी असते. तापमान ९००° से. मर्यादेपलिकडे गेल्यानंतर हाडे जास्त असतात. असेही घडत नाही. हाडांचे जास्तीत जास्त आक्रसणे ७००° ते ९००° सेंटीग्रेड या तापमानाच्या मर्यादेमध्ये होते असा याचा अर्थ होतो. अग्निमुळे हाडाच्या रूपात तसेच रंगात ही फरक पडतो. अग्नीमुळे हाड प्रथम काळे पडते, नंतर जसा अग्नीचा पारा चढतो व हाड जास्त वेळ आगीत राहते तेव्हा ते राखाडी रंगाचे होते व आणखी काही काळ आगीत गेल्यानंतर हाडांचा रंग सफेद होतो. आगीत सफेद झालेले हाड २५ टक्के आक्रसते आगीतून पोळून निघालेल्या हाडांवरून वय व लिंग यांचा अंदाज बांधताना हाडाचे आक्रसणे लक्षात ठेवावे लागते.

हाडे जळताना विशिष्ट तापमानानंतर हाडाला भेगा पडतात. ज्या वेळी हाडावरील मांसल आवरणासकट हाड जळते त्या वेळी हाडावर जाळाचे वेगळे परिणाम होतात. मांसल भाग काढून नुसती हाडे जाळली तर त्या हाडावर वेगळे परिणाम होतात. काही गुन्ह्यात माणूस जळून मेला आहे असा आभास निर्माण करण्यासाठी त्याची उरली सुरली हाडे आगीत जाळण्याच्या घटना घडल्या आहेत. परंतु मांसल भागासकट जळलेले हाड व मांसल भागा विना जळलेले हाड यात फरक असतो, तो कसा ते पाहू.

हाड मांसल आवरणासकट जळले तर त्यावर विळ्याच्या पात्यासारख्या आडव्या भेगा पडतात, तसेच वेड्यावाकड्या उभ्या भेगाही पडतात व भाजताना पापड वळावा तसे हाड वळते व पिळवटते.

मांसल भागाविरहित, वाळलेले हाड जाळले तर काच तडकावी तसे हाड तडकल्याच्या खुणा हाडाच्या पृष्ठभागावर दिसतात व हाडाला उभा छेद जातो. हाड वळणे किंवा पिळवटणे या गोष्टी कमीतकमी प्रमाणात होतात.

वर सांगितलेली लक्षणे हाड मांसल भागासकट जळले आहे का मांसल भागाविरहित जळले आहे हे कळण्यास उपयोगी पडतात.

माणसाच्या विकृत कृतीमुळे हाडे जळल्याचा भास निर्माण होऊ शकतो. माणसावर फेकलेले ॲसिड हाडापर्यंत पोचले तर हाडे काळी पडतात. इतर काही रसायनांमुळे हाडे काळी पडल्याची उदाहरणे आहेत. बुरशी येण्यासारख्या नैसर्गिक प्रक्रियामुळे हाडांना काळा रंग येऊन हाडे जळल्यासारखी दिसतात. एखादे शव दमट, कोंदट, बंद जागेत बरेच दिवस कुजत पडले असेल तर बुरशी येण्याच्या घटना घडतात.

माणूस आगीत सापडतो तेव्हा त्याच्या मृत्यूचे कारण बहुतेकदा ज्वाळा नसून धूर असते. माणूस धुराने घुसमटून त्याचा मृत्यू होतो, मग त्याचे शरीर ज्वालांच्या भक्ष्यस्थानी पडते. माणसाचा देह आगीत भाजला म्हणजे संपूर्ण जळेलच असे नाही. पण ज्वालांचा शरीरावर

विशिष्ट परिणाम होतो. आगीच्या उष्णतेमुळे स्नायू, स्नायूंचे तणाव, संयोगी उती (कनेक्टिव टिशु) असे मांसल भाग आक्रसतात. यामुळे हाताच्या मुठी वळतात, हात आणि पाय कोपरात गुडघ्यात दुमडले जातात. त्यामुळे अर्धवट जळलेले शरीर मुष्टीयोघ्याने मुष्टीयुद्ध खेळताना घेतलेल्या पवित्र्यासारखे होते. यालाच 'प्युजिलिस्टीक पोझिशन' म्हणतात. कधी कधी आक्रसणे वाढले म्हणजे शरीराची जुडी होते. याला 'गर्भिय पवित्रा' (फिटल पोझिशन) म्हणतात.

शरीर जेव्हा जास्त वेळ ज्वालामध्ये भाजून निघते तेव्हा शरीराची आखडलेली स्थिता सुटते व शरीर परत ताठ होते. अग्नीचे तापमान, शरीर अग्नीत राहिल्याचा काळ यावर शरीरात अग्नीमुळे होणारे बदल आधारित असतात. 'आग' न्याय सहायक तज्ज्ञांसाठी एक प्रश्नचिन्ह असते. कसे ते पुढील घटनेवरून दिसून येईल.

अमेरिकेतील एका खेड्यात एक घर आगीत भस्मसात झाले. आग लागून आठ दिवस होऊन गेले. तरी घर मालक कुठे दिसला नाही म्हणून आजुबाजूच्या लोकांनी पोलिसांत तक्रार केली. आगीतून अवशेष शोधून काढणारे तज्ज्ञ व पोलिस हजर झाले. घराचा कोळसा आणि राख झाली होती. या राखरांगोळीचा शोध घेताना तळघरात जळलेला मानवी सांगाडा सापडला. या सांगाड्याचा तपास करताना पाठीच्या मणक्यात वितळलेल्या बुलेटचे धातूचे तुकडे सापडले. सांगाडा अपूर्ण होता. हात पाय डोके याचा पत्ता नव्हता. मोठ्या स्फोटाने घडापासून अवयव वेगळे होऊन इतस्तत: उडाले असावेत असा तज्ज्ञांचा कयास होता. पोलिसांनी हा धागा पकडून आजुबाजूला चौकशी जारी ठेवली. आग लागण्याआधी स्फोटासारखा आवाज ऐकल्याचे आजुबाजूच्या घरातील काहींनी चौकशीत सांगितले.

शोध सुरूच होता. जेथे घड मिळाले त्यापासून आठ फुटांवर डोके व खांदे मिळाले. आगीत सिमेंटची जमीन तव्या सारखी तापली होती. त्या जमिनीवर डोके व खांदे जळून चिकटले होते. दुर्दैवी माणसाच्या कमरेभोवती स्फोट होऊन देहाचे अवयव इतस्तत: फेकले गेले असावे असे तज्ज्ञांना वाटत होते.

घरमालक आगीचे भक्ष झालेला नसून त्याचा गोळ्या घालून खून करण्यात आला असावा व त्यानंतर खुन्याने स्फोट घडवून देहाची विल्हेवाट लावून घराला आग लावून दिली असावी, असे गृहीतक न्याय सहायक मानव वंशशास्त्रज्ञांनी तपासात मिळालेल्या मानवी अवशेषांवरून व सापडलेल्या इतर गोष्टींवरून मांडले होते.

पोलिसांनी त्या दिशेने तपास चालू ठवेला. तेव्हा त्यांना पुढील माहिती मिळाली. आगीच्या आधी काही दिवस त्या घरात दुरुस्तीचे काम चालू होते व त्या कामासाठी एकच कामगार कामावर ठेवला होता. पोलिसांनी त्या कामगाराला संशयित म्हणून पकडले. कामगाराने घरमालकाला लुटून, त्याला गोळ्या घालून खून केला व डायनामाइटच्या स्फोटाने घरमालकाच्या देहाच्या चिंधड्या करून घर पेटवून दिले असा कबुलीजबाब दिला.



अनुक्रमणिका

न्यायसहायक तज्ञांच्या मदतीशिवाय हा गुन्हा उघडकीस आला नसता. न्यायसहायक तज्ज्ञाची या प्रकरणासंबंधत बीबीसी वर मुलाखत घेण्यात आली. तेव्हा तो तज्ज्ञ म्हणाला. "वैज्ञानिक पद्धती वापरून आम्ही आगीतील अवशेषांचा कसून शोध घेतला व गुन्हा कसा घडला असावा याचे अनुमान बांधले. वैज्ञानिक पद्धतीचा उपयोग हा या प्रकरणातील महत्त्वाचा मुद्दा व फायदा. न्यायालयात साक्ष देऊन बाहेर पडताच गुन्ह्याला बळी पडलेल्या व्यक्तीच्या कुटुंबियांनी मला माझे सर्व ज्ञान व कौशल्य गुन्हे शोधनासाठी कामी आणल्या-बद्दल दिलेले धन्यवाद हा दुसरा फायदा. माझ्यासारख्या विद्याविषयक व्यक्तीने (ॲकॅडेमिक पर्सन) केलेली ही समाज सेवा मोलाची आहे असे मला त्यावेळी वाटले."

'ज्वलंत प्रश्न' सोडवणाऱ्या न्यायसहायक तज्ज्ञाचे वरील उद्‌गार सार्थ आहेत !

*हाडांवरून मृत्यूचा काळ* – पुरातत्व शास्त्रीय उत्खननात किंवा गुन्हेशोधनात सापडलेल्या हाडावरून त्या व्यक्तीचा मृत्यू किती वर्षांपूर्वी झाला हे ठरवण्यासाठी त्या हाडातील नायट्रोजनचे प्रमाण किती हे ठरवावे लागते. ऑर्टनेर या तज्ज्ञाच्या अभ्यासानुसार मृत्यू झाल्यानंतर हाडातील प्रथिनांचे जल अपघटन (हायाड्रॉलिसीस) होऊन पेप्टाइडस् तयार होतात. पेप्टाइडस्‌चे विघट्न अमायनो आम्लात होते. अमायनो आम्लात नायट्रोजन असतो. वातावरणाचे तापमान, हाडांतील पाण्याचे प्रमाण, व पी एच (pH) या वर हाडातील प्रथिनांच्या विघटन प्रक्रियेचा काळ आधारित असतो. हाड विविध रासायनिक घटकांचे बनले असले तरी फक्त प्रथिनांमध्ये नायट्रोजन असतो. हाडांमध्ये उरलेल्या नायट्रोजनच्या प्रमाणावरून ती व्यक्ती मृत होऊन किती काळ गेला याचा अंदाज बांधणे शक्य आहे असे बऱ्याच संशोधकांचे मत आहे. कुक आणि हेल्झर (१९४७) यांनी नुकत्याच मेलेल्या माणसाच्या मांडीच्या हाडातील नायट्रोजनचे प्रमाण ४.०८ टक्के असते असे दाखवून दिले. तर ५०० वर्षापूर्वीच्या हाडातील नायट्रोजनचे प्रमाण १.८७ टक्के होते असे आढळले. व हजार वर्षापूर्वीच्या हाडातील नायट्रोजनचे प्रमाण ०.४९ टक्के असे मापले गेले. जशी वर्षे जातात तसे मृत हाडातील नायट्रोजनचे प्रमाण कमी होत जाते असे यावरून सिद्ध होते. हाडातील नायट्रोजनच्या प्रमाणावरून मृत्यूच्या काळाबद्दल अंदाज बांधण्यास मदत होते !

*हाडांवर हत्यारांच्या सह्या* – "सापडलेल्या सांगाड्याची तपासणी करून मृत्यूचे कारण काय असावे हे ठरवण्यास मदत कराल का?" असा प्रश्न न्याय सहायक तज्ज्ञांना विचारला जातो. हाडांची तपासणी करून दर वेळेस मृत्यूचे कारण कळतेच असे नाही, पण हाडांवरील हत्याराच्या खुणांवरून कोणते हत्यार गुन्ह्यात वापरले असावे याचे अनुमान बांधता येते.

सर्वसाधारणपणे हाडांवर झालेले वार हत्याराचे वळण व आकार याचे द्योतक असतात हत्यार कोणत्या दिशेने चालवले आहे. वार किती जोराने व किती कोनात झाला आहे या कृतीवर हाडावंर उठलेली हत्याराची आकृती अवलंबून असते. कोयता, चाकू, सुरी, काडतुसे



अनुक्रमणिका

(बुलेटस्) कुऱ्हाड, हातोडी अशी अनेक हत्यारे स्वत:च्या सह्या हाडावर उठवतात. न्यायसहायक मानववंश शास्त्राने विविध हत्यारांच्या हाडांवरील परिणामांचा संग्रह संकलित केलेला असतो व या संग्रहाचा शोधनात मोलाचा उपयोग होतो.

मृत्यूसमयी होणारा वार हा मांसल भागातून हाडांपर्यंत पोहोचतो तेव्हा हाड हे हिरव्या खोडा सारखे असते. 'हिरव्या' हाडावर झालेल्या शस्त्राच्या आघातामुळे जी हाडाची मोडतोड होते त्याला 'ग्रीन बोन रिसपॉन्स' म्हणतात. सुकलेल्या हाडावर शस्त्राने आघात केल्यास होणारी मोडतोड ही निराळी असते. हिरवे खोड मोडणे व वाळलेले खोड मोडणे यामध्ये जसा फरक असतो तसा फरक हिरव्या हाडाची मोडतोड व वाळलेल्या हाडाची मोड तोड यामध्ये असतो.

शरीरात भोसकलेला सुरा जर हाडापर्यंत जाऊन पोहोचला व हाडाला इजा झाली तर त्याच्या खाणाखुणा सहज दिसून येत नाहीत. त्यासाठी काळजीपूर्वक हाडाची तपासणी करावी लागले म्हणजे खुणा सापडू शकतात. मृत्यूनंतर काही वर्षे अथवा महिने गेल्यावर ठिसूळ झालेल्या हाडावर सुरीचा घाव पडला तर त्याचा परिणाम निराळा असतो.

हिरव्या हाडावर जेव्हा शस्त्राचा वार होतो तेव्हा ते हाड वाकते व हाडापासून सुटलेली ढलपी आतल्या बाजुला वळते– वेलीच्या वळलेल्या तणावासारखी ! शरीरांत लांब हाडे व चपटी हाडे असतात. शस्त्र जरी तेच असले तरी त्याचा लांब हाडावर व चपट्या हाडावर होणारा परिणाम भिन्न असतो. एकाच शस्त्राने केलेले वार सांगाड्याच्या विविध हाडांवर विभिन्न खुणा उमटवतात. मारामारीत शस्त्र निरनिराळ्या प्रकारे वापरले जाते. शस्त्राची मूठ, पाते, टोक, सुरीच्या धारेची विरुद्ध बाजू, आपल्या खास खुणा हाडावर होणाऱ्या खुणा देखील बदलतात. याच संदर्भात अमेरिकेत घडलेली एक दुर्दैवी घटना बोलकी आहे.

एका किशोरवयीन मुलीचा खून झाला होता. तिच्या शरीरावर वेगवेगळ्या प्रकारचे अगणित वार होते. कुठे भोसकले होते तर कुठे उभे, आडवे, वार दिसत होते. तोंडावर, चेहऱ्यावर, डोक्यावर हातोड्याने ठोकल्यासारख्या खुणा होत्या. दोन शस्त्रे वापरली असावीत असा संशय पोलिसांना प्राथमिक तपासणीत आला होता. न्याय सहायक मानव वंश तज्ज्ञांकडे तपासणीसाठी शव पाठवण्यात आले. सुरीसारख्या एकाच शस्त्राचा वापर गुन्ह्यात केला असून, काही ठिकाणी सुरीच्या टोकाच्या खुणा, तर काही ठिकाणी सुरीच्या मुठीच्या. बरेच वेळा वार केल्यामुळे सुरीचे पाते वाकले व पात्याच्या भिन्न खुणा उमटल्या असा निष्कर्ष न्याय सहायक मानववंश तज्ज्ञांनी काढला. पोलिस तपासणीत खुणासाठी वापरलेल्या शस्त्राचा शोध लागला. ते शस्त्र म्हणजे पाते वाकलेली लांब सुरी होती. खुणांवरून काढलेला तज्ज्ञांचा अंदाज बरोबर ठरला !

*प्राचीन अस्थि-अवशेष* – पुरातत्त्वीय उतखननात हाडे सापडतात. या हाडांवर कधी शस्त्रांच्या खुणा आढळतात. जगातील नाना संस्कृतीत मृतांच्या अस्थी जतन करणाच्या नाना



अनुक्रमणिका

पद्धती ! मोठ्या कुंभात किंवा गुहेत अशी हाडे पुरातत्त्वीय उत्खननात सापडतात. या हाडांच्या तपासणी वरून त्या संस्कृतीतील अंत्यसंस्कारांच्या पद्धतीवर प्रकाश पडता युकॉडॉर येथे सापडलेल्या प्राचीन हाडांवर शस्त्रांच्या खुणा आढळल्या. मृत्यूनंतर माणसाचा मांसल भाग काढून अवयव वेगळे करून मग हाडे भांड्यात ठेवण्याची पद्धत असावी असा निष्कर्ष हाडांवरील शस्त्रांच्या खुणांवरून मानव वंश शास्त्रज्ञानी काढला आहे.

वायव्य युरोपातील दलदलीच्या भागात प्रागैतिहासिक काळातील मानवी शरीरे चांगल्या स्थितीत उत्खननात सापडली आहेत. तेथील हवामान व दलदलीची जमीन यामुळे निसर्गातच या मानवी शरीरांच्या 'ममी' तयार झाल्या ! या दलदलीत युगानुयुगे पुरली गेलेली झाडे झुडपे कुजली व त्याचे सर्पण तयार झाले. याला 'पीट' म्हणतात. हे सर्पण शोधायला गेलेल्या काही व्यक्तींचे 'तर्पण' केले असावे असा मानववंश शास्त्रज्ञांचा अंदाज आहे. शिक्षा म्हणून किंवा धार्मिक कर्मकांडानुसार ही माणसे बळी दिली गेली. बळी देण्याआधी त्यांना मक्याचे जेवण देऊन, त्यांच्या हृदयात सुरा खुपसून, डोक्यावर टोला हाणून, व गळ्याला दोरखंडाचा फास लावून, दोरखंडा सकट त्या माणसाला दलदलीत ढकलून देत असावेत असे मानववंश शास्त्रज्ञांना 'ममींच्या' तपासणीत आढळले. निसर्गाने तयार केलेली 'ममी' म्हणजे 'मानवी जीवाश्म'. या जीवाश्मांच्या अभ्यासाने वायव्य युरोपातील बळीच्या पद्धतीवर प्रकाश पडला ! 'ममींच्या' सूक्ष्म परिक्षेत क्षयरोगाच्या, आतड्यातील जंतांच्या सूचक खुणा आढळतात. मानवी जीवाष्मांत आढळलेल्या विविध रोगांच्या सूचक खुणांवरून प्रागैतिहास काळी कोणत्या विकृती– विकार मानवाला ग्रस्त व त्रस्त करत असावेत याचा अंदाज बांधता येतो.

*पुराविकृती शास्त्र* – प्रागैतिहास काळातील अरण्यवासी मानव व पशु-पक्षी हे निसर्गाच्या निरोगी वातावरणात राहत असल्यामुळे त्यांना रोगराईची बाधा होत नसावी असा सर्वसाधारण गैरसमज ! पण रोगराई मानवजातीपेक्षाही जुनी पुराणी आहे सर मार्क आरमंड रफर हे पुराविकृतीशास्त्राचे एक संस्थापक. त्यांनी पुराविकृतीशास्त्राची व्याख्या पुढीलप्रमाणे केली आहे. पुरातन काळातील मानवी व पाशवी (प्राण्यांच्या) अवशेषांवरून रोग शोधण्याचे शास्त्र म्हणजे पुरा विकृतीशास्त्र– पॅलिओपॅथॉलॉजी ! अतिदूरवरच्या गत काळातील मानवी अवशेषांवरून रोगाची दर्शक चिन्हे शोधण्याच्या शास्त्राची तोंडओळख होण्यासाठी मानवी गुणोत्कर्षाचे जैविक व सांस्कृतिक पैलू तपासून पाहणे जरूरीचे.

आफ्रिकेत ५ मिलीयन वर्षापूर्वी वानरापासून नराची निर्मिती झाली असावी असे मानतात. पुढे उत्क्रांतीची हजारो वर्षे गेली आणि ५० हजार वर्षापूर्वी हत्यार वापरणारा, मोठ्या मेंदूचा मानव म्हणजे आधुनिक माणसाचा पूर्वज, 'होमो सापियन' धरतीवर वावरू लागला

मानवी उत्क्रांतीतील महत्त्वाची प्रगतीची पायरी म्हणजे 'अश्मयुग' (ओल्डस्टोनअेज)



अनुक्रमणिका

भूविज्ञानानुसार मानवी अश्मयुगाच्या वेळी पृथ्वीवर 'हिमयुग' (ग्रेट आइसअेज) चालू होते. १० हजार वर्षापूर्वी हे हिमयुग संपले. त्या काळातील माणुस शिकार करी व आजुबाजूला पडलेल्या खाण्याच्या वस्तु गोळा करून उपजिवीका करी. त्या काळी माणूस 'संधीसाधु मासांहारी' होता. याच कालखंडात माणुस हत्यारे बनवण्यास, निवारा बांधण्यास, अन्न इकडून तिकडे घेऊन जाण्यास, व भाईबंधाना सहभागी करून अन्न खाण्यास शिकला. वैशिष्ट्यपूर्ण मानवी संस्कृतीची सुरवात झाली ती या काळी. त्या काळची त्याची हत्यारे ओबडधोबड, हाडांच्या तुकड्यांची व कपच्या उडालेल्या दगडांची ! भांडीकुंडी, धातुंच्या वस्तु यांची नामोनिषाणीही नव्हती. पण या अश्मयुगीन माणसाने सुद्धा गुहेत चित्रे काढली होती ! अशी चित्रे लासकॉक्स (फ्रान्स) व अस्टामारा (स्पेन) येथे आढळली आहेत.

मानवाच्या सांस्कृतिक उत्क्रांतीमुळे पर्यावरण बदलले. माणसाळलेल्या पशुंमुळे पाळीव प्राण्यांच्या जाती निर्माण झाल्या. शेतीची कला अवगत झाली मानव लोकसमुहाने राहू लागला व नवनवीन विकार-विकृतींचा उदय झाला ! पुराविकृती शास्त्रज्ञ याचा शोध कसा घेतात ते पाहू.

*प्राथमिक व दुय्यम पुरावे* – पुराकाळातील मानवी विकृतींचे प्रत्यक्ष पुरावे विरळाच. अप्रत्यक्ष पुराव्यांना वाट पुसत पुरातन काळातील मानवी रोगांबद्दलचे आकलन करून घ्यावे लागते. पुराविकृती शास्त्रज्ञ प्राथमिक व दुय्यम पुराव्यांची सांगड घालत पुराविकृतींचा आकृतीबंध व स्वरूप रेखाटतात.

मृतदेह,, हाडे, दात, देहाची राख, किंवा अर्धवट जळलेले कोळसा झालेले देह, या गोष्टी प्राथमिक पुराव्यात मोडतात. त्या काळच्या कला, मानव निर्मित वस्तु, पुरण्यासाठी, गृहयसंस्कारासाठी वापरलेल्या वस्तु, लिखित किंवा चित्रीत दस्तऐवज, यागोष्टी दुय्यम पुराव्यात मोडतात. संशोधनाच्या जुन्या तसेच नव्या पद्धती व तंत्रे वापरून गतकाळातील मानवी विकृतीबद्दल अंतर्दृष्टी मिळवण्याचा वैज्ञानिक प्रयत्न करतात.

उत्खननात सापडलेले हाडांचे तुकडे, दगड, हत्यारे, सिरॅमिक्स, कापडाचे तुकडे, पापुद्रे, अशा व कार्बनी व अकार्बनी अवशेषांचे पुरातत्त्वीय रसायनशास्त्राने विश्लेषण करून गतकालीन मानवी संस्कृतीवर प्रखर प्रकाश टाकता येतो. पुरातत्त्व रसायनशास्त्रातील कार्बन – १४ कार्बन कालनिर्णय पद्धतीमुळे गेल्या दहा हजार वर्षातील भौतिक अवशेषांबद्दलची मौलिक माहिती मिळवणे शक्य झाले. गेली दहा हजार वर्षे ही सांस्कृतिक उक्रांतीची प्रगामी बदलाची महत्त्वाची वर्षे !

मानव निर्मित वस्तू सूक्ष्मदर्शकाखाली तपासताना त्याला रासायनिक विश्लेषणाची साथ मिळाली तर माहितीचा खजिना खुला होत्तो. प्रत्येक वस्तू कशी हाताळली गेली असावी याच्या खुणा त्या वस्तूत दडलेल्या असतात त्या अशा दुहेरी तंत्राने उघड्या करता येतात



अनुक्रमणिका

पुरातन अवशेष शोधून काढणे, त्याचा काळ ठरवणे, त्याची अर्थ उकल करणे, त्याची विश्वसनियता ठरवणे या गोष्टी पुरातत्वीय– रसायन शास्त्राने करतात येतात.

पुरातत्त्वशास्त्र, रसायनशास्त्र, भूस्तरशास्त्र, अशा शाखांतील वैज्ञानिक एकत्र येऊन संशोधन करतात. तेव्हा गतकाळाबद्दल सर्वांगीण माहिती मिळण्यास मदत होते. प्रतिरक्षाशास्त्र, (इम्युनॉलॉजी) व रेणवीय जीवशास्त्र या दोन शाखा पुराविकृतीशास्त्रात निर्माण झालेले प्रश्न सोडवण्यास हातभार लावतात. पुरातन अवशेषांत अल्पांशाने सापडलेली प्रथिने व केंद्रकाम्ले यांच्या विश्लेषणाने नवीन माहिती उजेडात येत आहे. अर्थात या माहितीचा अन्वयार्थ लावणे तितकेच अवघड आहे. अर्थ काळजीपूर्वक लावावा लागतो.

*मलाष्म* – जेव्हा व जेथे सेंद्रिय वस्तू जतन होण्यायोग्य नैसर्गिक परिस्थिती असते तेव्हा व तेथे मानवाच्या विष्ठेचे किंवा मलाचे मलाव्य (कॉप्रोलाइट) तयार होतात. पुराविकृती तज्ज्ञांना हे मलाष्म, एखाद्या जुन्या राजवाड्यात सापडलेल्या दागिन्यांपेक्षाही मोलाचे वाटतात. या मलाष्मांच्या विश्लेषणांत जे सापडते त्यावरून माणसाचा आहार, त्याच्या विकृती, विविध ऋतूंतील त्याच्या क्रिया, अन्न शिजवण्याच्या पद्धती याबद्दल माहिती मिळते. परागकण, कोळश्याचे कण, केस, हाडाचे शंख शिंपल्याचे तुकडे, परोपजिवी जंतांची अंडी, असा खजिना मलाष्मात मिळतो. ऐतिहासिक वास्तुंच्या अवतीभवती सापडलेल्या मलाष्मावरून त्या काळची सांडपाण्याची स्वच्छता-सफाईची व्यवस्था काय होती याचा कल्पना येऊ शकते. मलाष्मात परोपजिवी जंतांची जी अंडी सापडतात, त्यावरून त्या काळी मानवाला होणाऱ्या विकृतीबद्दल अंदाज बांधता येतो.

*हाडांवरील खुणा* – हाडांवरील जखमेच्या, इजेच्या खुणांवरून आजुबाजूची प्रागैतिहासिक काळातील अँग्लोसॅक्सन सांगाड्यात पायांच्या हाडांवर हाडे तुटून सांधल्याच्या फ्रॅक्चरच्या खुणा मोठ्या प्रमाणात आढळतात. त्याप्रमाणात बाहुंच्या हाडांवर अशा खुणा आढळत नाहीत. खडकाळ डोंगराळ प्रदेशात फिरणारे, पायात व्यवस्थितपणे न बसणारे अविकसित जोडे घालून फिरणारे हे अँग्लोसॅक्सन धडपडत असावेत !

हाडांवर हिंसाचाराच्या अवयवच्छेदनाच्या खुणासुद्धा आढळतात. पुरातन काळी काही जाती नरभक्षक असाव्यात असा संशय हाडांवरील अवयवच्छेद याच्या खुणांवरून तज्ज्ञांना आला आहे.

प्रागैतिहासिक काळातील हाडांवर जंतूंच्या संक्रामणाच्या (इन्फेक्शन) खुणा आढळल्या आहेत. उत्खननात सापडलेल्या हाडांवरील काही विशिष्ट खुणांवरून कर्करोग हा पुरातन रोग आहे असे तज्ज्ञांनी सिद्ध केले आहे. हाडांच्या व्यंगावरून जीवनसत्वाची न्यूनता, मुडदुसाचे सारखे रोग, त्या काळीही होते असे तज्ज्ञांनी दाखवून दिले आहे.

---



अनुक्रमणिका

# समाज आणि संगीत

## शब्दविरहित संगीत

**–(कै.) श्री. श्री. ह. देशपांडे**

"संगीत हे मोघम स्वरूपाचे असते. इतके की त्यातून काय समजावे हे कळत नाही. अशी लोकांची नेहमी तक्रार असते. शब्द मात्र कोणालाही समजतात. पण माझे मत मात्र याच्या नेमके उलटे आहे." – फेलिक्स मेंडेल सॉन.

एखाद्या नुकतीच ओळख झालेल्या माणसाला आज विचारले की, तुम्हाला अभिजात संगीत कितपत आवडते तर तो असे समजून चालतो की, मी वाद्यसंगीताबद्दल विचारतो आहे आणि वाद्यसंगीत म्हणजे अर्थातच सिम्फनी, कॉन्सर्टो, चेम्बर म्युझिक आणि सोनाटा, असे असून, दररोज त्यांच्याच कार्यक्रमांनी आपले हॉल भरून गेले असतात. त्यांच्यात शब्दांची सोबत असलेले ऑपेरा ओरॅटोरिओ किंवा चर्चमधील संगीत यांचा काहीसा प्रवेश होतोही, पण महत्त्वाचे म्हणून ते फारसे मानले जात नाहीत. शिवाय शब्दांसहित संगीताच्या इतर प्रकारांतही ऑपेराला खास मान दिला जातो. कारण इतर संगीत प्रकारांत रस न घेणाऱ्या लोकांना ऑपेरा उत्साहित करतो. म्हणजे अशा माणसांचे लक्ष नाटकाकडे अधिक असते असे समजायला हरकत नसावी.

वाद्यसंगीताचा हा प्रभाव ही अलीकडची घटना आहे. या पुस्तकाच्या दुसऱ्या प्रकरणात पहिल्याप्रमाणे संगीताच्या कार्यक्रमासाठी ही गोष्ट स्वतंत्रपणे प्रस्थापित होण्याची नोंद करण्याला संगीताच्या इतिहासाला बराच वेळ लागला. मायकेल हर्डच्या म्हणण्याप्रमाणे, लंडनमधील यॉर्क बिल्डिंगस्‌मध्ये, संगीतासाठी खास दालन असलेली इमारत १६७८च्या सुमारास उभारली गेली. युरोपमधील सार्वजनिक कार्यक्रमासाठीचा असा हॉल हा पहिलाच असावा. ऑक्सफर्ड येथील होलीवेल म्युझिक रूमच्या बरीच अगोदरची ही गोष्ट होती. इ. स. १७४२-४८च्या काळात ती बांधली गेली असून, निकोलस पेव्हस्नेर म्हणतो त्याप्रमाणे संगीताच्याच कार्यक्रमासाठी बांधलेली इंग्लंडमधील ही पहिलीच इमारत होती. पण होलीवेल म्युझिक रूम अजून वापरात असून, यॉर्क बिल्डिंगज् कामातून गेली आहे.

संगीताची सुरुवातीची वाद्ये ही माणसाच्या आवाजाचे अनुकरण करणारी केवळ होती आणि त्या आवाजाशी संबंध नसलेले आणि शब्दहीन स्वरमालिका असलेले संगीत प्रस्थापित होण्यास पुढे शेकडो वर्षे लागली.

"संगीताने मारलेली आपल्या कल्पकतेची ही सर्वात उंच भरारी होती आणि आता तर आपल्या अनुभवाचा तो इतका निगडित असा भाग झालेला आहे, की हा फरक किती

मूलभूत आहे हे सहजासहजी लक्षात येत नाही. अर्थातच वाद्यांच्या साथीखेरीज असलेल्या संगीताचा आस्वाद आपण अजूनही घेतो. पण माणसाचा आवाज अंतर्भूत नसलेले संगीत ऐकणाऱ्या आपल्या पूर्वजांनी हा शोध लावला आणि कलाप्रेमाची क्षितिजे कल्पनातीत अशी विस्तारली, असेच म्हणायला हवे.''

शब्दांच्या संगतीपासून संगीताची सुटका होण्याची घटना लोकांना वाटते, त्यापेक्षा इतिहासात बरीच उशीरा घडून गेली असे चार्लस रोझेनचे म्हणणे आहे.

अठराव्या शतकाच्या सुरुवातीच्या काळात, सार्वत्रिक संगीत, हे काही अपवाद वगळता, कंठसंगीत असून ते धार्मिक भावना व नाट्य यांतील शब्दसमूहाशी निबद्ध झालेले असे. अर्थातच शेकडो वर्षे, वाद्यसंगीत प्रचालित होतेही. पण कंठसंगीताची प्रस्तावना, त्याची आकर्षक मांडणी, आणि त्याच्या मध्यंतरांतील करमणूक एवढ्यासाठीच त्यांचा वापर होत असे. (तथापि त्यातही काही उत्कृष्ट कलाकृती निर्माण झाल्या होत्याच) त्यामुळे संगीताला धार्मिक भावनांचे उद्दीपन आणि नाट्यमयता यांसाठीच प्रतिष्ठा प्राप्त झाली होती.

कंठसंगीताचा समावेश नसूनसुद्धा वाद्यसंगीत हे मानवी भावनांचा आविष्कार करू शकते, असे आपण समजतो, तरी त्यातून विवक्षित भावना नेमकी श्रुतिगोचर होते असे मात्र नाही. पण ही एक अलीकडील समजूत आहे असे सॅम्युअल वेल्सले (१७६६-१८३७) याच्या आठवणीतून दिसून येते.

''हेडनचे ॲलेग्रोज याचे वैशिष्ट्य म्हणजे उल्हासाची प्रेरणा असून ऐकणाऱ्याचे हृदय तीमुळेच भरून येते. उलट त्याची ॲडागिओज ही करुणेने परिप्लुत असून इतकी हळुवार असतात की त्याचा ऐकणाऱ्यावरील परिणाम तितकाच हेलावून टाकणारा असतो.''

संगीतामधील वाद्ये ही परिणामकारक वाटली तरी ती स्पष्ट अशी उच्चारक्षम नसतात; असे मानण्याची आजकालची प्रवृत्ती आहे. पण १९व्या शतकाच्या सुरुवातीच्या काळातही उच्चारक्षमतेत वाद्ये कंठसंगीताची बरोबरी करतात हे पाहून वेस्लेला आश्चर्य वाटले होते.

संगीताचे कार्यक्रम जाहीर झालेले असले तरी त्यांच्या प्रारंभापासूनच ते ऐकणारा समाज हा त्यात प्रत्यक्ष भाग घेणाऱ्यापेक्षा वेगळा ठरला होता. कोणत्याही संस्कृतीत अशा कार्यक्रमांतील संगीतकार आणि रचनाकार हे आपल्या कलाविष्कारात कुशल असले तरी धार्मिक विधी, नृत्य वा इतर समारंभ अशा ठिकाणी संगीताने साथ द्यायची तर सगळ्या लोकांनी त्यात भाग घ्यायचा अशी कल्पना होती. पण धंदेवाईक संगीतकारांच्या कार्यक्रमाच्या प्रसंगी मात्र ऐकणाऱ्यांनी त्यात भाग घ्यावा अशी अपेक्षा नव्हती. परिणाम झाला तो असा की संगीताचा म्हणून समजला जाणारा अनुभव हा केवळ व्यक्तिगत आणि अनपेक्षित असा होऊन राहिला.

शब्दांपासून संगीताची फारकत केल्यामुळे, एक परिणाम होतो तो असा की संगीताचा अर्थ कळायला अवघड जातो. म्हणजे तो संदिग्ध असतो, शब्द हे आपला आशय निश्चित

करतात. तेव्हा आपल्याला अवगत असलेल्या भाषेतील गीत ऐकताना आपण काय समजायचे हे आपल्याला माहीत असते. पण सिम्फनी ऐकत असताना तशी खात्री देता येत नाही. मग शुद्ध संगीताबद्दल वाद होतात; कारण त्यांचा संबंध वाद्यसंगीताशी येतो आणि ते तर आपल्या बाहेर जात नाही. त्याऐवजी संगीत हे शब्दांच्या सहवासात येते. म्हणजे ते जेव्हा विजयोत्सव अगर अंत्यविधीच्या प्रसंगी वाजविले जाते; त्या वेळी त्याच्या अर्थाबद्दल प्रश्न उपस्थित होत नाहीत. आपल्याला त्या वेळी काय वाटत असते ते कळते आणि तसे ते वाटतेही. दुसऱ्या प्रकरणात पहिल्याप्रमाणे संगीत अशा प्रसंगाना अर्थ देते आणि तेथे जमलेल्या समूहाला एका तऱ्हेने जागृत करते आणि त्या जागृतीला आकार आणून देते.

अशी जागृती ऐकणाऱ्यांच्या समूहामधील सगळ्यांना सारखी येत असली तरी ज्या पद्धतीने संगीत मांडले जाते, तिच्या संबंधीच्या बऱ्याच प्रतिक्रिया मात्र व्यक्तिश: आढळून येतात. त्यातील काहींना ते संगीत जवळचे असले तरी असे होत नाही. एका संशोधनाचा मी मागेच उल्लेख केलेला आहे. त्यानुसार असे दिसून येते की एखाद्या संगीतकृतीतील भावात्मक महत्त्वाबद्दल ते ऐकणाऱ्यांत सर्वसाधारण सहमत असले तरी ते सहमत तिच्या एकूण परिणामाबद्दल असलेले दिसते. सार्वजनिक प्रसंगीसुद्धा माझ्या शेजारच्याला मला वाटते नेमके तसेच वाटत असेल याची मला खात्री नसते. अंत्यविधीच्या वेळी तो कदाचित हसत असायचा, राज्यारोहणाच्या प्रसंगी तो चेष्टा करील, किंवा लग्नसमारंभात तो मत्सरग्रस्त असेल. या गोष्टी फारशा आढळलेल्या नसल्या तरी त्या शक्य मात्र वाटतात. ऑर्केस्टॉचे संगीत चालू असताना श्रोतृसमूहांतील इतर लोकांना काय वाटत असते, हे कळणे तर अधिक अवघड आहे. कारण त्या संगीताचा बाह्य गोष्टीशी संबंध नसतो. ते ऐकताना आपण उत्साह दाखवीत असलो तरी त्या वेळी सगळेजण हा एकच प्रकारचा अनुभव घेत असतील याची मला खात्री वाटत नाही.

आणखी असे की परिचित असलेले संगीत प्रथमच ऐकताना, त्यामुळे बौद्धिक तशाच भावनिक प्रतिक्रियाही काही लोकात संभवतात. बऱ्याच वेळी ते ऐकून झाल्यानंतर मात्र त्यातली तीव्रता मावळते. विसाव्या शतकांतील संगीतात अनेक प्रकारच्या शैली दाखल झालेल्या दिसतात आणि नवीन प्रकारचे संगीत, तज्ज्ञ संगीतकारांनाही त्याचे पुरेसे स्वरूप जाणून घेण्यासाठी पुन्हापुन्हा ऐकावे लागते. शिवाय परिचित असलेल्या संगीतकृतीची वेगळ्या तऱ्हेने मांडणी केल्यास तिच्यातून काही नवीन गोष्टी कळून येतात आणि आपला दृष्टीकोन बदलतो. संगीत हे काही झाले तरी त्याच्या प्रत्यक्ष आविष्कारावरच अवलंबून असते महत्त्वाचे संगीतही नीट मांडणी केली नाही तर ते रूक्ष वा क्षुल्लक वाटते. उलट बीचामसारखा थोर कंडक्टर किंवा क्रेस्लरसारखा सोलोइस्ट हा एखादी क्षुल्लक संगीतकृती किती अर्थवाही आहे हे आपल्याला पटवून देतो.

संगीताच्या एखाद्या कार्यक्रमामुळे जाणकार रसिकांतसुद्धा वेगवेगळ्या प्रतिक्रिया उमटून येतात. एकाच मैफिलीचे परस्परविरोधी अहवाल, वर्तमानपत्रात प्रसिद्ध करण्याबाबत समीक्षक



अनुक्रमणिका

मशहूर आहेत. परंतु अशी टीका करताना त्यांना माहीत झालेल्या संगीताबद्दलच जास्त काळजी वाटते आणि नवीनाची ते उपेक्षा करतात. हे आपण लक्षात घ्यायला हवे. कारण लोकांची आवड ठरून गेलेली असते.

नवीन संगीतरचनेची समीक्षा करणे हे अवघड काम आहे. दुसऱ्या प्रकरणात सांगितल्याप्रमाणे विश्लेषणात्मक टीका करताना संगीतातील भावगर्भतेचे भान राहात नाही. संगीताचे रसग्रहण करताना या दोन्ही दृष्टीकोनाची गरज असते. पण या दोन्हींचा वापर एकाच वेळी होऊ शकत नाही. तसा प्रयत्न करताना समीक्षक बहुधा अशक्य गोष्टींच्या पाठीमागे लागत असतात. संगीतापासून थोडेसे अलग राहून त्याची आकृतिमयता न्याहाळण्याचे ठरविले तर त्यातले आविष्कारसामर्थ्य त्यांच्या नजरेत येत नाही. उलट त्याच्या भावाविष्कारात ते रमून गेले की त्यांचे अलिप्त बौद्धिक निरीक्षण बाजूला पडते. अलीकडे रेकॉर्ड झालेले संगीत ऐकायला मिळत असल्याने, समीक्षकांनी ते एकदाच ऐकून त्याचे विचारपूर्वक परीक्षण करावे, अशी फारशी अपेक्षा करू नये असे मला वाटते.

एकाच माणसाच्या मनात, वेगवेगळ्या प्रसंगी तेच संगीत ऐकून विविध भाव उद्भवतात. वास्तविक ते संगीत त्याला पूर्णपणे माहीत झालेले असतेही. एखादा माणूस खिन्न झालेला असला तर परिचित संगीत ऐकूनही त्याच्या मन:स्थितीत फरक पडत नाही. तरीसुद्धा तसा बदल घडवून आणण्याची क्षमता संगीतात अर्थातच आहे. आपल्या मनातील विषण्णता संगीत ऐकून वाढते, असे म्हणणारे लोक आढळतातही. पण बाह्य गोष्टींना कसलीही दाद देता येत नाही, इतकी तिची तीव्रता नसली तर त्याच्या मनाचे उद्दीपन करण्याचे सामर्थ्य संगीतात जरूर आहे. जीवनाकडे अजिबात दुर्लक्ष करण्याच्या प्रवृत्तीपेक्षा ते दु:खदायक असते इतपत समज असणे पुरेसे आहे.

विल्यम स्टायरोन या लेखकाची एक वेगळीच कथा आहे. अगोदरचे काही महिने त्याची मन:स्थिती बरीच बिघडली होती. उद्याचा दिवस आपल्याला ठीक जाणार नाहीच हे त्याने जाणले आणि आत्महत्येची तो तयारी करू लागला.

"माझी बायको झोपली होती. मग मी सिनेमाची एक टेप ऐकायला लागलो. त्यातल्या एका तरुण नटीने मागे माझ्याच नाटकात काम केले होते. या फिल्ममध्ये मात्र तिला छोटसे काम होते. सिनेमाचा विषय १९व्या शतकामधल्या बोस्टनमधला होता. एका क्षणात त्यातली सगळी पात्रे खाली म्युझिक हॉलमध्ये उतरली आणि त्याच्या भिंतीच्या पाठीमागून एका बाईचा घोगरा आवाज आला. ब्राह्मच्या ऑल्टो– हॅप्सोडीतला तो होता."

गेले कित्येक महिने जो आवाज मी ऐकत नव्हतो, तो माझ्या ह्रदयात आता खंजिरासारखा घुसला, आणि आठवणींनी माझ्या मनात गर्दी केली. घरात जेवढा काही आनंद असायचा, म्हणजे मुलांची धावपळ, सण वगैरे तो सगळा मला अनुभवायला मिळाला."

या एकदम कानावर आलेल्या संगीताचा परिणाम त्याच्यावर झाला तो हा की

आत्महत्या करून जवळच्या लोकांना आपण दुखवू नये; हे त्याच्या लक्षात आले. दुसऱ्या दिवशी, तो आपणहून मनोरुग्णांच्या हॉस्पिटलमध्ये दाखल झाला.

हरमान रोसचार्च याच्या नावाने एक मानसिक परीक्षा घेतली जाते. त्यानेच ती प्रथम अमलात आणली होती. या पद्धतीने पेशन्टला एकसारख्या आकाराचे शाईचे दहा ठिबके दाखविले जातात. त्या ठिबक्यांत पाहण्यासारखे काहीच नसल्यामुळे, त्यात काय असते त्यांचे, हे तो पेशन्ट त्याच्या मनात सुचलेल्या कल्पनेनुसार वर्णन करतो. म्हणजे त्याला काहीतरी गूढ देखावे, भुते, सैतान दिसतात असे तो सांगतो, आणि एकूण आपल्या बेचैनी मनोवस्थेचेच दर्शन घडवतो. आपल्याला केवळ निरामय शांतताच आढळली असे तो म्हणाल्यास, तो मनाने स्थिर आहे असे ठरविले जाते. रोसचार्च पद्धती, ही नंतर अमलात आलेल्या अनेक तंत्रांची जननी ठरली. म्हणजे पेशन्टने बाह्य वस्तुमात्रावर स्वत:च्या विचारांचे वा प्रवृत्तींचे आरोपण करू देण्याच्या त्या क्लृप्त्या होत्या. लिओनार्डो द व्हिन्सी हा आपल्या चित्रकलेच्या विद्यार्थ्यांबाबतीत अशीच पद्धती वापरीत असे. जुन्या डाग पडलेल्या भिंती अगर कसेतरी रंगलेले दगड पाहायला लावून तो त्यांच्या कल्पकतेला चालना देत होता. भूमीची आकृती अगर माणसाची हालचाल यांमधील संपूर्ण आकारमयता त्यांच्या त्यामुळे लक्षात येईल असे त्याचे म्हणणे होते.

संगीताचे कार्य असेच असते असे म्हटले जाईल. एका विशिष्ट प्रकारच्या संगीताला दिली जाणारी दाद ही श्रोत्यांच्या मन:स्थितीवर अवलंबून असते, आणि त्याला येणारा संगीतानुभव, प्रत्यक्ष परिणामापेक्षा त्याच्या स्वत:च्या भावनेचाच तो प्रतिसाद वा उद्गार असतो असे म्हणता येते.

संगीतात शब्द नसतील वा त्यांचा संदर्भही नसला आणि संगीतकार ते आपल्यापुरतेच मांडीत असेल, तर त्याला मिळणारे प्रतिसाद हे वेगवेगळे असल्यास नवल नाही. असे असूनही श्रोत्यांत काहीसे एकमत होते, ही आश्चर्याची गोष्ट आहे. वर सांगितलेल्या अडचणी असूनही परिचित असलेल्या संगीताचे श्रोते, हे सगळे मिळून एकच अनुभव घेत असतात, असे मानून चालणे उचित होईल.

एकाच बैठकीतील वेगवेगळ्या रसिकांना संगीताचा एकच अर्थ आणि तोही नेमका मिळतो. शब्दांच्या साहाय्याने तितकेसे होत नाही, असे काही लेखक म्हणतात. किंबहुना तशा या संगीतातून, चुकीचा वा वेगळा अर्थ निघूच शकत नाही; असेही त्यांचे मत आहे. या प्रकरणाच्या शीर्षस्थानी दिलेले वचनही मेंडेलसॉनच्या एका पत्रातून निवडले आहे. त्यात तो पुढे म्हणतो :—

"एका माणसाला अर्थ कळतो, तसाच त्या शब्दाचा अर्थ दुसऱ्याला समजत नाही. फक्त सूराकडूनच तसे काम होते. आणि दोघांमध्ये एकच भाव उद्भूत होतो. पण तो भाव शब्दांतून व्यक्त होईलच असे नाही."

प्राऊस्टचे विचारही याच चालीचे आहेत. एका कार्यक्रमाच्या मध्यंतरात बरेच श्रोते गप्पा करायला त्याच्याभोवती गोळा झाले होते.

"पण त्यांचे बोलणे तरी काय होते? त्यांचे बोलणे इतर माणसांसारखेच असून मी ते फक्त ऐकत होतो. मला मात्र ती संगीताची स्वर्गीय सुरावट एकसारखी जाणवत होती. जणूकाही मी एक शापित गंधर्व असून स्वर्गाच्या आनंदमयतेतून या बाजारी जगात उतरलो होतो आणि निसर्गाने त्याग केलेल्या प्राणीमात्राचे अवशेष कुठे कुठे आढळून येतात, त्याचप्रमाणे संगीताचे एकमेव असे उदाहरण का नसावे असे मी स्वत:ला विचारीत होतो. अर्थात त्याच सुमाराला भाषेचा उद्गम, वाक्यांची रचना आणि कल्पनांची फोड या गोष्टी अवतरल्या नसल्या तरी, म्हणजेच दोन जीवांचा संवाद, अशी शक्यता आता नाही, एकूण मानवजातच उच्चारीत आणि लिखित भाषेच्या इतर मार्गांने विकास पावली आहे."

या ठिकाणी प्राऊस्ट आणि मेन्डेलसॉन हे दोघे एका विवक्षित पाश्चात्य संगीतपरंपरेला उद्देशून बोलत आहेत हे उघड आहे. जिवाभावातील संवाद हा ते दोघे एकाच संस्कृतीतले आणि एकच संगीत ऐकत असतील तरच शक्य आहे.

तथापि वेगळ्या संदर्भात, शब्दहीन संगीताचा नेमका अर्थ लावता येतोही : शेजारी बसलेली दोन माणसे आपले ओठ न उचलता, केवळ गुणगुण करतात आणि तरीसुद्धा 'मला कंटाळा आलाय' 'मला बरं वाटतंय' अशा तऱ्हेची माहिती एकमेकांत विनिमीत होऊ शकते. भाषणातील संगीतमयता, वाक्यरचना न करताही वेगळ्या संस्कृतीमधील लोकात चालू राहते. याचे कारण असे की, त्यांच्या आवाजातून मूलभूत मानवी भावना व्यक्त होतात आणि त्यात निरनिराळ्या संगीत प्रकारांचा अभाव असतो. काही संगीतकारांना भाषेतील संगीतमयतेची जाणीव असेलही. जानासेक याने भाषेतील आलापीची वळणे पद्धतशीर रीतीने रेकॉर्ड करून ठेवली आहेत. त्यांना तो भाषेतील 'आलापचारी' असे नाव देतो. त्याच्या संगीत रचनापद्धतीतली ती मध्यवर्ती कल्पना आहे.

असे असूनही संगीताकडून होणारी भावजागृती, ही नेमकी अगर स्पष्ट नसते आणि एक भाव दुसऱ्यात सहजासहजी मिसळला जातो, हे लक्षात घ्यायला हवे. एखादी कलाकृती ही अर्थपूर्ण होती, असे समीक्षकांनी म्हटले तर त्याचे एक कारण म्हणजे ते त्या कृतीत रममाण झाले असावेत आणि मग ती शोककारक, विनोदी, गंभीर वा उथळ होती असेही सर्व-साधारण मत सांगतात. तरीही तपशीलात जाऊन विचार केला म्हणजे त्यांच्यातील मतभेद उघड होतात.

बर्नस्टेनचे हार्वर्ड व्याख्यानात दिलेले एक उदाहरण लक्षात घेण्यासारखे आहे. बीथोव्हेनच्या सोनाटामधील सुरुवातीचे स्वर त्याने घेतले आणि ते ऐकताना, बीथोव्हेनला ते रचित असताना स्वत:ला काय वाटत असावे, असे त्याने म्हणजे बर्नस्टेनने श्रोत्यांना विचारले आणि नंतर बर्नस्टेन आपल्या स्वत:ला काय वाटले याचा खुलासा प्रश्नोत्तर रूपाने

देतो.

"कृपा करा, माझी विनंती आहे. मी काहीही करीन जर, होय, पण फक्त काही अटीवर."

**बर्नस्टेन नंतर विचारतो :—**

"पण बीथोव्हेनला हे सगळे भावत होते? किंवा त्यासारखे काहीतरी? की मीच त्या भावना कुठून तरी कल्पनेने तयार केल्या; किंवा बीथोव्हेनच्या सूरांतून माझ्याकडे त्या आल्या, आणि मग त्या माझ्या झाल्या? हे कधीच आपल्याला कळणार नाही. त्याला आपण विचारू शकत नाही. पण संभव असा आहे की या दोन्ही गोष्टी खऱ्या असाव्यात, आणि तसे असले तर, आपल्याला संदिग्ध गोष्ट महत्त्वाची म्हणून मिळते आणि ती म्हणजे आपल्या वाढत्या माहितीत भर घालणारी एक सुंदर नवी शाब्दिक संदिग्धता."

बर्नस्टेनचे हे विचार बीथोव्हेन ऐवजी त्याच्या विषयीच आपल्याला अधिक सांगतात. बीथोव्हेनच्या स्वरवाक्यांना मी शब्दरूप द्यायचे ठरविले तर मला निराळे शब्द लागतील, पण ते महत्त्वाचे नाही. आपल्याला नेमके समजते ते हे की, त्याच्या या सोनाटामधील परस्परविरोधी वचने ही प्रश्नोत्तररूपी असावीत आणि हा प्रकार बीथोव्हेन दुसरीकडेही वापरतो. उदाहरणार्थ बीथोव्हेन स्वत:च आपल्या शेवटच्या स्ट्रिंग क्वार्टेटमध्ये तशी भाषा वापरतो.

प्रश्नामागून उत्तरे करण्याची सवय आपल्यात इतकी रूजली आहे की, ती आपल्या लक्षातही येत नाही. या दोन्ही संगीतकृतींत बीथोव्हेन प्रश्नोत्तरांचा सारांश शब्दांखेरीज अशा संगीतात सांगतो. संगीताबद्दल शोपेनहायरने केलेले काहीसे विवेचन मला मान्य नसले तरी संगीत हे प्रत्येक घटनेचे आंतरिक स्वरूप प्रकट करते. या त्याच्या म्हणण्याशी मी सहमत आहे.

'दी ज्यूइश ब्राइड' या चित्रात रेम्ब्रान्ट मानवी प्रेमभावनांचे रहस्य असे रंगवितो की त्यातील व्यक्तीची स्वत:ची माहिती प्रेक्षकांना मिळत नसली तरी चालते. याच चालीवर एखाद्या विवक्षित गोष्टीतून बीथोव्हेन हा माणसांच्या प्रश्नोत्तर करण्याच्या वरील विषयांचे आकारमान पाहतो. याच कारणाने बर्नस्टेन करीत असलेले व्यक्तिमात्रातील संवादाचे विवरण मनाला तेवढ्यापुरते अस्वस्थ करते. त्यालाही तेच हवे असावे. बीथोव्हेनची उत्कृष्ट पण सर्वसाधारण विधाने वैयक्तिक अपेक्षेतून अर्थातच समजून घ्यायची नसतात. संगीत ऐकत असताना आपण आपले पूर्वग्रह आणि भावना विसरून आलेले नसतो. पण आपणाला त्यांच्या पलीकडे नेण्याची कुवत जितपत संगीतात असते, त्यामानाने ते श्रेष्ठ ठरते.

डेरिक कूक याने,'दि लँग्वेज ऑफ म्युझिक' या ग्रंथात असा विचार मांडला आहे की, पाश्चात्य संगीत परंपरेत विवक्षित भाव प्रकट करण्यासाठी कोणते आविष्कार प्रकार उपयोजिले जातात याबद्दल रचनाकारांत मतभेद नसतात. उदाहरणार्थ, मेजॉर थर्डमधील

स्वरांतर उल्हास आणि मायनॉर थर्ड हा विषादाचा भाव निर्माण करतो. उलट बेसूर आवाज, हा रचनाकाराकडून अमानुष वातावरण उत्पन्न व्हावे म्हणून वापरला जातो. स्वरांचा असा वापर केलेल्याची उदाहरणे देताना तो मोझार्ट वॅग्नेर, लीझ्ट, वर्लीओझ, गौनाड आणि बुसोनी वगैरेंचा उल्लेख करतो. कूकचे पुस्तक वाचून त्यात बरेच तथ्य आहे, हे न पटणारे कोणी असेल असे मला वाटत नाही. तथापि, त्याच्या मतप्रणालीवर बरीच टीका झाल्याचे 'अपवादही' आढळतात. शिवाय कूक आपले विवेचन युरोपीयन कलासंगीतापुरतेच मर्यादित ठेवतो. आणि ते संगीत केवळ स्वरप्रधान असते.

कूक म्हणतो त्यापेक्षा संगीताचा भावनिक परिणाम हा त्यातील विशिष्ट आविष्कार-प्रकारापेक्षा त्यांच्या संदर्भावर अवलंबून असतो. एड्यूअर्ड हॅन्स्लीक या ऑस्ट्रीयन समीक्षकावर वॅग्नेरने जहरी टीका केली होती. हॅन्स्लीकच्या मताप्रमाणे ग्लकची आलापी ही हानीकारकता प्रदर्शित करते, हे माहीत नसले तर ती आपल्याला आनंददायी वाटेल. फ्रेंच कॅरोल हे ख्रिसमस गीत म्हणून गायले तर त्यातली कोमलता मोह पाडते. वास्तविक त्यातील सूर हे मद्यप्राशनाच्या प्रसंगीच उपयुक्त ठरतात. व्हर्डीच्या रिक्वायेम या शोकगीतात एक उंच पुरुषी आवाज शाश्वत आयुष्य हवे अशी मागणी करण्याऐवजी तिसऱ्याच गोष्टीची याचना करतो.

अनुभवी रसिकांतील बहुतेकांच्या मताने मोझार्टचे स्ट्रिंग क्रिन्ट्रेट हे एक उत्कृष्ट शोकगान आहे. उलट काहींचे म्हणणे असे आहे की, त्यातली अखेरची गतिमानता, ऐकणाऱ्याला उल्हसित करते. कारण तिच्या संथ प्रस्तावानंतर प्रमुख सूर ते बदलते. तथापि, मोझार्टचा अभ्यासक आल्फ्रेड ऐनस्टिन याच्या म्हणण्याप्रमाणे, मोझार्ट हा आपल्या संगीतकृतीत त्या सूरांत तसाच फरक करतो आणि त्यामुळे त्यातील शोकभावना अधिक गडद होत जाते.

थोर रचनाकारांनी स्वत:च्या विवक्षित रीतीने केलेला वैश्विक भाववृत्तीचा सर्वश्रेष्ठ आविष्कार म्हणजे संगीत होय, अशी डेरिक कूक याने व्याख्या केली आहे. तथापि, ही भाववृत्ती ते ऐकणाऱ्यात स्वतंत्ररित्या उद्भवत नसून रचनाकार तिचा परिपोष आपल्या कलाकृतीत तिचे रूपांतर करून करीत असतो.

संगीताचा अर्थ कोणता याबद्दल अनेक संगीतकारांनी आणि समीक्षकांनी वाद केले आहेत; इतके की संगीत आणि मानवी भावना यांचा काही संबंध असतो, हे सिद्ध न करण्याचा प्रयत्न त्यातल्या काहींनी सोडून दिला आहे. संगीत ही पूर्णपणे स्वायत्त कला आहे. संगीत कृतींना त्यांच्या बाहेर काही अर्थ नसतो आणि ते ऐकणाऱ्यांचा अनुभव हा त्याच्या आकृतिमयतेचा परिणाम असतो असे म्हणणारा एक पक्ष आहे. हॉन्स्ली या भूमिकेचे पुढीलप्रमाणे समर्थन करतो.

"संगीतातील सौंदर्यानुभवांसंबंधीचे अनेक ग्रंथ मी वाचले. माणसाच्या मनात त्यामुळे

होणाऱ्या भावजागृतीच्या संदर्भातच त्यांनी त्याचे स्वरूपवर्णन केले आहे. पण ती जागृती करण्यासाठी संगीतात तसे आविष्कार सामर्थ्य असते असाही त्यांचा दावा आहे. पण हे सगळे वाचून माझ्या मनात उलट संदेहच नव्हे तर विरोधी प्रतिक्रिया निर्माण झाली. संगीताचे स्वरूप हे तात्त्विक भाषेत निश्चित करणे हे चित्रकलेबाबतच्या तशा प्रयत्नापेक्षाही अधिक कठीण आहे. याचे कारण, त्यातून त्याचा आशय आणि त्याची अभिव्यक्ती अगर आकृतिमयता या संकल्पना वेगळ्या आणि स्वतंत्र करणे शक्य नाही. वाद्यसंगीतात अमुक एक आशय आहे, तसेच कंठसंगीत हे त्यातील शब्दरूप कवितेने फक्त आशयघन वाटते, असे म्हणणाऱ्यांनी संगीत या कलेचाच निरोप घ्यायला हवा, कारण त्यातून या दोन संकल्पना अलग करून दाखविणे कोणालाच जमणार नाही. तरीसुद्धा वाद्यसंगीतात आशय अजिबात नसतो असे म्हणणाऱ्यांशी मात्र मी सहमत नाही. तसा मी सहमत आहे असा माझ्यावर निष्कारण आरोप केला जातो. संगीतामधील उत्स्फूर्त आणि अर्थहीन आकृतिमयता यात फरक कसा करता येईल? उत्स्फूर्ततेची कल्पनाच माझ्या मनात आहे. माझ्या विरोधकांनी दुसऱ्या अर्थहीनतेच्या कल्पनेबद्दल मला उगीचच दोषी ठरविले आहे.''

आकृतिमयतेतील उत्स्फूर्तता आणि तिची अर्थहीनता या दोन संकल्पना वेगळ्या करून हॅन्स्लिकने आपल्या पहिल्या भूमिकेपासून माघार घेतलेली दिसते. आकृतीत काही आश्य असला तर तिच्यात काहीसा भावनिक अर्थवाहीपणा असणे जरूरीचे आहे.

स्ट्रॉव्हिन्स्किनेसुद्धा अशीच भूमिका पत्करलेली दिसते. रॉबर्ट क्रॅफ्टशी तो आपल्या एका विधानाबद्दल चर्चा करीत होता. ''कोणताही भावाविष्कार करण्याचे संगीतात सामर्थ्य नसते'' हे ते विधान होते. संगीत हे अलौकिक वा अमूर्त कल्पनांचा आविष्कार करते आणि संगीतकाराचा भाव आणि त्याचे प्रत्यक्ष संगीत यात घनिष्ट संबंध असतो. या मतप्रणालीला त्याचा जोरकस विरोध होता. रचनाकारांची कृती हे त्याच्या भावनांचे फलित आहे. हे स्ट्रॉव्हिन्स्की मान्य करतो. पण त्याहीपेक्षा संगीतरचनेबद्दल महत्त्वाची गोष्ट असते ती ही की ती अभिनव आणि रचनाकाराच्या भावनांच्या पलीकडे गेलेली असायला हवी, असे त्याचे म्हणणे आहे. 'नवीन संगीतकृती हे एक नावीन्य असून ते आपणहून आविष्कृत होते, असे त्याचे मत होते. त्याचप्रमाणे रचनाकार काळजी करीत असतो. ती सूरांच्या आकृतिमयतेची त्यातील अर्थाची त्याला फिकीर नसते, असेही स्ट्रॉव्हिन्स्कीने म्हटले आहे.

स्ट्रॉव्हिन्स्कीच्या मताचा, ते पूर्णपणे मान्य न करताही विचार करणे शक्य आहे; संगीताच्या अर्थाबद्दल आजवर बरेचसे आणि काही भरमसाट लिहिले गेले आहे. तरी स्ट्रॉव्हिन्स्की जेव्हा रिचार्ड स्ट्रॉसच्या संगीताला 'गुळचट' म्हणून हिणवतो, त्या वेळी तो त्याच्या आकृतिमयतेबद्दल नव्हे तर भावप्रदर्शनाविषयी बोलत असतो :

हिंडेमिथ आपल्या लेखनात स्ट्रॉव्हिन्स्कीचीच भूमिका मान्य करतो.

''रचनाकारचे स्वतःचे भावविश्व प्रकट करणे संगीताला अशक्य आहे. वास्तविक तो

काही करतो ते असे :– काही विशिष्ट स्वरमेळ हे श्रोत्यांच्या तशाच काही भाववृत्तींशी जुळून येतात हे त्याला अनुभवावरून माहीत झालेले असते. मग ते स्वरमेळ पुन:पुन्हा आठवून आणि लिहून तो आपली खात्री करून घेतो आणि श्रोत्याकरवी तशीच अपेक्षा ठेवत, तो आपण स्वत:ही त्याच भावपरिसरात रमून गेलो आहोत, अशी समजूत करून घेतो.''

संगीत हे भावनांचे उद्दीपन करते ही गोष्ट हिंडेमिथ नाकारीत नाही. पण त्या बाबतीत रचनाकार काहीतरी चलाखी करतो, आणि आपणाला जे वाटते तशीच श्रोत्यांची भावना होते, अशी तो स्वत:ची समजूत करून घेतो, असेही तो सांगतो.

**हिंडेमिथ पुढे लिहितो :—**

''संगीतातील काही अनवट प्रकार योजून, श्रोत्यांवर भावनात्मक परिणाम घडून येतो, याच्यावर सुद्धा रचनाकारांचा पुरेसा विश्वास नसतो. पण अनुभवाने आणि चातुर्याने त्यांची फेरमांडणी तो करतो; आणि विषण्णतेच्या किंवा उल्हासाच्या प्रतिमा कोणत्या क्लृप्त्यांनी होतात, हे जाणून तो ऐकणाऱ्यांच्या मनात एकतानता निर्माण करण्यात काहीसा यशस्वी होतो.''

संगीतातील काही आविष्कार प्रकार हे विशिष्ट भावनांशी सुसंगत असतात असे म्हणणारा हिंडेमिथ, डेरिक कूकच्या भूमिकेप्रत अगोदरच आलेला दिसतो. पण नंतर लगेच तो बाजूला सरतो. कारण त्याच्या दृष्टीने संगीतकार वैश्विक अगर वैयक्तिक भाव प्रकट करतो, आणि तो श्रोत्यांपर्यंत पोहोचवितो; किंवा नाही हा प्रश्नच उरत नाही. उलट त्यांची प्रतिक्रिया उमटते, तिच्यात भावना वगैरे काही नसून केवळ प्रतिमा, भावनांच्या आठवणी, आणि स्वप्ने यांचाच प्रभाव दिसून येतो.

पुढील एका प्रकरणात उल्लेख केल्याप्रमाणे इतर कलांपेक्षा, संगीत हे वास्तवाचे सत्य स्वरूप अधिक स्पष्टपणे प्रकट करते; असे शोपेनहायरचे म्हणणे आहे. हिंडेमिथचे मत मात्र याच्या नेमके विरुद्ध आहे. त्याच्या या मतानुसार दृश्य कलाकृती आणि काव्य यांच्यामुळे भावनांचा थेट उत्कर्ष होतो. संगीताने उद्दीपित केलेल्या त्या खऱ्या भावनाच नसतात.

''चित्रकला, कविता, शिल्पकृती आणि वास्तुरचना रसिकांच्या मनात केवळ प्रतिमा निर्माण करीत नाहीत तर त्या कृती त्यांच्या रूपांतरित न झालेल्या आणि अधिकृत अशा भावनांशी जाऊन भिडतात.''

हिंडेमिथच्या विवेचनाचा सारांश असा दिसतो की संगीतकार हे श्रोतृसमाजाला खोट्या भावना अनुभवायला लावून त्यांची दिशाभूल करतात. हिटलरच्या वक्तृत्वात असाच प्रकार असायचा. भरगच्च अशा समाजाला भलतीकडे वळविणे सोपे जाते; हे खरेच आहे. पण अनुभवी रसिकाला हे वर्णन लागू पडेल असे वाटत नाही. याचे कारण, अशा मैफिली त्याने अगोदरच अनेक वेळा ऐकलेल्या असतात. हिंडेमिथ मात्र एवढेच म्हणतो की श्रोत्यांनी पूर्वी



अनुक्रमणिका

अनुभवलेल्या भावनांचीच केवळ संगीत आठवण करून देते. याच्या उलट सुसन लंगरचे म्हणणे असे की, संगीत पूर्वी अनुभवात आलेल्या भावनांची स्मृती जागृत करते; एवढेच नाही तर "न अनुभविलेल्या भावना आणि विकार यांचे सुद्धा संगीत दर्शन घडवते. याचा आशय अर्थात, स्वत्वाचा आविष्कार हाच असतो आणि त्याची प्रतिके दुसरीकडून घेतलेली असली तरी ती आकृतिमय केली जातात, आणि आशय कलात्मक रीतीने बाजूला ठेवला जातो."

संगीताच्या आविष्कारक्षमतेला कमी लेखण्याच्या बाबतीत काही संगीतकार स्ट्रॉव्हिन्स्की आणि हॅन्स्लीक यांच्यापुढे पाऊल टाकतात. त्यांचा दावा असा की संगीताविषयीचा सौंदर्यशोध, हा तांत्रिक भाषेतून त्यातील आकृतिमयता आणि रचनाकृती यांच्यापुरताच मर्यादित असतो. त्यात माणसाच्या भावनांचा संबंध येत नाही. कारण त्या विसंगत ठरतात; ते पुढे असे म्हणतात की हेडनची 'मिलिटरी सिम्फनी' ही जगातली उत्कृष्ट अशी उल्हासकारक कृती आहे आणि ब्राहमची 'फोर्थ सिम्फनी' ही वीरश्रीतून सुखानुभावापर्यंत पोहोचते. असे डोनाल्ड टोवेने केलेले वर्णन ऐकून श्रोते भुवया उंचावून त्याला नापसंती दर्शवितात. संगीताविषयीचे लेखन, हे संगीतकाराचे तंत्रकौशल्य, नेमक्या सुरांची समज दुसऱ्या सुरांकडील प्रवास, लयींतील बदल, यांसारख्या करामतींपर्यंतच पोहोचलेले असावे असे त्याचे मत आहे. पण असा विचार केल्यास ते संगीत ऐकणाऱ्यांचा विषय बाजूला टाकला जातो. अशा प्रकारचे तांत्रिक विश्लेषण हे तसे संगीतावरील लेखन म्हणून केवळ तपासूनही करता येईल. मग त्यातला एकही सूर कधी न ऐकताही काम भागेल.

अशा तऱ्हेच्या विश्लेषणाचे महत्त्व आणि त्याची जरूरी जोसेफ कार्मानला मान्य असली तरी संगीताच्या आकृतिमयतेवरच भर देण्याचा हा आग्रह त्याला संकुचित दृष्टिकोनाचा वाटतो.

"एखाद्या संगीतकृतीतील स्वरांचे केवळ आंतरिक निरीक्षण हे त्या एकूण संगीताचे समीक्षण होऊ शकत नाही. संगीताची स्वायत्त रचनात्मकता ही त्याच्या अर्थवाहीपणाचा फक्त एक भाग असते."

तांत्रिक पद्धतीने केलेले संगीताचे विश्लेषण हे महत्त्वाचे आणि उपयुक्त असते हे मी नाकारीत नाही. संगीतकार आपल्या कलेचा परिणाम कसा घडवून आणतो, यातले मर्म कळले तर ते जरूरीचे आहे व त्याची समज, तशाच तांत्रिक भाषेत कळवण्याचा अट्टाहास केला तर त्याचा उपयोग संगीतकाराला अगर कंडक्टरला होईल, ऐकणाऱ्याला होईलच असे नाही. संगीताची आकृतिमयता अणि रचना यांचा आस्वाद कित्येक श्रोते तशी भाषा न समजताही घेऊ शकतात. तसे त्यांच्याकडून होत नसले तर त्यांना त्याचे महत्त्व वाटणार नाही, संगीतातील रचनात्मकतेचा आस्वाद ही तांत्रिक गोष्ट नाही की तिची समज फक्त तज्ज्ञांना व्हावी, ती शब्दांत सांगता येण्यासाठी, तसा अभ्यास पाहिजे असतो,हे खरेच आहे.

आणि तशी कुवत असणाऱ्याला एकूण संगीतकृतीचे आकलन झालेले असणे अगत्याचे आहे. पण तिचे मर्म न जाणणारा, तरीही तिच्यात रस घेणारा अनभिज्ञ श्रोता घोटाळ्यात पडतो. १९व्या शतकातल्या काही संगीताने तसा अनुभव दिलेला आहे. अशा श्रोत्यांत त्यातली पुनरावृत्ती, सुरांतील बदल वगैरेंची जाण असेतही. त्यामधील अनपेक्षितपणा आणि त्यातून वाटणारे सुख हा काही तशापुरताच मर्यादित विषय नसतो. अशा आविष्कार कौशल्यात हेडन अतिशय प्रवीण होता; हे कळायला श्रोता तज्ज्ञ असावा लागत नाही.

संगीताचे योग्य वर्णन करता येईल, अशी माझ्या मताने, नवीन प्रकारची भाषा हवी आहे. अभिजात संगीत परंपरेचे ज्ञान असलेला टोव्हेसारखा, दुसरा कोणी नाही. पण त्याची भाषा जुन्या वळणाची आणि आजच्या श्रोत्यांना फारशी न समजणारी आहे. वास्तविक ते काही कमी माहीतगार नसतात. तथापि, संगीत हे भावना कशी उद्दीपित करते आणि त्याचे आविष्कार सामर्थ्य किती असते, यांचा विचार सोडून केले जाणारे भाष्य उघडच विचित्रपणाचा नमुना वाटते. तसे केले असता, आपल्या लेखनाचा, वाचक वा लेखक अशा सारख्या माणसाशी काही संबंध नाही असे म्हणणाऱ्या जुन्या रचनावाद्यांची आठवण होते.

वरीलसारखे विश्लेषणवादी संगीताचा आस्वाद घेणे, हे बुद्धिमानतेचे लक्षण आहे असे सांगत असतात. वास्तविक संगीत हे मूलतः माणसाच्या शारीरिक हालचालींच्या लयीत आणि गतिमानतेत मुरलेले असते. या ठिकाणी त्याची आविष्कारक्षमता विचारात घेणे, मागे सांगितलेल्या कारणांनी कठीण झाले आहे. पण तसा प्रयत्न करायला हरकत नसावी, म्हणून वरील तांत्रिक रचनावाद आणि आविष्कारवाद या दोन्ही भूमिका त्यांना धक्का न लावता विचारात घेणे शक्य होईल.

संगीत हे शब्दबद्ध आणि सार्वजनिक समारोहाशी निगडित होते; त्या वेळी असा वाद होण्याचे कारण नव्हते. तो वाद अभिजात संगीताचा उदय झाल्यानंतर महत्त्वाचा ठरला. इतर आविष्कार प्रकारांतून मुक्त झाल्यानंतरच संगीताला स्वतःचे जीवन प्राप्त होऊ लागले. त्याच्यापुढे शाब्दिक आणि इतर प्रकारांच्या सहवासातून निवृत्त झाल्यावर भावनात्मक संगीत अवतीर्ण होणार होते. त्यानंतर संगीताने आपल्या रचनेत मानवी भावनात्मकतेचा समावेश केला. तोपर्यंत ते शब्दांशीच निबद्ध झालेले होते. अभिजात संगीताला स्वतंत्र जीवन प्राप्त झाल्याने ते मानवी भावनांपासून दुरावले असे म्हणणे चुकीचे आहे. त्याच्या उलट घेतली जाणारी भूमिकाच समर्पक ठरते.

संगीत ही कालसापेक्ष कला आहे. तिच्यातील स्वरमालिका कालक्रमात वावरतात, आणि त्यांच्या विकसनाला आणि पूर्णतेला कालांतराची जरूरी असते. चित्र, वास्तू आणि शिल्प या कला आपला संबंध, स्थलांतर, वस्तुमात्र आणि रंग यांच्याशी जोडत असल्या तरी तो संबंध स्थिर असतो. माणसाच्या भावमयतेची प्रक्रिया संगीत अधिक समर्पक रीतीने प्रकट करते. कारण माणसाच्या जीवनासारखेच ते एकसारखे गतिमान असते. तथापि, संगीतातील

हालचाल वास्तव असण्याऐवजी, क्षणजीवी असते, हा विषय मागाहून विचारात घ्यायचा आहे.

तथापि, प्रोग्रॅम संगीत हे बाह्य जगाशी नाते सांगते, आणि म्हणून ते स्वयंपूर्ण, एकाकी आणि रचनात्मक नसते असे म्हणता येईलही. आकृतीवाद्याची तशी भूमिका आहे. पण बरेचसे प्रोग्रॅम संगीत हे एखादी घटना, कथा, सूर किंवा चित्र यांच्याशी बांधलेले असते, एवढेच नाही तर त्यांच्यामुळेच त्या संगीताला प्रेरणा मिळते. बीथोव्हेनची सिक्स्थ सिम्फनी हे त्याचे ठळक उदाहरण आहे. बीथोव्हेनने आपल्या गतिमान कृतींना नावे दिली नसती तर त्याच्या 'पॅस्टोरल सिम्फनीला' आपण अभिजात संगीत म्हटले असते आणि त्या वेळी तो 'बाय दि ब्रूकसाईड' किंवा 'मेरी गॅदरिंग ऑफ कंट्रीफोक' हे चित्रित करीत होता ही गोष्ट विचारात घेतली नसती. (ती नावे त्याने नेच्टच्या वेगळ्या सिम्फनीतून उचलली होती) हाच विचार मेन्डेलसॉनच्या 'दि ब्राईडस्' या प्रास्ताविकाला लागू पडतो. वास्तविक 'दि ब्राईडस्' मध्ये असतानाच त्या विषयाची त्याने टिपणे केली होती, हे लक्षात घेण्यासारखे आहे. (तो खरेतर फिंगल्स केव्ह मध्ये होता असे टोव्हेचे म्हणणे चुकीचे असावे) पण ही त्याची कृती म्हणजे वृंदवाद्यातील एक भव्य कार्यसिद्धी असून तिला एखादे अभिधान लावण्याची गरज नाही. 'जॅकेस् बार्झून' म्हणतो त्याप्रमाणे एखाद्या कृतीला नाव दिल्यामुळे तिच्या स्वरप्रवाहात व्यत्यय येतो असे म्हणता येणार नाही.

रिम्स्की कोर्साकोव्हचा 'शेहराझाडे' हा वृंदवाद्यातील गानप्रकार हा उघडच प्रोग्रमॅटिक पद्धतीचा आहे. त्यातली व्हायोलिनमधील गतिशील वळणे, म्हणजे शेहराझाडेचीच अरबी भाषेतील सुरस गोष्टींचेच निवेदन आहे आणि ते ती सुलतानाला करते आहे. हे कोणाही ऐकणाऱ्याच्या लक्षात येते. पण त्या गीतांची संगीतकारांनी दिलेली नावे कोणाच्या लक्षात राहतील? 'दि सी अॅन्ड सिंदबादस् शिप','दि स्टोरी ऑफ दि कॅलेन्डर प्रिन्स','दि यंग प्रिन्स अॅन्ड दि यंग प्रिन्सेस','दि फेस्टिवल ऑफ बगदाद','दि सी ब्राँझ सैनिकाने वेढलेल्या खडकावर जहाज आपटून फुटते', अशी ती नावे आहेत. रिम्स्की कोर्साकोव्हने पुढे स्वत:च ती काढून टाकली आणि डियाधिलेव्ह, बाक्स्ट, फोकीन, आणि निजिन्स्की यांनी त्यातून निर्माण केलेले, विख्यात समूहनृत्य हे वेगळ्याच कथेवर आधारलेले आहे. त्यातले संगीत स्वयंसिद्ध राहते आणि त्याला शब्दांची संगत नको असते.

लिस्टझ्ने बारा सिम्फनी काव्ये आणि दोन सिम्फनी रचल्या; त्यांना त्याने नावे दिली, आणि त्या सगळ्यांना त्याने प्रोग्रॅम संगीत म्हटले, पण त्याचा चरित्रकार अॅलन बॅस्कर म्हणतो :—

"मुख्य गोष्ट अशी की या संगीतकृती 'प्रातिनिधिक' नाहीत. म्हणजे त्या नेमक्या घटना अगर गोष्टीबद्दल काही सांगत नाहीत. याचे कारण लिस्टझ्ला संगीत हे त्यातल्या काव्य अगर चित्रमयतेपेक्षा, नेहमीच अधिक महत्त्वाचे वाटते; आणि ते स्वत:च्या नियमानुसारच

प्रकट होते. आपल्या कृतींना त्याने नावे दिली असली तरी त्यातला त्याचा उद्देश हा आपल्याला त्यामुळे स्फूर्ती कशी झाली हेच सांगण्याचा असतो.

आपल्या संगीतकृतींना नावे देण्यामागे लिस्टझ्चा काहीसा हेतू आपल्या स्तुतिपाठकांनी भलतीच नावे देऊ नये हा होता. तशी आपत्ती बाखपासूनच्या पुढील अनेक संगीतकारांवर आली होती. बीथोव्हेनच्या पिआनो सोनाटाला 'मूनलाईट' हे नाव तसेच चिकटून राहिले आहे. ल्युडविग रेलस्टॉन या कवीने लिहिलेल्या एका अभिप्रायांतून ते निघालेले आहे. शूबर्टच्या स्टॅण्डचेन या गीतचक्रांतून त्याने ते अभिधान घेतले होते. बीथोव्हेनच्या त्या कृतीतील पहिल्या गतीमुळे आपण एखाद्या सरोवरावरील चांदण्यात आहोत, असे त्याला वाटले होते. पण इतरांना मात्र तसे वाटले नाही आणि हे नाव पाहून आपण काहीतरी हरवून बसलो आहोत, असा त्यांचा निष्कारण ग्रह झाला.

**बार्झून म्हणतो :—**

"१) स्पष्ट अगर सूचक तसेच कोणत्याही रीतीचे असे सगळे संगीत हे प्रॉग्रॅमॅटिकच असते.

२) त्याची रचना करताना, ते ऐकताना, किंवा विश्लेषण करताना, इतर विषयांना बाजूला ठेवणे हे अशक्य आणि अनावश्यक आहे.

३) संगीतात काव्यमय अगर साहित्यिक विषय येऊ नयेत असे म्हणणाऱ्या संगीत रसिकांना साहित्य म्हणजे काय हे नीटसे कळत नाही."

बार्झून, हा लिस्टझ्च्या सिम्फनी काव्याबद्दल ॲलन वॉकर म्हणतो, त्यालाच पुष्टी देतो. अभिजात संगीतालासुद्धा सुरुवातीला बाह्य विषयांची प्रेरणा मिळालेली असते. पण ते संगीत ऐकण्यासारखे रंजक असेल तर ती प्रेरणा कोणती असावी,याची चिंता करण्याची गरज नाही.

बाह्य जगातले प्रत्यक्ष आवाज संगीतात आणले तर ते बहुधा विसंगत वाटतात. "ऑन हिअरिंग दि फर्स्ट कक्कू इन स्प्रिंग' हे डेलिअसचे गीत ऐकताना, कोकिळेचा तो आवाज आपण संगीतरचनेतून काढून टाकतो. त्यामुळे कदाचित ती एकूण संगीतकृती बिघडूनही जाते. प्रोग्रॅम संगीत हे त्याच्या नावानुसार प्रोग्रॅमॅटिक नसेलही, आणि आपल्याला नाव हवेच असेल, तर ते संगीत तितकेसे स्वयंपूर्ण नाही असे म्हणावे लागेल.

चार्लस रोझेन याने असे सुचविले आहे की, सोनाटा या गानप्रकारामुळेच वाद्यसंगीताचा विकास झाला, आणि त्यात संगीताचा शब्दाशी संबंध राहिला नाही याचे कारण सोनाटा हा प्रकार नाट्यातील अभिनयाशी सदृश असतो. म्हणजे त्यात एखादी स्वरमय कथा असून तिला एखादी कादंबरी वा लघुकथा यांच्यासारखी सुरुवात, विस्तार आणि समाप्ती असते. सोनाटाच्या अगोदर आलेला नृत्याचा प्रकार हा मुख्यत: प्रमाणबद्धतेवर अवलंबून होता. त्यातून पुनरावृत्ती होत असल्याचे समाधान मिळत असे, तसे ते अभिजात वास्तुकला किंवा काव्य यातून लाभत होते. अर्थात नाट्यविकसनाला त्यात स्थान नव्हते. संगीत हे कालसापेक्ष



अनुक्रमणिका

असल्याने ते आपण एखाद्या चित्र किंवा वास्तू यांसारख्या स्थिर कलाकृतीप्रमाणे पुन:पुन्हा पाहू शकत नाही. म्हणूनच तिच्यातील आशयाची आणि लयबद्धतेची पुनरावृत्ती, तिची रचना समजून घेण्यासाठी आवश्यक असते. मात्र विसाव्या शतकातील काही संगीतकारांनी ती गोष्ट त्याज्य मानली आहे. तथापि, नृत्यावर आधारलेल्या संगीताचे वैशिष्ट्य हे सोनाटातील प्रमाणबद्धतेपेक्षा अधिक महत्त्वाचे ठरते. अठराव्या शतकातील सिम्फनी आणि क्वार्टेट यातील मिनुए आणि ट्रायो हे त्याचे उदाहरण आहे. पहिल्या मिनुएनंतर दुसरी आणि पुढे तीन वायुवाद्यांची संगत असा तो प्रकार असल्याने त्याला ट्रायो असे म्हटले जाते. सुरुवातीची मिनुए पुन्हा प्रदर्शित केल्यामुळे या प्रकाराला गती प्राप्त होते.

बाखचा थर्ड ब्रॅन्डेनबर्ग कॉन्सर्टो हा प्रत्येक रसिकाला माहीत आहे. तो एक लयकारीतील स्वरमालिकेचा उल्हसित करणारा प्रकार आहे. त्यात दर वेळी बदललेल्या तीन वादकांसमोर नऊ तंतुवादकांचा दाखवलेला विरोधाभास आहे. पण त्यात नवीन विषय सामविले जात नाहीत किंवा सबंध कृती अपेक्षित वा अनेपक्षित उद्दिष्टांपर्यंत पोहोचत नाही. पहिली गत एका कल्पनेवर आणि तिसरी निराळ्याच विषयावर आधारलेली असते. बाखचे कौशल्य आपल्याला आकर्षित करते, पण ते आकर्षण विकसनाऐवजी विस्तार, प्रमाणबद्धता आणि लयींचे स्पंदन यांचे असते.

सोनाटा गानप्रकारावरील क्रमिक पुस्तकातील वर्णनांना अनुसरून फारच थोड्या रचना केल्या जातात. पण त्यांची मांडणी वेधक असते. तिच्यात पहिला विषय एकदा अगर दोनदा सुरुवातीच्या सुरात मांडला जातो. नंतर तो दुसऱ्या प्रधान सुरांत जोडला जाऊन दुसरा विषय प्रकट केला जातो. दुसरा विषय अधिक गीतमय असतो. पुढील भागात दोन्ही विषय एकत्र होतात किंवा निरनिराळ्या सुरांत मांडले जातात. एवढे झाल्यावर पहिल्या विषयाची पुनरावृत्ती होते, आणि शेवटी जोडकाम विविध तऱ्हेने झाल्यानंतर सगळ्यांचा आढावा घेतला जाऊन, या गानप्रकाराची समाधानकारक समाप्ती होते.

सोनाटामधील या प्रकारची योजकता, एखाद्या लघुकथेच्या रूपरेषेसारखी दिसते. हेडनची अशी रचना एखाद्या अचाट कामगिरीवर निघाल्यासारखी वाटते असे टोव्हे म्हणतो. एखाद्या दंतकथेतील वीरपुरुष तिच्यातील नायक म्हणून घर सोडतो, बऱ्याच उलाढालीत गुंतून राहतो, क्रूर प्राण्यांची हत्या करतो, आणि बायको मिळवून विजिगीषु वृत्तीने घरी परततो. सोनाटा या गानप्रकाराचा प्रवास याच रीतीचा असून, त्यात सुरुवातीच्या परस्परविरोधी घटनांच्या एकीकरणाकडे त्याची धाव असते आणि त्याचा शेवट 'घरी परतण्याकडे' म्हणजे मूळच्या स्वरालापाकडे झुकतो.

वीरपुरुषांची अशी कथा हा एक अगदी जुना संभाषण प्रकार आहे; आणि तो आपल्या मनात रूतलेला असल्याचे कारण तसा अनुभव जवळजवळ आपणा सगळ्यांना आलेला असतो. निकटचे नातेसंबंध तोडून आपण बाहेर पडतो, आणि आपला स्वत:चा वेगळा मार्ग





अनुक्रमणिका

शोधून आपले म्हणून घर हुडकून काढतो. त्याला काही वीरश्री म्हणता येणार नसली तरी स्वतंत्र जीवन जगण्याची ईर्षा आणि ती पुरी करणे, हे एक जोखमीचे काम आपल्याकडून घडत असते. याचे कारण माणसाची बाल्यावस्थेपासून जाणतेपणापर्यंतची वाढ ही अतिशय संथ आणि म्हणून इतरांवर अवलंबून असते आणि त्या अवस्थेतून निसटणे अवघड होऊन जाते. पण त्यातूनच बाहेर पडून स्वतंत्र झालो की आपण तेवढ्यापुरते वीरपुरुष ठरतो.

वरील रूपरेषा इतकी एकसाची झाली आहे की पाश्चात्य संगीतातील उत्कृष्ट कृतीमध्ये ती न्याहाळणे धोक्याचे ठरेल. पण असाच प्रकार अनेक कादंबऱ्यांतही आढळतो. परस्पर विरोध, संघर्ष आणि अखेरचे निरसन, ही सोनाटाची वैशिष्ट्ये स्त्रीपुरुषांमधीलच नव्हे तर जीवनातील इतर अनेक द्वंद्वांना लागू पडतात. ॲलेक्स ॲरॉनसन याने अनेक समीक्षकांची उदाहरणे नमूद केली असून, त्याने अशा कादंबऱ्यांची शब्दांतील सोनाटा म्हणून तारीफ केली आहे. त्यात व्हर्जिनिया वुल्फची 'मिसेस डॅलोव्हे', ई एम फॉर्स्टरची 'ए पॅसेज टू इंडिया', जेम्स जॉईसची 'युलिसिस' थॉमस मॅनची 'टोनिओ क्रोगर' आणि हर्मान हेसची 'स्टेपन वुल्फ', या कादंबऱ्यांचा त्याने उल्लेख केला आहे.

ॲरॉनसन लिहितो :—

"यातले प्रत्येक पुस्तक मानवसमूहामधील परस्पर विरोधाचे आकर्षण गृहित धरते. त्यासाठी परंपरागत संगीतप्रकाराचा वापर करते आणि त्यातून माणसाच्या जाणत्या मनातील वेगवेगळे स्तर चित्रित करते, ते त्याच्या लेखकाला अगोदर जाणवलेले नसतात. कादंबरीकाराची माणसामधील अशी परस्पर विरोधाची जाणीव, सोनाटा या गानप्रकारात उठून दिसते. कारण त्यात माणसाच्या मनातील भावना, त्यांचा असह्य उद्रेक आणि त्याचे निरसन, तसेच त्या सगळ्याचे निरीक्षण या गोष्टी आढळून येतात".

साहित्य आणि संगीत या दोन्ही कलांच्या आविष्काराची मांडणी ही पूर्वीपासूनच्या रीतीवर आधारलेली असते; असे म्हणताना त्यांच्यातला कमीपणा लेखण्याचा इथे इरादा नाही; प्रमाणबद्धता हा त्यातला एक उपप्रकार आहे. कादंबरीतील गोष्ट त्याच्याच अनुसार करते. रोवेल्स या संबंधात तिसरा प्रकार सुचवितो.

एका स्वराच्या गुंजनातून आणि आघातातून, आणि त्याचा मूळ अर्थवाहीपणा कायम राखून दुसऱ्या स्वराकडे इशारा करणे. ही संगीतातील एकरूपतेकडे निघण्याची प्राथमिक आणि सार्वत्रिक अवस्था असते, असे म्हणताना जीवनाच्या ओघात स्वत्वाची जाणीव टिकविणे, ती विकसित करणे आणि परत एकरूपतेकडे वळणे, ही सूचकता या गानप्रकारातून मांडली जाते, असे सांगण्याचा उद्देश आहे.

आपल्या सोनाटा रोन्डो वगैरेसारख्या गानकल्पनांना आकार देण्यासाठी संगीतकार उपयोगात आणीत असलेले प्रकार वास्तविक संगीताबाहेरच्या क्षेत्रात उद्भवलेले असतात आणि म्हणून ते माणसाच्या इतर विचार संचारातही तितकेच लागू पडतात. परिणामकारक

असे वक्तृत्व करताना अशीच योजना आखली जाते. म्हणजे सुरुवातीला एकूण विषयांची रूपरेषा, नंतरचा विस्तार, आणि अखेरचा समारोप, अशीच मांडणी केली जाते. "तुम्हाला काय म्हणायचे ते अगोदर सांगा मग त्याचा सविस्तर खुलासा करा, आणि मग काय बोललात त्याचा आढावा घ्या" त्यामुळे शब्दांशी शेवटी फारकत घेतल्यानंतर संगीताने असाच क्रम अंगिकारला असल्यास तो काही केवळ योगायोग नाही. त्यानुसार संगीतकार हे कादंबरीत शोभतील असे प्रकार अंमलात आणून पुनरावृत्ती, विस्तार, स्वरांची जुळवाजुळव आणि एकूण प्रमाणबद्धता यांचा अनुसार करू लागले.

माणसाच्या भावनांची उपज आणि त्यांचा उद्रेक यांच्याशी निकटचे नाते, संगीत हे कसे प्रस्थापित करते याबद्दलचा विचार लिओनार्ड मेगर याने मांडला आहे. त्याचे म्हणणे असे :–

"संगीत भाववृत्तीला प्रेरणा देते, मध्येच तिला प्रतिबंध करते, आणि नंतर तिचे समर्पक आणि अर्थपूर्ण निरसन करते."

मागे सांगितल्याप्रमाणे एखाद्या कथेच्या अंतर्गत रूपरेषेशी या पद्धतीची तुलना करता येते. अर्थात अशी योजना नृत्यापेक्षा सोनाटामधील संगीताला अधिक उपयुक्त ठरते, हे उघड आहे. पण ती आपल्या सवयीची झाली असल्याने दोन्ही ठिकाणी तिचा वापर होऊ शकतो.

जॉन ड्युई आणि इतर यांच्या भावनात्मकतेच्या उपपत्तीचा मेयर आधार घेतो, आणि असे म्हणतो की संगीताला प्रतिसाद देण्याच्या भावप्रवृत्तीला आळा घालण्याच्या प्रयत्नातच भावना उद्दीपित होतात. विशिष्ट सांस्कृतिक परंपरेत संगीताकडून आपण काही अपेक्षा करू लागतो. उदाहरणार्थ, सातव्या प्रधान स्वराबरोबरच्या कॉर्डनंतर आपल्याला मुख्य स्वराची निरसन म्हणून अपेक्षा असते. संगीतकार आपल्या रसिकांच्या भावना उत्तेजित करतात याचे कारण ते प्रथम आपली उत्कंठा वाढवून नंतर तिचे निरसन करण्याला वेळ लावतात हे आहे असे मेयर म्हणतो.

याबद्दलचे उदाहरण बीथोव्हेनच्या एका स्ट्रिंगक्वार्टेट मध्ये मिळते. त्याच्या मताने आपल्या सोळा क्वॉर्ट्रेटसमधील ते सगळ्यात उत्कृष्ट आहे. त्याच्या पाचव्या गतीचे समीक्षण करून मेयर बीथोव्हेनच्या भावना उद्दीपित करून आणि अपेक्षा वाढवून त्या पूर्ण न करण्याच्या रीतीकडे आपले लक्ष वेधतो. त्याकरिता बीथोव्हेन लय, स्वरमीलन आणि आलापचारी यांचा काही वेळा भंग करतो. शेवटी, "ज्या स्वराकृतीने गत सुरू होते, तिची पहिली सुरावटच आपल्या अपेक्षा उंचावते आणि त्या तृप्त होतील अशी वाट पाहत असतानाच, पुढे काय होईल, याची आपल्याला सहजच खात्री वाटते."

मेयर आपली स्वत:ची 'वृत्तांत' उपपत्ती संगीताला लावतो. तीनुसार श्रोत्याने ऐकून झालेल्या संगीतानंतर पुढे येणाऱ्या संगीतानुभवाबद्दलची त्याची अपेक्षा भंग पावली म्हणजे संगीताला अर्थ प्राप्त होतो. हा वृत्तांतसंभार आणि ऐकत असलेल्या संगीताचा अर्थ या दोन्ही प्रक्रिया श्रोत्याच्या मनात सारख्या चालू राहतात. आपल्या एरवीच्या आयुष्यात आपली

वर्तणूक सवयीनुसार चालते. जिन्यावरून चढत असताना, पुढची पायरी मागच्या इतकीच उंचीची असणार अशी आपली समजूत असते. पण ती मागच्यापेक्षा दुप्पट उंचीची असेल तर आपण एकदम बिचकतो आणि सावध होतो. या वेळी आपल्याला एक नवीन अनपेक्षित आणि अर्थपूर्ण अनुभव मिळतो. तो कदाचित वेदनाकारकही असेल आणि ती पायरी नेमकी कोणती आहे, हे माहीत झाले तरी त्या जिन्यातल्या पायऱ्यांचा विसंगतपणा मात्र आपण विसरत नाही.

मेयरचे हे वर्णन हॅम्स केलरच्या उपपत्तीशी काही प्रमाणात जुळते. ते असे की दोघेही संगीतातील रचनाकौशल्य श्रोत्यांच्या अपेक्षांशी जोडतात आणि म्हणून स्वत:चे मत आणि तुलनात्मक दृष्टी असलेला श्रोतृगण गृहित धरतात.

केलरच्या मताप्रमाणे संगीताचे तर्कशास्त्र हे अनपेक्षिततेवर आधारलेले असते. संगीतकृतीच्या आविष्कारातील पार्श्वभूमी आणि पुरोभूमी यांमधील तफावत तो मांडतो. (हे दोन्ही शब्द शेंकरनेही वापरले आहेत. पण केलरने त्यांचा निराळा उपयोग केलेला आहे)

"संगीतरचनेच्या पार्श्वभूमीत एखाद्या कृतीतून प्रेरित केलेल्या पण अपूर्ण अशा श्रोत्यांच्या अपेक्षा आणि त्यातल्या अपूर्णतांच्या एकत्रीकरणाचा समावेश असतो. संगीतकार पुढे प्रत्यक्ष काय करतो, याचा आशय पुरोभूमीत आढळून येतो. पार्श्वभूमी ही त्या कृतीचा आलेख मांडते आणि तो प्रकार अगदीच सामान्य किंबहुना तो संगीतावरील ग्रंथातही सापडतो. पुरोभूमी मात्र संगीतकारांची स्वतंत्र आणि स्वकल्पित मांडणी असते आणि ती अगोदरच्या आलेखाशी जुळत नसेलही आणि उलट तसे झालेच तर ते संगीत नीरस होईल आणि तुम्ही स्वत:ही ते काम उरकू शकाल. त्यासाठी तुम्ही रचनाकार असण्याची जरूरी नाही.

यावरून असे दिसते की पुष्कळशा आंतररचना या अशा आलेखावर आधारलेल्या असतात; मग ते आलेख कितीही सामान्य आणि पार्श्वभूमी म्हणून असोत. त्याची पुरोभूमी हीच त्या कृतीला स्वतंत्र व्यक्तिमत्त्व देते. पार्श्वभूमी ही केवळ परंपरेला अनुसरून असते. संगीतकार तिचे काय करतो, याच गोष्टीला महत्त्व असते. कादंबरीकाराबद्दलही असेच म्हणता येते.

संगीतरचनाकृतीतील पार्श्वभूमी आणि पुरोभूमी यांमधील संघर्षानंतर, म्हणजेच पार्श्वभूमीतून उद्भवलेल्या अपेक्षा आणि त्यांच्या पूर्ततेमधील पुरोभूमीतील अनपेक्षितता या द्वंद्वावर संगीताचा अर्थ अवलंबून असतो असे केलरचे म्हणणे आहे.

यामुळे श्रोत्यांच्या मनोभूमीतील ताण आणि तोही कमी अधिक होत असताना, संगीतकार करीत असलेला आविष्कार आणि तो कशा पद्धतीने करतो याबद्दलच्या त्यांच्या अपेक्षा यातच संगीताचे तर्कशास्त्र सामावलेले असते. असा ताण जितका स्पष्ट, तितके एकूण संगीत तर्कशुद्ध होते. म्हणजे रचनेतील परस्परविरोधी घटकांच्या करवी होणारा अपेक्षाभंग तसाच. त्यातील एकरूपतेकडे जाण्याचा रोख अशी हालचाल या तर्कशुद्धतेच्या उपयोगी ठरते.



अनुक्रमणिका

केलर आणि मेयर या दोघांची ही उपपत्ती संगीतकारांच्या, अपेक्षाभंग करण्याच्या कुवतीवर अवलंबून आहे. अर्थात दोघांच्या उपपत्तीत संगीतरचनेचे विश्लेषण तसेच श्रोत्यांवरील भावनिक परिणाम यांची दखल घेतलेली आहे.

'लिसनर' या नियतकालिकात केलरने आपली उपपत्ती मांडली, त्या वेळी मी तिचा प्रतिवाद केला. तो असा की, संगीतकृती बऱ्याच वेळा ऐकून ती परिचयाची झाली की अपेक्षाभंग होण्याचा संभव नसतो. कारण पुढे काय होणार हे श्रोत्याला अगोदर माहीत झालेले असते. केलरचे यावर उत्तर असे की अशी त्याची माहिती बौद्धिक स्वरूपाची असते. मात्र त्याच्या भावनिक अपेक्षा तशाच राहतात.

"सातव्या प्रधान सुराच्या आलापीने त्या कृतीतील प्राणभूत अशा प्रमुख स्वराची अपेक्षा सहजच निर्माण होते. मग ती तुमच्या लक्षात बौद्धिक रीतीने आलेली असो अगर नसो. म्हणजे मध्येच थांबलेला सुरांचा चढउतार घडून येतो की नाही याकडे आपले लक्ष राहत नाही आणि उलट त्यातून चकित होण्याचा प्रसंग आला की अपेक्षाभंग अधिक तीव्र बनतो.

जिन्यामधील पायऱ्यांच्या विसंगतीबद्दल असेच म्हणता येते. याचा अर्थ असा की अनपेक्षित वा विपरीत असलेल्या गोष्टीची, अनेक वेळा अनुभव घेऊन सवय झाली तरी ती विपरीत म्हणूनच लक्षात राहते."

आलापीच्या विस्तारात तिच्या समाप्तीला वेळ लावणे हा संगीतकाराच्या दृष्टीने अपेक्षाभंग करण्याचा आणि श्रोत्याच्या भावना हेलावण्याचा, केलरच्या मताप्रमाणे, एक मार्ग आहे आणि मग त्या अपेक्षांचे निरसन करण्याची कुवत ज्यांच्यात असते, असाच संगीतकार श्रेष्ठ ठरत असेल तर त्याकरिता वॅग्नेरखेरीज दुसऱ्या कुणाचेही नाव घेता येणार नाही. त्याच्या अनुयायांचेही तसेच मत आहे. 'ट्रिस्टॉन अॅन्ड इसोल्डचे' त्याचे प्रास्ताविक हे त्याचे प्रख्यात उदाहरण आहे. त्यात सूक्ष्म स्वरांतरातून रसिकांची उत्कंठा वाढवून, सातवा प्रधान स्वर हा आपल्या उद्दिष्टांची केवळ दिशा न दाखविता, त्याच्याकडेच जाऊन पोहोचतो. तसे पाहिले तर हे सगळे संगीतनाट्य याच स्वरूपाचे असून त्यातील निरसनाचे कार्य पूर्ण होण्याला जवळजवळ चार तास घेतले जातात. त्याच्या इतर संगीतकृती ट्रिस्टानपेक्षा बऱ्याच लहान असल्याकारणाने श्रोत्यांच्या अपेक्षा उंचावण्यात आणि लांबवण्यातच संगीतकाराचे कौशल्य असते असे म्हणण्याला फारसे महत्त्व उरत नाही.

मेयरने संगीताच्या कार्यविस्तारात एक महत्त्वाचे विचारसूत्र मांडले असले तरी त्याच्या उपपत्तीमधील त्या भागामुळे संगीत आणि हिचकॉक फिल्म या दोन्हीमध्ये फारसा फरक राहत नाही. कारण त्या फिल्ममधील चित्रीकरणानेही अपेक्षा जागृत होतात. उत्कंठा निर्माण होते. समाप्तीला उशीर लावला जातो आणि शेवटी सुखानुभावाचा लाभ मिळतो. पण मेयरने असा फरक मानण्याची जरूरी नाही. जुनी स्वरसूत्रे सुद्धा, क्षुल्लक आणि गंभीर अशा दोन्ही परिणामांना आधार देतात.

मेयरच्या उपपत्तीला अधिक महत्त्वाचा प्रतिवाद पीटर किव्हीने केला आहे. तो असा की अपेक्षाभंग करून योग्य परिणाम साधला जात असला तरी, काही प्रसंगी संगीताला दिलेला प्रतिसाद हा त्याच वेळी आनंदानुकूलही होऊन राहतो.

संगीतातून होणारी भावनिर्मिती ही अपेक्षा वैफल्यातूनच होते असे नाही. (ते एक कारण असले तरी) तर ती एरवीच्या सामान्य जीवनातही अनुभवाला येते.

संगीतासारख्या विषयात रचनावाद आणि आविष्कारवाद यात एकसारखा मतभेद होत राहणे, ही विचित्र गोष्ट आहे. संगीताचा आलेख आणि त्याचा भावार्थ यांचा आस्वाद घेणे, ही प्रत्येक रसिकाची अनुभवाची बाब असते, आणि त्यात त्याच्या दृष्टीने फरक पडत नाही. संगीताच्या रचनेचे बौद्धिक रसग्रहण करणे आणि त्याच्या आविष्कारात तन्मय होणे, या दोन्ही गोष्टी एकत्र होणे अवघड आहे, असे मी मागे सुचविले होते. तथापि हे मत जुन्या संगीतापेक्षा ऐकून झालेल्या पेक्षा नवीन संगीताला लागू पडेल. एखादे संगीत ऐकणाऱ्याच्या मनात टिकून राहिले आणि त्याच्यापुढे त्याचा विस्तार कशा प्रकारे होईल हे त्याला माहीत असले तर त्याचा एकूण आलेख त्याला समजला असे म्हणायला हरकत नाही.

प्राऊस्टच्या लेखनातील एका परिच्छेदाकडे जीन जॅक्स नाटीएझ आपले मुद्दाम लक्ष वेधतो. त्यात एखादा श्रोता त्याला नवीन वाटणारे संगीत परत ऐकताना त्याच्या आस्वादात कशी भर पडते, याचे वर्णन पुढीलप्रमाणे त्याने केले आहे.

"नंतर डोक्यात वेगळे काही विचार यावेत म्हणून आल्बर्टाईन बरोबर पत्ते खेळण्याऐवजी तिला मी थोडेसे संगीत ऐकीन म्हणून सांगितले. बिछान्यावर मी पडूनच राहिलो. ती मग एका कोपऱ्यात पिआनो घेऊन बसली. तिच्या दोन्ही बाजूंना बरीच पुस्तके होती. मला माहीत नसलेल्या किंवा एकदा केव्हातरी ऐकलेल्या कृती तिने निवडल्या, तसे करतानाही मला कळतच नसतील अशाच कृती वाजविण्याची ती काळजी घेत होती. माझे मन कथा प्रकारात अधिक गुंतून राहते आहे, हे पाहून त्या कृतीतील मला अनोखे आणि विजोड असे भाग जुळवून त्याचे आविष्करण ती करीत होती आणि हे सर्व करताना असे संगीत प्रथमच ऐकून मी किती संतुष्ट होत आहे हेही ती निरखून पाहत होती."

संगीताचा आलेख वा रचना ऐकून प्राऊस्टला मिळालेला आनंदानुभव वाचला म्हणजे आपणही उत्साहित होतो. मात्र केवळ आलेख समजून घेणे ही बौद्धिक करामत आहे असे रचनावादी म्हणतात. एखाद्या वास्तूच्या समतोलपणाबरोबर अनपेक्षित अशी विकृती तिच्यात आढळून आली तर आपला कंटाळा नाहीसा होतो आणि तिच्या कलाकाराची स्वतंत्र प्रतिमा उमटून दिसते. संगीतरचनेतून असाच आनंददायी विस्मय वाटतो. श्रोत्याला संगीत नीट उमजत असेल तर तो एकूण संगीतालाच दाद देतो. संगीतातील आशय आणि अभिव्यक्ती त्याचप्रमाणे माणसामधील शरीर आणि त्याचा आत्मा, यांच्यात विभाजन होऊ शकत नाही असा याचा अर्थ आहे.

---



अनुक्रमणिका

# प्रासंगिक टिपणे

## [ ऑलिव्हर सॅक्स आणि त्याचे (आवर्तसारणीशी असलेले) प्रेमप्रकरण.]

**– सुमती जोशी**

ऑलिव्हर सॅक्स हे मूळचे लंडनचे. लंडन, ऑक्सफर्ड आणि त्यानंतर कॅलिफोर्निया, न्यूयॉर्क येथे त्यांनी वैद्यकीय शिक्षण घेतले. सध्या त्यांचे वास्तव्य न्यूयॉर्क येथे असून 'अल्बर्ट आइन्स्टाइन कॉलेज ऑफ मेडिसिन' येथे ते चेताविज्ञानाचे प्राध्यापक आहेत. आपल्या विषयाशी निगडित मायग्रेन, अवेकनिंग, दि मॅन हू मिस्टुक हिज वाइफ फॉर अ हॅट,' 'अ जर्नी इन दि वर्ल्ड ऑफ दि डेफ' यासारख्या उत्कृष्ट पुस्तकांची निर्मिती त्यानी केली आहे. बाराव्या वर्षी लंडनमधील विज्ञान वस्तुसंग्रहांलयात पाहिलेल्या मेंडेलिफच्या आवर्तसारणीचा (पिरिऑडिक टेबल) त्यांच्या मनावर किती खोलवर परिणाम झाला हे सांगत असताना विज्ञानातील नवनवीन शोधांमुळे आवर्तसारणीत कसकसे बदल होत गेले व तिला आजचे स्वरूप कसे प्राप्त झाले याचा सविस्तर वृत्तांत दिला आहे. तोच येथे शब्दबद्ध केला आहे.

जगात एकूण ९२ मूलद्रव्ये असून प्रत्येक मूलद्रव्याला स्वतःचे असाधारण गुणधर्म असतात असे मी कुमारवयीन असताना म्हटले जात होते. जी मूलद्रव्ये एकमेकांशी मिसळून लक्षावधी संयुगे तयार होतात, ती मूलद्रव्ये म्हणजे विश्वाच्या संरचनेचे घटक होत. यापैकी काही मूलद्रव्ये एकमेकांशी संबंधित असावीत असे लोकांना वाटत होते किंवा तसा संशय लोकांच्या मनात होता. उदा. कथिल आणि शिसे हे दोन्ही नरम धातू सहजी वितळतात. तांबं, चांदी आणि सोनं या 'नाणी तयार करण्याकरता' वापरावयाच्या धातूंवर आघात करून, ज्यातून हिरवा किंवा नीळा प्रकाश पारेषित होईल इतका पातळ पत्रा तयार करता येतो.

दुसरे महायुद्ध संपल्यानंतर लंडनमधल्या नवीन स्वरूपात पुन्हा उघडलेल्या विज्ञान वस्तुसंग्रहालयात वयाच्या बाराव्या वर्षी मी गेलो होतो. तेथे जिन्याजवळ 'दि पिरिऑडीक टेबल' 'अवर्तसारणी' अशी खूणचिठ्ठी लावलेले एक अवाढव्य कपाट मी पाहिजे. तेथे गेलो नसतो तर 'सर्व मूलद्रव्ये एकमेकांशी संबंधित असावीत' असा विचार माझ्या मनात आला असता की नाही याबद्दल माझी खात्री नाही. मूलद्रव्यांचे प्रत्यक्ष नमुने असलेल्या त्या आवर्तसारणीचे निरीक्षण करणे हा माझ्या बालपणातील जडणघडण करणाऱ्या अनुभवांपैकी एक होता. त्यातील प्रकटनाच्या प्रभावाने विज्ञानातील सौंदर्य मला दाखवून दिले. कमीत कमी जागा व्यापणारी, गुंतागुंत नसलेली, सुलभ, सर्वच्या सर्व ९२ मूलद्रव्ये दोन अक्षांमध्ये

सामावलेली आणि तरीही प्रत्येक अक्षामध्ये विविध गुणधर्मांची क्रमवार मालिका असलेली अशी ती आवर्तसारणी होती.

काही धातूंचे रूपांतर सोने अथवा चांदी यासारख्या मौल्यवान धातूंमध्ये करण्याची किमया साध्य करण्याच्या मानवाच्या प्रयत्नात रसायनशास्त्राची पाळेमुळे दडली आहेत. तांबं, चांदी, सोनं, लोखंड, पारा, शिसं, कथील, सल्फर आणि कार्बन ही प्राचीन काळातील लोकांना आधीच माहित असलेली नऊ मूलद्रव्ये आणि मध्ययुगीन कालखंडात शोधलेली काही मूलद्रव्ये (आर्सेनिक, अँटिमनी व बिस्मथ) यामध्ये इ. स. १७३५ ते १८२६ या कालखंडात चाळीस किंवा त्याहीपेक्षा अधिक नवीन मूलद्रव्यांची भर पडली आणि तेव्हापासून म्हणजे अठराव्या शतकापासून खऱ्या अर्थाने रसायनशास्त्राच्या उदयाचा प्रारंभ झाला. एकूण किती मूलद्रव्ये आहेत? त्यांच्या संख्येवर काही मर्यादा आहे का? कोणत्यातरी बाबतीत ती मूलद्रव्ये एकमेकांशी संबंधित आहेत का? आणि जर संबंधित असतील तर त्यांचे वर्गीकरण कसे करता येईल? अशा तऱ्हेचे प्रश्न या नवीन मूलद्रव्यांच्या शोधामुळे प्रत्येक रसायनशास्त्रज्ञांपुढे उभे राहिले. त्यापैकी काही मूलद्रव्यांमधील परस्पर नातेसंबंध ओळखले गेले होते. रंगीत, बाष्पनशील आणि अतिशय क्रियाशील असणारे आणि 'हॅलोजेन' या नावाने संबोधले गेलेले क्लोरीन, ब्रोमिन आणि आयोडीन या मूलद्रव्यांचे एक नैसर्गिक कुटुंबच वाटत असे. वजनाने हलक्या, मऊ आणि पाण्याबरोबर तीव्रतेने क्रियाशील असणाऱ्या कॅल्शियम, स्ट्राँशियम आणि बेरियम या अल्क मृदा धातूंचे (अल्कलाइन अर्थ मेटल्स) एक दुसरे कुटुंब होते. स्ट्रोंशियमचा अणुभारांक कॅल्शियम आणि बेरियम यांच्या अणुभारांकांच्या दरम्यान असतो. म्हणजेच अल्क मृदा धातूंच्या अणुभारांकांची एक मालिका तयार होते. हे इ. स. १८१७ साली जर्मन रसायनशास्त्रज्ञ जोहान डॉयबरीनर याच्या लक्षात आले. अशा प्रकारच्या इतर त्रयी आणि ज्या मूलद्रव्यांच्या गुणधर्मात सारखेपणा परंतु अणुभारांक मात्र जवळजवळ सरूप असतील अशीही त्रयी डॉयबरीनरने कालांतराने शोधल्या.

डॉयबरीनरने शोधलेल्या मूलद्रव्यांच्या त्रयीमुळे 'अणुभारांक हा मूलद्रव्याच्या मुलभूत गुणधर्मांचा निदर्शक असला पाहिजे' याबाबत सर्व रसायनशास्त्रज्ञांची खात्री पटली, परंतु अणु आणि रेणु यामधील फरक, अणुंची एकमेकांशी संयोग पावण्याची क्षमता, त्यांची संयुजा (व्हॅलन्सी) या मूलभूत गुणधर्मांबद्दलची संदिग्धता तशीच राहिली. परिणामत : पूर्वी मान्य केलेले अनेक अणुभारांक चुकीचे ठरविले गेले. आण्विक गृहितकाचा प्रत्यक्ष निर्माता डाल्टन याने स्वत:च काही गोष्टी गृहित धरल्या. उदा. पाण्याचे रासायनिक सूत्र $H_2O$ असे नसून HO आहे, असे मानल्यामुळे ऑक्सिजन या मूलद्रव्याचा अणुभारांक त्याच्या खऱ्या अणुभारांकाच्या निम्माच असलेला डाल्टनला आढळला. हा गोंधळ लवकरात लवकर दूर करण्याच्या हेतूने जर्मनीमधील कार्लस्रुहे (KARLSRUHE) येथे रसायनशास्त्रज्ञांची पहिली आंतरराष्ट्रीय परिषद भरवली गेली. या परिषदेत स्टॅनिस्लो कॅनिझारो यांनी बाष्पघनतेवरून अणुभार मोजण्याची विश्वसनीय पद्धत सुचवली. उत्तम प्रकारे युक्तिवाद करून केलेल्या सादरीकरणामुळे त्याची पद्धत सर्व उपस्थिताना पटली. आता सरतेशेवटी दुरुस्त केलेला

अणुभार आणि संयुजांची सुस्पष्ट कल्पना यामुळे मुलद्रव्यांचे व्यापक वर्गीकरण करण्याची पद्धत शोधण्याचा मार्ग खुला झाला असे सर्वसामान्य मत तयार झाले.

आवर्ती पद्धतीच्या संशोधनाकडे निर्देश करणारी थोडाथोडकी नव्हे तर एकूण सहा वर्गीकरणे पुढील दशकात स्वतंत्रपणे शोधली गेली हे समकालिकतेचे उल्लेखनीय उदाहरण आहे. या सर्वांपैकी दिमित्रि इव्हानोविच मेंडेलीफची पद्धत सर्वात जास्त व्यापक आणि धाडशीसुद्धा होती कारण अजूनपर्यंत माहित नसलेल्या मूलद्रव्यांची तपशीलवार संभाव्यता व्यक्त करण्याची जोखीम त्यात होती. मेंडेलीफ (ज्याचे नाव आणि वेडीवाकडी मोठी दाढी असलेला चेहरा माझ्या काळातील प्रत्येक शाळकरी मुलाला परिचित होता) हा एखाद्या हिरोसारखी प्रसिद्धी लाभलेला माणूस होता. तो रशियाचा प्रमुख शास्त्रीय सल्लागार होता. कोळसा आणि इंधनापासून चीज आणि बिअरपर्यंतचे सर्व उद्योगधंदे आणि शेती यात त्याचा निकटचा सहभाग होता. इ. स. १८५४ सालापासून रासायनिक मूलद्रव्यांचे वर्गीकरण कसे करावे यावर त्याने चिंतन केले होते. अत्यंत आनंददायी आणि आजपर्यंत प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांमध्ये सर्वात सुस्पष्ट आणि प्रतिभेची प्रचीती देणाऱ्या 'दि प्रिन्सिपल्स ऑफ केमिस्ट्री' 'रसायनशास्त्राची मूलद्रव्ये' या रसायनशास्त्रावरील पुस्तकाचा तो लेखक होता.

कार्लस्‌हे येथील परिषदेपूर्वीच्या जुन्या अणुभारांकांच्या आधारे डॉयबरीनरला ज्याप्रमाणे मूलद्रव्यांच्या त्रयींची जाणीव झाली त्याप्रमाणे स्थानीय त्रयींची अथवा समूहांची जाणीव होत असे. परंतु या समूहांमध्ये संख्याशास्त्रीय नातेसंबंध आहेत हे सहज कोणाच्या लक्षात आले नाही. कॅल्शियम, स्ट्रोंशियम, बेरियम या अल्क मृदा धातूंचे योग्य अणुभारांक अनुक्रमे ४०, ८८ आणि १३७ आहेत हे जेव्हा कॅन्निझारोने दाखवून दिले तेव्हाच पोटॅशियम (३९), रुबिडियम (८५) आणि सेसियम (१३३) हे अल्क धातू आणि कॅल्शियम, स्ट्रॉंशियम, बेरियम या अल्क मृदा धातूंमध्ये किती जवळचे संबंध आहेत हे स्पष्ट झाले. ही निकटता आणि क्लोरीन, ब्रोमिन, आयोडीन या हॅलोजेनच्या अणुभारांकांची समीपता यामुळे इ. स. १८६८ साली या तिन्ही समूहांची एकमेकांजवळ मांडणी करून मेंडेलिफने एक छोटीशी द्विमितीय चौकट तयार केली. ती चौकट पुढीलप्रमाणे होती -

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| Cl | 35. 5 | K | 39 | Ca | 40 |
| Br | 80 | Rb | 85 | Sr | 88 |
| I | 127 | Cs | 133 | Ba | 137 |

मूलद्रव्यांच्या या तीनही समूहांच्या अणुभारांच्या आकड्यानुसार केलेल्या मांडणीमुळे (प्रथम हॅलोजन, त्यापाठोपाठ अल्क धातू आणि त्यानंतर अल्क मृदा धातू अशी पुनरावर्ती नमुनाकृती निर्माण झाली आणि एका मोठ्या नमुनाकृतीचा हा एक भाग असला पाहिजे असे मेंडेलिफला वाटले. सर्व मूलद्रव्यांचे नियंत्रण पुनरावर्तित्त्वाच्या संकल्पनेनुसार होत असले पाहिजे, ज्याला 'मेंडेलिफचा आवर्ती नियम' 'पिरिऑडीक लॉ' म्हणतात, या विचारावर मेंडेलिफ स्थिरावला. एखादे शब्दकोडे भरत जावे त्याप्रमाणे मेंडेलिफने पहिला छोटा तक्ता

तयार केला आणि मग तो सर्व दिशांनी वाढवला. जाणीवपूर्वक आजमावणे आणि ठोकताळे बांधणे तसेच अंत:प्रेरणा आणि विश्लेषण यांची सांगड घालत मेंडेलिफने अवघ्या काही आठवड्यात अणुभारांकांच्या चढत्या क्रमाने लावलेल्या तीस विजोड मूलद्रव्यांचा तक्ता तयार केला. दर आठव्या मूलद्रव्याच्या गुणधर्माचा सारांश तोच असतो असे त्या तक्त्यावरून सूचित होत होते. "१६ फेब्रुवारी १८६९ साली मेंडेलिफला एक स्वप्न पडले, या स्वप्नात त्याला जवळ जवळ सगळीच्या सगळी पासष्ट मूलद्रव्ये तक्त्याच्या स्वरूपात मांडणी केलेली दिसली, दुसऱ्या दिवशी सकाळी त्याने ती कागदावर उतरवली." अशी वदंता आहे. पुढील काही वर्षात या पहिल्या तक्त्यामध्ये पुष्कळ सुधारणा व्हावयाची होती. परंतु १८७१ सालापर्यंत या तक्त्याने त्याचा नवा, परिचित, एकमेकांना छेदणाऱ्या गण (ग्रुप्स) व आवर्तने (पिरियडस्) यांची दाटी असलेल्या आयताचा आकार घेतला होता. हाच मूलद्रव्यांचा तक्ता मी विज्ञान वस्तुसंग्रहालयात पाहिला होता आणि हाच तक्ता पुढील शतकात प्रत्येक पाठ्यपुस्तक प्रत्येक व्याख्यानकक्ष आणि वस्तुसंग्रहालय यामध्ये आढळणार हा तक्ता वरपासून खालपर्यंत एका गणानंतर दुसरा गण (प्रत्येक उभा गण-ग्रुप हा होता. संयुजा आणि क्रियाशीलता यात साधर्म्य असलेल्या मूलद्रव्यांचे एक कुटुंब या स्वरूपात होता) याप्रमाणे वाचता आला असता, डॉयबरीनर आणि इ. स. १८६० सालापूर्वीच्या रसायनशास्त्रज्ञांनी तो तक्ता याच पद्धतीने वाचला असता. परंतु हा तक्ता माझ्या पद्धतीने वाचताना मूलद्रव्यांच्या आठ आवर्तनातून जात, प्रत्येक आवर्तनातील मूलद्रव्यांचे गुणधर्म समजून घेतसुद्धा वाचता आला असता. अणुभाराच्या प्रत्येक वाढीबरोबर मूलद्रव्यांचे गुणधर्म कसे बदलत जातात हे पाहात असता अचानक त्या गटाची समाप्ती होते आणि ज्या आवर्तनातील मूलद्रव्यांचे गुणधर्म हुबेहुब वरच्या आवर्तनातील मूलद्रव्याप्रमाणे असतात अशा गटात आपण येऊन पोहोचतो. इतर सर्वापेक्षा या गुणधर्मामुळे तक्त्याच्या विलक्षण आवर्तितेची जाणीव होते. तक्त्यात अंतर्भूत असलेल्या महत्त्वाच्या नियमाचे ते वास्तव होते.

सुरुवातीपासून माझी स्वत:ची प्रयोगशाळा होती. तेथे मी कित्येक तास रमलो होतो. अनेक पुस्तकातून मी मेंडेलिफच्या तक्त्याच्या छोट्या प्रतिकृती पाहिल्या होत्या. मी जेव्हा वस्तू संग्रहालयातील हा भला मोठा तक्ता पाहिला तेव्हा अत्यानंदित होऊन प्रथम खरोखरीच मी तो तक्ता माझ्या बुद्धित सामावून घेतला. मला शक्य होतील ती रसायने मिळवायची आणि जमतील ते सर्व प्रयोग करावयाचे या लहरी किंवा विश्वकोशीय मार्गावरून मी अधिक पद्धतशीर मार्गाकडे वळलो आणि मूलद्रव्यांचा कल मी स्वत:करता शोधून काढू लागलो. अल्कली धातूंचे छोटे गोळे पाण्यामध्ये टाकायचे आणि त्यांच्या वाळत्या अणुभाराप्रमाणे त्यांची क्रियाशीलता कशी वाढते हे पहायचे हा एक साधा आणि खूपच नाट्यपूर्ण (आणि थोडासा धोकादायक) असा प्रयोग होता. अत्यंत सावधानतेने चिमटा वापरून, तसेच स्वत:साठी आणि पाहुण्यांसाठी गॉगल्स सज्ज ठेवून हा प्रयोग करायचा असतो. लिथियमचा गोळा पाण्यात टाकल्यावर तो शांतपणाने पृष्ठभागावर फिरता राहातो, तो संपूर्ण गोळा नाहीसा होईपर्यंत पाण्याशी प्रक्रिया होऊन त्यापासून हायड्रोजन वायु बाहेर टाकला जातो.



अनुक्रमणिका

सोडियमचा गोळा जोराने फुसफुस, कुचकुच आवाज करून पृष्ठभागावर फिरतो, पण लहान गड्डा वापरला तर तो पेट घेत नाही. याउलट पोटॅशियम पाण्यात पडल्याबरोबर पेट घेतो आणि सगळीकडे स्वत:चे बुडबुडे वेगाने पसरवीत फिक्कट गुलाबी जांभळट ज्योत निर्माण करीत जळू लागतो. रुबिडियम हा त्याहीपेक्षा अधिक क्रियाशील असतो. अतिशय जोराने, त्या संयुगाचे शिंतोडे वातावरणात उडवीत रुबिडियम लालसर जांभळी ज्योत निर्माण करतो. सेसियम पाण्यात पडल्याबरोबर पाणी ठेवलेल्या काचेच्या भांड्याचा चुराडा करून त्याचा स्फोट झालेला मी स्वत: पाहिला आहे. एवढे सगळे नाट्य पाहिल्यावर कोणीही अल्क धातूंचे गुणधर्म कधीही विसरणार नाही !

आवर्तसारणी आपल्याला फक्त मूलद्रव्यांचे गुणधर्म सांगत नाही. तर कुटुंबाच्या वंशावळीप्रमाणे मुलद्रव्यांचे स्थान त्यामुळे निश्चित केले जाते. तेथून उलट्या दिशेने काम करणे, मूलद्रव्याचे गुणधर्म त्याच्या स्थानाशी कसे अनुरूप आहेत हे पाहाणे ही माझ्या दृष्टीने एक मौजेची गोष्ट होती. उदा. टंगस्टन हे माझे आवडते मूलद्रव्य आहे. इतर कोणत्याही धातूचा विलयनबिंदू टंगस्टनइतका उच्च नसतो. यामुळेच टंगस्टन अनन्यसाधारण झाले असे मला प्रथम वाटले. परंतु आता मला त्याची तुलना आवर्तसारणीमधल्या त्याच्या शेजाऱ्याशी करता आली. उच्चतम विलयन बिंदू असलेले धातू या सारणीच्या सहाव्या समूहातील सहाव्या गटात सापडतील. हे मला समजले. टंगस्टनचे : गण ६, आवर्तन ६ : हे स्थान दोन पर्वतरांगांच्या छेदनबिंदूपाशी आणि इतर शिखरांमध्ये जसे एव्हरेस्ट, तसे आहे. पण ती विसंगती नाही.

सर्व मूलद्रव्यांचे भौतिक आणि रासायनिक गुणधर्म आणि त्यांचे अणुभार यांचा नकाशा मला काढता आला आणि मला अतिशय आशादायक आलेख मिळाले. उदा. जर एखाद्याने अणुचे आकारमान आणि विरुद्ध बाजूला अणुभार याचा नकाशा काढला तर अनेक शिखरे असलेल्या कमानी मिळतील. हलक्या, पहिल्या समूहातील धातू त्या कमानींच्या शिखरावर तर आठव्या समूहातील घन धातू दरीमध्ये असलेले आढळतील. प्रत्येक गुणधर्म आवर्ती पद्धतीने बदलत जातो आणि कसेही करून त्याचा अणुभाराशी संबंध असतो. पण कोणत्याही मुलद्रव्याला त्याच्यात असलेले गुणधर्म का प्राप्त होतात आणि ते गुणधर्म अणुभारांच्या अनुवर्तिततेने पुन्हा कसे दिसून येतात याचे मेंडेलिफला वाटले, त्याप्रमाणे मलाही विलक्षण गूढ वाटले.

इ. स. १८६९ पासून १८७१ सालापर्यंत मेंडेलिफने आवर्तसारणीचा विस्तार केला. जी मूलद्रव्ये त्याच्या जागी योग्य वाटत नसतील त्यांची त्यांनी दुसऱ्या जागी मांडणीकेली. ती मूलद्रव्ये नवीन जागी योग्य वाटावीत म्हणून त्याने त्यांचा अणुभारांक बदलला. या कृतीमुळे त्याच्या काही समकालीन व्यक्तीला धक्का बसला. ट्रान्झिशन : संक्रामक धातू (यामध्ये व्हॅनॅडियम, प्लॅटिनम, यासारख्या दुर्मिळ धातूंचा तसेच लोह, निकेल यासारख्या सामान्य धातूंचा समावेश होतो) आणि रेअर अर्थ : दुर्मिळ मृदा मूलद्रव्ये – मूलद्रव्यांच्या या दोन समूहांनी यापुढील आव्हान दिले. मेंडेलिफ आणि इतरांनी या सारणीला सर्पिल, शंकू इत्यादि

नवीन आकार देण्याचे प्रयोग केले. त्यामुळे खऱ्या अर्थाने या आवर्तसारणीला एक आणखी परिमाण लाभले.

विलक्षण आत्मविश्वासाने मेंडेलिफने अजूनपर्यंत अज्ञात असलेल्या मूलद्रव्यांसाठी स्वत:च्या सारणीमध्ये अनेक रिकाम्या जागा आरक्षित करून ठेवल्या. वरच्या, खालच्या (तसेच डाव्या व उजव्या बाजूच्या) मूलद्रव्यांच्या गुणधर्मावरून तर्क करून आणि अटकळ बांधून ती अज्ञात मूलद्रव्ये कशा प्रकारची असतील याचे आत्मविश्वासपूर्वक भाकीत कोणालाही करता येईल असे मेंडेलिफने ठासून सांगितले आणि प्रत्यक्षात त्याने ते आचरणात आणले. तिसऱ्या गणात ॲल्युमिनियमच्या पाठोपाठ कोणते नवे मुलद्रव्य येईल याचे मेंडेलिफने सविस्तरपणे भाकीत केले. तो अज्ञात धातू चंदेरी रंगाचा, सहा ही घनता आणि अडुसष्ट हा अणुभार असलेला असावा असा तर्क त्याने केला आणि खरोखरीच चार वर्षानंतर इ. स. १८७५ साली कॅगॅलियम हे हुबेहुब मेंडेलिफच्या वर्णनानुसार गुणधर्म असलेले मूलद्रव्य सापडले. अशाच प्रकारच्या नेमकेपणाने त्याने स्कँडियम आणि जरमॅनियम यांच्या अस्तित्वाबद्दल अंदाज वर्तवला आणि लवकरच त्याही मूलद्रव्यांचा शोध लागला. मूलद्रव्यांचा इतक्या बारकाव्याने अंदाज वर्तवण्याच्या त्याच्या क्षमतेमुळे त्याचे सहकारी रसायनशास्त्रज्ञ अवाक् होत. मेंडेलिफची पद्धती म्हणजे मूलद्रव्यांची मनास येईल त्या अनुक्रमाने केलेली मांडणी नसून वास्तवाचे ते व्युत्पन्न प्रकटीकरण आहे याबद्दल त्याच्या सहकाऱ्यांची खात्री पटली.

इ. स. १८९० साली लागलेल्या मुलद्रव्यांच्या संपूर्ण कुटुंबाच्या निष्क्रीय वायुंच्या (इनर्ट गॅसेस) शोधामुळे इतरेजनांप्रमाणे मेंडेलिफसुद्धा आश्चर्यचकित झाला. त्यांच्या अस्तित्वाबद्दल त्यांच्या मनात संशय होता. त्यापैकी प्रथम शोधले गेलेले ॲरगॉन म्हणजे नायट्रोजनचे अधिक वजनदार रूप असावे असे त्याला सुरुवातीला वाटले. परंतु हेलियम, क्रिप्टॉन, झेनॉन आणि सरतेशेवटी रेडॉन यांचा शोध लागल्यावर त्या सर्वांचा मिळून एक परिपूर्ण नियतकालिक समूह होतो हे स्पष्ट झाले. संयुगे तयार करण्याच्या सामर्थ्याबाबत त्यांच्यात एकरूपता होती. असे म्हणतात की त्यांची संयुजा शून्य होती. त्यामुळे तक्त्यामधील आठ आवर्तनांमध्ये आता मेंडेलिफने अखेरच्या 'शून्य' या आवर्तनाची भर घातली.

निष्क्रिय (इनर्ट) वायूंची त्यांच्या स्थानी मांडणी केल्यावर प्रत्येक आवर्तनातील मूलद्रव्यांची संख्या याप्रमाणे झाली. पहिल्या आवर्तनामध्ये दोन (हायड्रोजन आणि हिलियम), दुसऱ्या व तिसऱ्या आवर्तनात प्रत्येक आठ, चौथ्या व पाचव्या आवर्तनात आठ विशिष्ट अधिक दहा मूलद्रव्ये म्हणजे प्रत्येकी एकूण अठरा, सहाव्या आवर्तनात आठ अधिक रहा अधिक चौदा दुर्मिळ मृदा संक्रमण मूलद्रव्ये याप्रमाणे एकूण बत्तीस मुलद्रव्ये होती. २, ८, ८, १८, १८, ३२ या संख्या तर चमत्कारपूर्वक होत्या, परंतु त्यातून काय ध्वनित होत होते? आणि विस्तारीत दृष्टीने पाहाता रासायनिक गुणधर्म कशावर आधारलेले होते? मेंडेलिफ सातत्याने या प्रश्नांचा विचार करीत होता. न्यूटनच्या अनाधुनिक विज्ञानाशी तुलना करता येईल असे नवे 'रासायनिक यांत्रिकी विज्ञान' तयार करण्याची तळमळ त्याला लागली

होती. त्याच्या मृत्यूनंतर झालेल्या आणि अनाधुनिकी यांत्रिकी विज्ञानानुसार ज्याची संपूर्णपणे कल्पना करता येणार नाही अशा परिवर्तनाचे प्रत्यक्ष स्वरूप पाहून त्याने काय विचार केला असता? याचा आपल्याला विस्मय वाटतो.

मेंडेलिफच्या मृत्यूनंतर चार वर्षांनी म्हणजे इ. स. १९११ साली अणुच्या अंतर्गत रचनेबद्दल एक नवी दृष्टी प्राप्त झाली. अणुची रचना लघुरूप सौरपद्धतीप्रमाणे असली पाहिजे, त्याचे बहुतेक सर्व वस्तुमान सूक्ष्म, अतिशय घन, घन विद्युत्‌भारित आणि बऱ्याच अंतरावरील तुलनात्मक दृष्ट्या वजनरहित इलेक्ट्रॉन्सनी घेरलेल्या केंद्रकात असते असे अनुमान अर्नेस्ट रुदरफर्डने (ज्याने सोन्याच्या पत्र्यावर अल्फा कणांचा मारा केला असता फारच कधीमधी त्यांचे परत विक्षेपण-डिफ्लेक्शन होते असे दाखवून दिले) काढले. अणुचे मर्म त्याच्या केवल स्थैर्यात आहे. रुदरफोर्डच्या या अशा अणुचे नियंत्रण जर अनाधुनिकी यांत्रिकी नियमांनी केले तर तो अणु स्थिर राहाणार नाही, त्याचे इलेक्ट्रॉन्स भ्रमण करीत असता ऊर्जा गमावतील आणि सरतेशेवटी केंद्रकात झेप घेतील.

इ. स. १९१२ साली नील्स बोहर रुदरफोर्डबरोबर काम करीत होता आणि त्याला वरील समस्येची तीव्रतेने जाणीव झाली होती. आमूलाग्र नवीन पद्धतीने विचार करणे आवश्यक आहे हे त्याला समजत होते. तो विचार त्याला क्वांटम-पुंजयामिकी सिद्धान्तात मिळाला. "विद्युतचुंबकीय ऊर्जा-प्रकाश आणि प्रारण-ही अखंडित नसते, परंतु ती स्वतंत्र पुडक्यात किंवा पुंजयामिमध्ये (क्वांटा) शोषली जाते किंवा बाहेर टाकली जाते." हे पुंजयामिकीचे आधारतत्त्व होते. बोहरने आश्चर्यकारक झेप घेऊन या संकल्पनांची रुदरफोर्डच्या प्रतिकृतीशी आणि सर्वांना ज्ञात असलेल्या परंतु ज्यांच्या स्वरूपाचा उलगडा होत नव्हता अशा प्रकाशीय पंक्तींशी सांगड घातली. या प्रकाशीय पंक्ती प्रत्येक मूलद्रव्याच्या विशेषक असतात. इतकेच नव्हे तर त्यामध्ये पृथक रेषांचे अनेकत्त्व किंवा वारंवारता असते असे बोहरने दाखवून दिले.

ज्या अणुमध्ये इलेक्ट्रॉन्स वेगवेगळ्या ऊर्जा असलेल्या आणि केंद्रकाभोवती असणाऱ्या भ्रमणकक्षांच्या मालिका किंवा कवच व्यापून राहातात अशा बोहरच्या अणुमध्ये या सर्व गोष्टी एकत्र आल्या. अनाधुनिक भ्रमणकक्षा नाश पावतात. याउलट पुंजयामिळी भ्रमणकक्षांना स्थिरता असल्यामुळे त्यांना स्वत:ला कायम स्वरूपात टिकवता येणे संभवनीय होते. (परंतु जर अणु उद्दीपीत झाला तर त्याचे काही इलेक्ट्रॉन्स काही काळापुरते उर्जेच्या भ्रमणकक्षेत जाण्याचा संभव असतो आणि पुन्हा आपल्या मूळ स्थानी येताना विशिष्ट वारंवारता असलेली पुंजयामिकी ऊर्जा उत्सर्जित करतात. याच कारणामुळे त्यांच्या प्रकाशीय पंक्तींमध्ये लाक्षणिक रेषा निर्माण झाल्या होत्या)

१९१३ सालच्या वसंत ऋतुत बोहरने आपली अणुची प्रतिकृती सादर केली. मूलद्रव्यांचा अनुक्रम आणि त्यांच्या क्ष किरण पंक्ति यांच्यात अतिशय घनिष्ट संबंध आहे हे, काही महिन्यानंतर हेन्री मोस्ले याने शोधून काढले. अणुच्या केंद्रातील धनभाराच्या आकड्याचा व पंक्तींचा परस्परसंबंध असला पाहिजे असा मोस्लेने विचार केला, आणि याच आकड्याला 'अणुक्रमांक' ही संज्ञा दिली गेली. अणुभाराच्या संदर्भात आढळणाऱ्या रिकाम्या जागा, अंशरूपे, अनियमितता या गोष्टी अणुक्रमांकात दिसत नसत. म्हणूनच

अणुभारावरून नव्हे तर अणुक्रमांकावरून मूलद्रव्यांचा क्रम ठरवला जाऊ लागला. 'हायड्रोजन' आणि युरोनियम यामध्ये फक्त ९२ मूलद्रव्ये आहेत, अर्धा डझन अज्ञात मूलद्रव्यांचाही यात समावेश आहे' असे आता मोस्लेला संपूर्ण आत्मविश्वासाने सांगता येत होते. त्यापैकी तीन मूलद्रव्यांची शक्यता मोघमपणाने मेंडेलिफने वर्तवली होती)

प्रत्येक मूलद्रव्याचे रासायनिक गुणधर्म, आवर्तसारणीतील त्याचे स्थान हे त्याच्यातील इलेक्ट्रॉन्सची संख्या आणि त्यांची अनुक्रमाने येणाऱ्या कवचातील मांडणी यावर अवलंबून असते; असे बोहरच्या प्रतिकृतीवरून सूचित होत होते. मेंडेलिफच्या गुणांची निश्चिती करणारे संयुजा आणि रासायनिक क्रियाशीलता हे दोन घटक आणि बाह्य कवचातील संयुजा इलेक्ट्रॉन्सची संख्या याचा परस्परसंबंध असतो. जास्तीतजास्त आठ इलेक्ट्रॉन्स असतील तर तो अणु रासायनिक दृष्ट्या निष्क्रीय असतो. जास्तीत जास्त संख्येपेक्षा कमी किंवा अधिक इलेक्ट्रॉन्स असतील तर क्रियाशील असण्याकडे त्याचा कल असतो. सर्वात बाहेरच्या कवचामध्ये फक्त एक इलेक्ट्रॉन कमी असलेले हॅलोजेन आठवा इलेक्ट्रॉन मिळवण्यासाठी आसुसलेले असते. तर अल्कली धातूंच्या सर्वात बाहेरच्या कवचात फक्त एक इलेक्ट्रॉन असल्यामुळे त्याचा त्याग करण्यासाठी ते उत्सुक असतात. स्वत:च्या पद्धतीने स्थैर्य मिळवण्यासाठी अणुची ही धडपड असते. नंतरच्या आवर्तनात या मूळ अष्टकात अधिक विस्तारित कवचांची भर घातली होती. उदा. संक्रामक मूलद्रव्यांकरता १० इलेक्ट्रॉन्स असलेली कवचे तर दुर्मिळ मृदा धातूंकरता चौदा इलेक्ट्रॉन्स असलेली कवचे वापरली गेली. बोहर आणि मोस्ले यांनी आवर्तसारणीचे अप्रतिम दृढीकरण केले आणि आवर्तसारणीला 'रासायनिक अणुंचे अदृष्य विश्व'' असे स्वरूप मिळावे अशी जी मेंडेलिफची इच्छा होती ती त्यांनी पूर्ण केली. मूलद्रव्यांची पुनरावर्तीता त्याच्या इलेक्ट्रॉन्सच्या रचनेनुसार आकार घेते हे आता स्पष्ट झाले. आवर्तसारणीचे नियंत्रण करणाऱ्या त्या गूढ संख्या २, ८, ८, १८, १८, ३२ म्हणजे प्रत्येक आवर्तनात असलेल्या इलेक्ट्रॉन्सची संख्या होय हे आता समजले होते.

जवळजवळ अर्ध्या शतकापूर्वी फक्त रासायनिक आधारावर मांडणी केलेली मेंडेलीफची आवर्तसारणी मूलत: अशा इलेक्ट्रॉनिक आवर्तसारणीशी मिळतीजुळती आहे. रासायनिक अणुच्या अदृश्य विश्वाचा शोध घेत मोस्ले आणि बोहर यांनी अणूच्या केंद्राकडून काम केले आणि दृष्य व व्यक्त झालेल्या मूलद्रव्यांच्या गुणधर्मावरून मेंडेलिफ आणि त्याच्या समकालीनांनी परीघापासून केंद्राकडे या दिशेने काम केले आणि असे असूनसुद्धा ते दोघे एकाच बिंदूपाशी येऊन पोहोचले. आवर्तसारणी जुन्या आणि नव्या दोन्ही विचारांना बरोबर घेऊन अनाधुनिक रसायनशास्त्र आणि पुंजयामिकी भौतिकशास्त्र यांचे आश्चर्यकारक संश्लेषण करून त्या दोघांना एकत्रित आणते, खरोखर हेच आवर्तसारणीचे सौंदर्य आहे.

तात्विक दृष्ट्या ऊर्जेचे वेगवेगळे स्तर असणारे बोहरचे भ्रमणकक्ष दिले तर प्रत्येक वेळी एका इलेक्ट्रॉनची भर घालून, आण्विक जिन्याच्या हेलियमपासून युरेनियमपर्यंतच्या पायऱ्या चढत कोणालाही संपूर्ण आवर्तसारणी तयार करता येईल. अशा तऱ्हेची रचना केल्यामुळेच



अनुक्रमणिका

आपल्याला निसर्गात नसलेली नवीन मूलद्रव्ये निर्माण करता आली. उदा. आवर्तसारणीत युरेनियमच्या पाठोपाठ येणारी, ज्यांचे वजनदार अणु आवर्ती नियमांचे उल्लंघन करीत नाहीत अशी ९३ ते ११२ क्रमांकापर्यंतची वीस मूलद्रव्ये. तात्विक दृष्टीने विचार करता दोनशे किंवा त्याहीपलिकडच्या मूलद्रव्यांपर्यंतची आवर्तसारणी तयार करता येईल आणि तशा मुलद्रव्यांच्या गुणधर्मांचे अंदाज वर्तवता येतील. (हे अंदाज बहुतकरून सैद्धान्तिक स्वरूपाचे असतात. कारण युरेनियमच्या पुढच्या मूलद्रव्यांचा अधिकाधिक अस्थिर होण्याकडे कल असतो. एखाद वेळेस त्या अणुची फक्त निर्मिती करता येईल पण सेकंदाच्या दहा लाखाव्या भागातच तो नाहीसा झालेला असेल.)

आवर्तितेच्या संकल्पनेला ठळकपणे दाखवता येतील अशा मर्यादा नसतात आणि या शतकातील इतर सर्व स्थायीकरण केलेल्या गोष्टींप्रमाणे या संकल्पनेमुळे मेंडेलिफला आनंद झाला असता.

मी प्रथम आवर्तसारणी पाहिली त्याला पन्नास वर्षे होऊन गेली आणि माझा त्यातील आनंद कधीच कमी झाला नाही. एकशेतीस वर्षापूर्वीप्रमाणेच ती अजूनही रसायनशास्त्राची प्रतिमा आहे. नवीन संश्लेषण सूचित करणे, पूर्वी कधीही न पाहिलेल्या मूलद्रव्यांच्या गुणधर्माविषयी भाकीत करणे यासारख्या गोष्टीतून आवर्तसारणी रासायनिक संशोधनाला मार्गदर्शक करते. मूलद्रव्यांच्या संपूर्ण गुणधर्मांचा तो एक अजब नकाशा आहे.

माझ्या स्वयंपाकघरात लंबगोल, सर्पिल, शंकू अशी प्रत्येक आकार व प्रकारच्या आवर्तसारणीचे कागद आहेत. गोल, लाकडाची बनवलेली, आणि प्रार्थनाचक्राप्रमाणे एका आसावर गोल फिरवता येणारी अशी माझी सर्वात आवडती आवर्तसारणी माझ्या स्वयंपाकघरातील टेबलावर आहे. मी माझ्या खिशातूनसुद्धा दोन आवर्तसारणी नेतो– प्राचीनकालिन अक्षरात लिहिलेली अनाधुनिक मेंडेलिफची आवर्तसारणी आणि दुसरी मुलद्रव्ये व त्यांचे अणुक्रमांक दर्शविणारी, सुंदर, रंगीन, सर्पिल अशी आधुनिक आवर्तसारणी. एखादा मोठा तेजोमेघ जसा अनंततेकडे झेपावत असतो त्याप्रमाणे ही आवर्तसारणी युरेनियमच्या पलीकडे अनंतात कोठपर्यंत झेपावणार आहे कोणास ठाऊक !

**टीप :** वाचकांच्या सोयीकरता आधुनिक आवर्तसारणी देत आहोत. त्यावरून गण (उभे स्तंभ) आणि आवर्तने (आडव्या ओळी) यांची कल्पना येईल. यापैकी तिसऱ्या आवर्तनातील मूलद्रव्यांना प्रातिनिधिक मूलद्रव्ये म्हणतात. यात सोडियमपासून आरगॉनपर्यंत एकूण आठ मूलद्रव्यांचा समावेश आहे. त्यातील प्रत्येक मूलद्रव्य त्याच्या गणाचे प्रतिनिधित्व करते. उदा. सोडियमचे गुणधर्म अभ्यासले तर त्या गणातील पोटॅशियम, रूबिडियम, सेसियम इत्यादि मूलद्रव्यांच्या गुणधर्मांची कल्पना करता येते. तसेच या संपूर्ण तिसऱ्या आवर्तनातील मूलद्रव्यांचे गुणधर्म अनुक्रमाने कसे बदलत जातात ते क्र. २ च्या तक्त्यावरून लक्षात येईल. नैसर्गिक स्वरूपात असलेली ही पुनरावर्तिता मानवाने संकल्प करून निर्माण केली आहे की काय अशी शंका यावी इतकी दिङ्मूढ करणारी आहे. नैसर्गिक अस्ताव्यस्ततेत असणारी ही प्रमाणबद्धता मानवाने आपल्या बुद्धिसामर्थ्यावर शोधली हे विशेष !

---



अनुक्रमणिका

## तक्ता 1.4 : आधुनिक आवर्तसारणी (दीर्घश्रेणी)

| | गण | | | | | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | IA | IIA | IIIB | IVB | VB | VIB | VIIB | VIIIB | | | IB | IIB | IIIA | IVA | VA | VIA | VIIA | VIIIA/0 |
| 1 | 1<br>H<br>1.008 | | | | | | | | | | | | | | | | | 2<br>He<br>4.00 |
| 2 | 3<br>Li<br>6.94 | 4<br>Be<br>9.01 | | | | | | | | | | | 5<br>B<br>10.81 | 6<br>C<br>12.01 | 7<br>N<br>14.01 | 8<br>O<br>16.00 | 9<br>F<br>19.0 | 10<br>Ne<br>20.2 |
| 3 | 11<br>Na<br>23.0 | 12<br>Mg<br>24.3 | | | | | | | | | | | 13<br>Al<br>27.0 | 14<br>Si<br>28.1 | 15<br>P<br>31.0 | 16<br>S<br>32.1 | 17<br>Cl<br>35.5 | 18<br>Ar<br>39.9 |
| 4 | 19<br>K<br>39.1 | 20<br>Ca<br>40.1 | 21<br>Sc<br>45.0 | 22<br>Ti<br>47.9 | 23<br>V<br>50.9 | 24<br>Cr<br>52.0 | 25<br>Mn<br>54.9 | 26<br>Fe<br>55.8 | 27<br>Co<br>58.9 | 28<br>Ni<br>58.7 | 29<br>Cu<br>63.5 | 30<br>Zn<br>65.4 | 31<br>Ga<br>69.7 | 32<br>Ge<br>72.6 | 33<br>As<br>74.9 | 34<br>Se<br>79.0 | 35<br>Br<br>79.9 | 36<br>Kr<br>83.8 |
| 5 | 37<br>Rb<br>85.5 | 38<br>Sr<br>87.6 | 39<br>Y<br>88.9 | 40<br>Zr<br>91.2 | 41<br>Nb<br>92.9 | 42<br>Mo<br>95.9 | 43<br>Tc<br>(98) | 44<br>Ru<br>101.1 | 45<br>Rh<br>102.9 | 46<br>Pd<br>106.4 | 47<br>Ag<br>107.9 | 48<br>Cd<br>112.4 | 49<br>In<br>114.8 | 50<br>Sn<br>118.7 | 51<br>Sb<br>121.8 | 52<br>Te<br>127.6 | 53<br>I<br>126.9 | 54<br>Xe<br>131.3 |
| 6 | 55<br>Cs<br>132.9 | 56<br>Ba<br>137.3 | 57-71<br>La-Lu<br>138.9 | 72<br>Hf<br>178.5 | 73<br>Ta<br>180.9 | 74<br>W<br>183.9 | 75<br>Re<br>186.2 | 76<br>Os<br>190.2 | 77<br>Ir<br>192.2 | 78<br>Pt<br>195.1 | 79<br>Au<br>197.0 | 80<br>Hg<br>200.6 | 81<br>Tl<br>204.4 | 82<br>Pb<br>207.2 | 83<br>Bi<br>209.0 | 84<br>Po<br>(210) | 85<br>At<br>(210) | 86<br>Rn<br>(222) |
| 7 | 87<br>Fr<br>(223) | 88<br>Ra<br>(226) | 89-103<br>Ac-Lr<br>(227) | 104<br>Rf<br>(261) | 105<br>Ha<br>(262) | 106<br>Unh<br>(263) | 107<br>Uns | | | | | | | | | | | |
| | | | | 58<br>Ce<br>140.1 | 59<br>Pr<br>140.9 | 60<br>Nd<br>144.2 | 61<br>Pm<br>(145) | 62<br>Sm<br>150.4 | 63<br>Eu<br>152.0 | 64<br>Gd<br>157.2 | 65<br>Tb<br>158.9 | 66<br>Dy<br>162.5 | 67<br>Ho<br>164.9 | 68<br>Er<br>167.3 | 69<br>Tm<br>168.9 | 70<br>Yb<br>173.0 | 71<br>Lu<br>174.99 | |
| | | | | 90<br>Th<br>232.0 | 91<br>Pa<br>(231) | 92<br>U<br>238.0 | 93<br>Np<br>(237) | 94<br>Pu<br>(242) | 95<br>Am<br>(243) | 96<br>Cm<br>(248) | 97<br>Bk<br>(247) | 98<br>Cf<br>(249) | 99<br>Es<br>(254) | 100<br>Fm<br>(253) | 101<br>Md<br>(256) | 102<br>No<br>(254) | 103<br>Lr<br>(257) | |



अनुक्रमणिका

## तक्ता 1.5 : तिसऱ्या आवर्तनातील मूलद्रव्यांची काही गुणवैशिष्ट्ये

| क्र. | मूलद्रव्यांचे गुणविशेष | सोडिअम Na | मॅग्नेशिअम Mg | ॲल्युमिनिअम Al | सिलिकॉन Si | फॉस्फरस P | सल्फर (गंधक) S | क्लोरीन Cl | आरगॉन Ar |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| 1. | अणुक्रमांक | 11 | 12 | 13 | 14 | 15 | 16 | 17 | 18 |
| 2. | इलेक्ट्रॉन संरूपण | 2, 8, 1 | 2, 8, 2 | 2, 8, 3 | 2, 8, 4 | 2, 8, 5 | 2, 8, 6 | 2, 8, 7 | 2, 8, 8 |
| 3. | संयुजा | 1 | 2 | 3 | 4 | 3 | 2 | 1 | 0 |
| * | H किंवा Cl सापेक्ष | NaCl | $MgCl_2$ | $AlCl_3$ | $SiCl_4$ | $PCl_3$ $PH_3$ | $H_2S$ | HCl | - |
| ** | O सापेक्ष | 1 | 2 | 3 | 4 | 5 | 6 | 7 | - |
| | | $Na_2O$ | MgO | $Al_2O_3$ | $SiO_2$ | $P_2O_5$ | $SO_3$ | $Cl_2O_7$ | - |
| 4. | धातुगुण आणि अधातुगुण | धातू (अधिकतम) | धातू | धातू | धातू | अधातू | अधातू | अधातू (अधिकतम) | - |
| 5. | ऑक्साइडचे स्वरूप | अतितीव्र आम्लारिधर्मी | तीव्र आम्लारिधर्मी | उभयधर्मी | अतिसौम्य आम्लधर्मी | सौम्य आम्लधर्मी | तीव्र आम्लधर्मी | अतितीव्र आम्लधर्मी | - |
| 6. | ऑक्सिडीकारक आणि क्षपणक गुणधर्म | अतितीव्र शक्तिमान क्षपणक | अतितीव्र क्षपणक | तीव्र क्षपणक | सौम्य क्षपणक आणि ऑक्सि-डीकारक दोन्ही | अतिसौम्य क्षपणक आणि ऑक्सिडी-कारक दोन्ही | ऑक्सिडीकारक | अतितीव्र ऑक्सिडीकारक | - |
| 7. | अणूचा सापेक्ष आकार | सर्वांत मोठा | | | | | | सर्वांत लहान | मोठा (अपवाद) |
| | त्रिज्या Å एककात | 1.86 | 1.60 | 1.43 | 1.17 | 1.10 | 1.04 | 0.99 | 1.54 |

* एखाद्या मूलद्रव्याची संयुजा म्हणजे त्या मूलद्रव्यांची हायड्रोजनबरोबर संयोग पावण्याची क्षमता होय मूलद्रव्याच्या एका अणुबरोबर हायड्रोजनचे किती अणू संयोग पावतात, हे दर्शविणारी संख्या म्हणजेच त्या मूलद्रव्याची हायड्रोजनसापेक्ष संयुजा होय.

** एखाद्या मूलद्रव्याची संयुजा म्हणजे त्या मूलद्रव्याची ऑक्सिजनबरोबर संयोग पावण्याची क्षमता होय. मूलद्रव्याच्या एका अणूबरोबर ऑक्सिजन अणूच्या जितक्या जोड्या संयोग पावतात, ते दर्शविणारी संख्या म्हणजेच त्या मूलद्रव्याची ऑक्सिजनसापेक्ष संयुजा होय.



अनुक्रमणिका

**फ्रांझ काफ्का**
**(१८८३-१९२४)**

**जागतिक वाङ्मयात स्वत:चे घराणे निर्माण करणारा**
**जर्मन कथा-कादंबरीकार.**

**विसाव्या शतकातील**
**या महान साहित्यिकाचा परिचय करून देणारा**
**मराठीमधील पहिला ग्रंथ**

# थोडाबहुत काफ्का

**शकु नी. कनयाळकर**

**१८८३-१९१८ या कालखंडातील काफ्काचा जीवनवृत्तांत.**
**'द ट्रायल' या कादंबरीचा संक्षिप्त अनुवाद.**

चरित्रपट, वाङ्मयसूची इ. आर्टपेपरवरील ५२ छायाचित्रे
एकूण पृष्ठे २६० + ४ + १६

**मूळ किंमत रु. २००**
**'नवी क्षितिजे' च्या वर्गणीदारांना सवलतीची किंमत रु. १२०**

त्वरित संपर्क साधा
**नाना जोशी**
**४ अ, सोमणनगर, क्रांतीवीर भाई बालमुकुंद मार्ग, मुंबई ४०० ०१२**

अनुक्रमणिका

